॥ श्रीगुलाबरावमहाराजकृत ॥

ग्रंथसंग्रह.

# ॥ सूक्तिरत्नावलि. ॥

प्रथम यष्टि.

हें पुस्तक

प्रकाशक

श्रीनिवास रामचंद्र हरिदास

यांनीं

नागपूर येथें

" श्रीज्ञानेश्वर मुद्रणालय " मध्यें छापिलें.



आवृत्ति १ ली.

भाद्रपद शुद्ध ४ शके १८२९.

किंमत १॥ रुपया.

# प्रकाशकाचे दोन शब्द.

आह्मी श्रीयुत गुलाबराव महाराज यांचे ग्रंथ "सूक्तिरत्नावली" या नावानें प्रसिद्ध करण्याचें ठरविलें आहे. त्याप्रमाणे ह्या "सूक्तिरत्नावली" चा प्रथम भाग वाचकांस सादर करीत आहो. यांत भक्तिपद तीर्थामृत, निगमांतपथसंदीपक, चौसष्टी, श्रीमद्भगवद्गीतासंगति निदिध्यासनप्रकाश व कांतकांतवाक्यपुष्प इतके ग्रंथ यांत आले आहेत. या ग्रंथासंबंधानें विशेष सांगण्याचे कांही कारण नाहीं. वाचकांनीं हे वाचल्यावर त्याचे महत्व समजणार आहे. यापैकीं कांहीं ग्रंथ सुलभ व कांही दुर्बोध असे आहेत, यांचे कारण असे आहे कीं वाचकांचे अधिकार व विषयाचे महत्व या दोन्हीही गोष्टीस अनुसरून ग्रंथ लिहिले आहेत. त्यामुळें कांही ग्रंथात काठिन्याचभास होतो. तथापि यांचे विचारपूर्वक नित्य पठनानें बराच अर्थ बोध होऊं लागतो. या पुस्तकांत २१ पत्रें आहेत, त्यासंबंधानें इतकेच सांगावयाचे कीं शिष्य स्त्रीजाति असून सद्गुरुकडून ही पत्रें पावल्यावर तिला ब्रह्म अनुभव होवून ती कृतकृत्य झाली व जन्ममरणबंधनापासून मुक्त झाली, ज्यांना या ग्रंथांचें निर्माते श्रीयुत गुलाबराव महाराज यांच्या भेटीचे प्रसंग आले असतील, त्यांना या ग्रंथांतील विषय समजण्यास बरेच सुलभ जातील. या सूक्तिरत्नावलीचा दुसरा भागही लवकरच काढण्याचा विचार आहे. परंतु तो विचार सिद्धीस नेणें वाचक वर्गावर अवलंबून आहे. ज्यांचेकडून आगाऊ वर्गणी या पुस्तकाकरितां आली त्यांचेकडे पुस्तक लवकर न गेल्यामुळें त्यांची क्षमा मागणे जरूर आहे. प्रेस वगैरे सर्व नवे, आह्मांस माहितीही तेवढ्या पुरतीच, यामुळें पुस्तकांस उशीर लागला, करितां आगाऊ वर्गणीदारांनी क्षमा करावी ज्याच्या कृपेनें हे महाकार्य हातीं घेतले आहे, त्याच्याच व आणखीही कामें या दासाकडून घडोत अशी प्रार्थना आहे.

## श्रीनिवृत्तिनाथस्तव.

आर्या.

सद्योगगुणमणींची, ज्याच्या हृदयीं सदा सुखनिवृत्ति, ।
तो मज दीना दासा देऊ, दावुनि पदा सुख निवृत्ति ॥

## श्रीज्ञानेश्वरस्तव.

आर्या.

जो ज्ञानराज भगवान् श्रवणीं सुज्ञान दे वदे वाचा ॥
अवतार गमे अकरावा का सुज्ञानदेव देवाचा ॥ २ ॥
श्रीविष्णुसा न तारी जन काय ज्ञानदेव वेगानें ? ।
हा दे तें स्वर्गाच्या जनका यक्षा न देववे गानें ॥ २ ॥
यास्तव, या स्तवनाहीं स्तवितों, कवि तो नव्हे, यथाबुद्धि ।
स्तवितां भावें, देतो ज्ञानेश्वर विष्णु हा मनःशुद्धी ॥ ३ ॥
ज्ञानेशा ! भगवंता ! भगवज्जनवल्लभा ! महासदया ! ।
कलियुगवर्ती जन जो, देशी स्मरणेंचि, मुक्तिचें पद या ॥ ४ ॥
त्वन्नाम महामंत्र ज्ञानप्रद होय यासि जो भावें ।
जपतो, ज्ञान तयाचें त्या जनकाचें तसेंचि, शोभावें ॥ ५ ॥
कोणा जडा न होशिल सुगतिप्रद आहलासि भिंतीतें ।
श्रीरामाचें तैसें, तव यश सज्जनसमाज चिंती तें ॥ ६ ॥
ज्ञानेशा ! जें जाड्य, त्वत्तेजें क्षिप्र तें विरें; हा जो ।
खळमानसीं प्रताप श्रुति वदला विप्र सेवि रेडा जो ॥ ७ ॥
श्रीमद्भगवद्गीताव्याख्या केली जगासि ताराया ।
सारा या सद्ग्रंथा सेविति, संसारताप साराया ॥ ८ ॥
श्रीहरिहरकीर्ति तशा बा ! विश्वास प्रिया तुझ्या ओव्या ।
जो व्यास तोहि बहुधा ह्मणतो, 'श्रुतिशाचि या मला होव्या' ॥
ज्ञाता शिष्यांसि ह्मणे, 'प्राकृत दिसतो, परंतु न तसा रे ।
गोपप्रसुसा अमृतानुभव, तया पायि सुजन नत सारे' ॥ १० ॥
ज्ञानेशा ! त्वत्कृतिते करिती ज्ञाते समस्तही प्रणती ।
ज्ञानेश्वरी भवानी होय महामोह महिष हे ह्मणती ॥ ११ ॥
शंकर निवृत्ति, हरि ! तूं ज्ञानेश, ब्रह्मदेव सोपान ।
विद्या मुक्ता; तुमच्या कीर्तिसुधेचें सदा असो पान ॥ १२ ॥
त्वां बहुजड उद्धरिले, प्रकट ज्ञानेश्वरा ! दयाळो ! हें ।
तारीं मयूरहि तसा, परिसासि हिणाविजे न या लोहें ॥ १३ ॥

## श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर माउली समर्थ.

### पालखीचे अभंग १

आदिनाथाहुनि गुज प्रकटले । मत्स्येंद्रा लाधले सहजस्थिती ॥ १ ॥ मत्स्येंद्रानें मंत्र गोरक्षासी दिला । गोरक्षे बोधिला गैनीराजा ॥ २ ॥ गैनीरायें खूण निवृत्तिसी दिली । तेणें कृपा केली ज्ञानराजा ॥ ३ ॥ ज्ञानेश्वरें बोध जगासि पै केला । एकाजनार्दनी झाला पूर्ण बोधू ॥ ४ ॥

चला आळंदीसी जाऊं । ज्ञानेश्वर डोळा पाहूं ॥ १ ॥ ज्ञानेश्वर ज्ञानेश्वर । मुखें ह्मणतां चुके फेर ॥ २ ॥ होती संतांचिया भेटी । सांगू सुखाचिया गोष्टी ॥३॥ जन्म नाहीं रे आणिक । तुका ह्मणे माझी भाक ॥४।

जयाचिये द्वारीं सोन्याचा पिंपळ । आंगी ऐसे बळ रेडा बोले ।१। करील तो काय नव्हे महाराज । परी पाहे बीज शुद्ध आंगी ॥ २ ॥ जयानें स्थापिली मुक्तीची गवांदी । मेळविली मांदी वैष्णवांची ॥ ३ ॥ तुका ह्मणे तेथें सुखा काय उणें । राहे समाधानें चित्ताचिया ॥ ४ ॥

ज्ञानेश्वर माझी योग्याची माउली । जेणें निगमवल्ली प्रकट केली ।१। गीता अलंकार ग्रंथ ज्ञानेश्वरी । ब्रह्मानंदलहरी हेलावल्या ॥२॥ अध्यात्मविद्येचे दाखविले रूप । चैतन्याचा दीप उजळला ॥३॥ तुका ह्मणे श्रेष्ठ ग्रंथ ज्ञानदेवी । एक तरी ओवी अनुभवा ॥ ४ ॥

ज्ञानियाचा गुरु स्वामी माहाराज । ह्मणती ज्ञानराज तुह्मा ऐसे । १ । मज पामरासी काय थोरपण । पायीची वाहाण पायि बरी ॥२॥ ब्रह्मादिका जेथें तुह्मा ओळंगण । इतरा तुळन काय तेथें ॥ ३ ॥ तुका ह्मणे नेणो युक्तीचिया खोली । ह्मणोनी ठेविली पायी डोई ॥ ४ ॥

### आरती ज्ञानेश्वराची.

आरती ज्ञानराजा । महाकैवल्यतेजा ॥ सेविती साधुसंत । मन वेधला माझा ॥ धृ० ॥ लोपले ज्ञानजगी । हित नेणती कोणी ॥ अवतार पांडुरंग । नांव ठेविले ज्ञानी ॥ आरती० ॥ ज्ञानेश्वर विश्वमूर्ती । सोहंप्रकाशज्योती ॥ विश्वजन व्यापुनीया । तुझी अगाध कीर्ती ॥ आरती० ॥ प्रकट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केले ॥ रामाजनार्दनी पायीं मस्तक ठेविले ॥ आरती० ॥

### आरती हैबतरायाची.

जयदेव जयदेव हैबतराया । आरती वोवाळीते वंदुनि तव पाया धृ० ॥ जैसे पंढरिये नामदेव संत । तैसे अलकावती हैबती भगवन्त ॥ जयदेव० ॥ ज्ञानेश्वरकन्या विनवी निजभावें । येउनि श्रीहरिनें मज पर्णुनिया न्यावें ॥ जयदेव० ॥

# अनुक्रमणिका.



पृष्ठ.

॥ श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

नमः श्रीआदिनाथाय नमो मत्स्येंद्ररूपिणे ॥
गोरक्षप्रभवे गैनीनाथायाथ निवृत्तये ॥१॥
परंब्रह्म परंधाम सच्चिदानंदविग्रहम् ॥
ज्ञानेश्वरमिति ख्यातं प्रणमामि गुरुं हरिम् ॥२॥
ज्ञानेशो भगवान्विष्णुर्निवृत्तिर्भगवान्हरः ॥
सोपानो भगवान्ब्रह्मा मुक्ताख्या ब्रह्मचित्कला ॥३॥

श्री गुलाबरावमहाराजकृत.

# ॥ भक्तिपदतीर्थामृत. ॥

मोक्षो यत्प्रणिधानेन प्रणवो यस्य वाचकः ॥
क्लेशकर्मविपाकाद्यै रस्पृष्टं हरिं नुमः ॥१॥

अर्थः—भगवान् पतंजलींनीं योगशास्त्र प्रतिपादन करितांना योगसिद्धि ज्या ईश्वरप्रणिधानांनीं सांगितली तीं तीन सूत्रें ग्रहण करून चवथी आमची उपास्यदेवता श्रीकृष्ण त्याप्रत वंदन करितों.

पतंजलिप्रणीत योगदर्शन समाधिपादसूत्रें.

'ईश्वरप्रणिधानाद्वा । तस्य वाचकः प्रणवः । क्लेशकर्मविपाकाशयै रपरामृष्टः पुरुषविशेष ईश्वरः'॥

अर्थः—ॐ हेंच ज्याचें नांव आहे; अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश हे पांच क्लेश; संचितक्रियमाणादिकर्म; शरीरादि विपाक; व सुखदुःखादि आशय; ह्या सर्वांहून रहित; आकाश म्हणजे

दहर; अग्नि—ज्ञान व सूर्य; लक्ष्मी—भगवच्छक्ती; काम—प्रीती; चंद्र—आल्हाद व मन; शिव—परमानंद; हीं सर्व मिळून झालेलें ज्याचें नाम; त्या हरीप्रत आम्ही स्तवितों. हरि शब्दाचा उद्धार अथर्ववेदोक्त मातृका यंत्रांतून केला आहे; व वेदाच्या आरंभी ही 'हरिः ॐ' असें स्मरण करावें.

ॐ नमः श्रीआचार्या । ब्रह्मोपदेशक गुरुवर्या । जी जी स्वामी आत्मचर्या । कारणकार्यविरहिता ॥१॥ सर्वांसि द्यावें आपुलें सुख । निवृत्त करावें त्रिविध दुःख । या लागीं सगुणात्मक । जाहलेती देवा ॥२॥ साचा पोहणार असूनि भला । मृगजळडोहीं बुडाला । हें जाणोनि कर दिधला । काढावया ॥३॥ कां अमृतें न होवोनि तृप्त । लाळ घोटी क्षुधार्थ । तयाच्या प्रेमदुग्धदानार्थ । आगमन कीं ॥४॥ तरी तुमचे कृपाबळें । परमप्रीतीच्या कल्लोळें । पतिपत्नीभक्तीचे डोहळे । कीं सोहळे स्वानंदसुखाचे ॥५॥ ते आपण एकीचि न भोगावे । कांहीं दुजियासि ही द्यावे । हें उदारपण स्वभावें । तुमचा प्रसादू ॥ ६ ॥ तो उल्हासरूपें चित्तीं । अधिष्ठाता होवोनि ग्रंथीं । प्रारंभ करी महावाक्यार्थीं । भक्तिपदतीर्थामृतनामें ॥ ७ ॥ तरी माये ! आतां । माझी ग्रंथकर्तेपणाची वार्ता । नेवोनि कृपाकर माथा । ठेविजे स्वामी ॥ ८ ॥ इया बोबडिया बोला । प्रभु तात संतोषला । मग ग्रंथीं आश्रयो दिधला । उठीं म्हणे ॥ ९ ॥ ती ज्ञानेश्वरमाउली । करूनि कृपेची साउली । प्रेमप्रसादें पान्हावली । मुखीं स्तन घाली स्नेहवशें ॥ १० ॥ तें दुग्ध पिऊनि गोमटे । जन न्यावया भक्तिपेठे । ग्रंथजहाज प्रकटे । पंचकें केलें ॥ ११ ॥ तेथ प्रथम अध्यावो । भक्त्युपक्रम नावो । बोलिजे सावेवो । संतकृपा ॥ १२ ॥ तरी हे जीवाप्रती । व्हावी कीं ब्रह्मप्राप्ति । याचि नांव श्रुति । मोक्ष वदती ॥ १३ ॥ जीव आणि ब्रह्माचें । अत्यंत ऐक्य साच । परी जीवा संसाराचें । दृढ बंधन ॥ १४ ॥ तो संसार उपाधिकृत । केवळ ज्ञानें नाहीं जात । उपाधि नासलियावीण त्वरित । ऐका दृष्टांत ये विषयीं ॥ १५ ॥ दर्पणाच्या समोर । जपाकुसुमाकार । धरितां रक्तप्रकार । दर्पणी उठे ॥ १६ ॥ तें दर्पण नेत्रीं पाहतां । तरी न जाय रक्तता । यासी उपाय तत्वतां । एकचि आहे ॥ १७ ॥ दर्पण फोडोनि टाकावें । अथवा जपाकुसुम वेकावें । किंवा संबंधीं न राखावें ।

एकमेकां ॥ १८ ॥ यांतून एक कोलियावीण । मूळरूपा नव्हे दर्पण । रक्तभ्रांती तेहि जाण । निवृत्त नव्हे ॥ १९ ॥ या दृष्टांता धरोनि आतां । निश्चय साधू दार्ष्टांता । श्रुती याचि सिद्धांता । प्रतिपादिती ॥२०॥ विपरीत ज्ञानोपाधी गाढी । जीवासी बंधन वासना वेढी । ते ज्ञानें निवृत्त नव्हे फुडी । साधक म्हणोनि ॥ २१ ॥ ज्ञानें उपाधि मात्र कळे । परी न निरसे कोणे काळे । येथ उपाधि उपाधेय वेगळे । करितांही न येती ॥ २२ ॥ सर्वसत्तास्फुरण आत्मा । तयाची नाशरूप नाहीं प्रमा । विपरीतज्ञानवासना गरिमा । सत्संबंधहि सुटेना ॥ २३ ॥ आणि उपाधि नासिलियावीण, न । प्रकाशे सत्सुखज्ञान । उपाधि तंव वासना गहन । ती ज्ञानेंकरून नासेना ॥२४॥

श्रुतिः— ‘ भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥
क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥
यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामाय स्वहृदि श्रिताः ॥’

या सर्व स्फुटश्रुति । स्वयें ऐशा बोलती । कीं हृदयांतील जाती । वासना जेव्हां ॥२५॥ तेव्हांचि तो जीवन्मुक्त । अन्यथा पांडित्यावृत । येणें बोले अनुमित । उपाधिनाश ॥२६॥ केवळ ज्ञानेंकरून । उपाधीसि नाहीं मरण । आणि उपाधि मेलियावीण । अपवर्ग नाहीं ॥२७॥ हा शुद्ध सिद्धांत । तरी उपाधि नाशावया निश्चित । अन्य कारण यथार्थ । शोधिलें पाहिजे ॥२८॥ तें कारण ईश्वरभक्ति । निष्कामरूपा अलौकिकी प्रीति । देवगुरूंचे ठायीं रीति । समानची ॥२९॥

श्वेताश्वतरोपनिषत् । अध्या० ६-२२

‘यस्य देवे पराभक्ति र्यथा देवे तथा गुरौ ॥
तस्यैते कथिताह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः॥१॥’

जैसी परमप्रीति ईश्वरीं । तैसीच गुरुचरणांवरी । तेणें तत्प्रतिपादित अविकारी । अर्थप्रकाश होय ॥ ३० ॥ आणि गीतेमाजी भगवंत स्वयें भक्त्युत्कर्ष सांगत । ज्ञानकर्मादि समस्त । निषेधुनि ॥३१॥

भगवद्गीता । अध्या० १४ श्लो० ६-८

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम्॥
सुखसंगेन बध्नाति ज्ञानसंगेन चानघ ॥६॥

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासंगसमुद्भवम् ॥
तन्निबध्नाति कौंतेय कर्मसंगेन देहिनम् ॥७॥
तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ॥
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥८॥

सत्वगुणपाशें बांधी ज्ञान । रजोगुणपाशें कर्मबंधन । तमोगुणपाशें व्यर्थ मरण । चेत देहा ॥३२॥

भगवद्गीता । अध्या० १४ श्लो० २६

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ॥
स गुणान्समतीत्यैतान्ब्रह्मभूयाय कल्पते ॥१॥

एवं हें सकळ बांधिती । म्हणोनी अव्यभिचारिणी भक्ति । माझी करितां त्रिगुणाप्रति । वेगळा होय ॥३३॥ त्याच्या ब्रह्मरूपउपासना । तोचि ब्रह्मप्रापक जाणा । कीं जीवन्मुक्तीच्या गृहीं पाहुणा । तोचि एक ॥३४॥ जीवन्मुक्तही जालियावरी । निरपेक्ष कृष्णसेवा करी । तयाचा विकला हरी जीवें भावें ॥३५॥ एवं हरिभक्त्युत्कर्ष भला । नारदशांडिल्यें निरोपिला तोचि अवलंबूनि वहिला । सांगिजेल ॥३६॥

शांडिल्यप्रणीत भक्तिमीमांसा प्रथमाह्निक सूत्र १-२

अथातो भक्तिजिज्ञासा ॥ १ ॥
सा परानुरक्तिरीश्वरे ॥ २ ॥

जेणेंकरोनि कर्मयोगज्ञान । अलंबुद्धि पावला जाण । तो अधिकारी भक्ती-कारण । तें भक्तिलक्षण ऐकावें ॥३७॥ फलाशा गौणी प्रीति । ती विषवत् त्यागूनि चित्तीं । नित्य राखणें परानुरक्ति । या नांव भक्ति शांडिल्य म्हणे ॥३८॥ आणि नारदाचें मत । ऐसेंचि असे विख्यात । असाध्य स्वयंफलरूप निश्चित । अनिर्वचनीय ॥३९॥

नारदभक्ति सूत्रः—

'सात्वस्मिन् परमप्रेमरूपा'

गौणी परा त्यागूनि निश्चिती । जे अखंड संयोगीं वियोग प्रीति । ती प्रेम लक्षणा पूर्णभक्ति । श्री नारदोक्ति अनुवादू ॥४०॥ प्रेमाचें कैसें लक्षण । प्रभु सूत्रें वदती आपण । तेचि येथें प्रमाण बोलिजेल ॥४१॥

नारदभक्ति सूत्र:--

'अनिर्वचनीयं प्रेमस्वरूपम्'

ज्ञानकाळीं देहप्रीति । ज्ञानकाळीं अहंब्रह्मासक्ति । दोहीं त्यागेंअन्वयें
रु प्रीति । या नांव भक्ति अनिर्वाच्य ॥४२॥ जारिणीचें परपुरुषीं मन।
विरहिणीचा विरह गहन । तो विषयभाव वेगळा करून। हरिरूपीं
योजन ते भक्ति ॥४३॥ पुत्रादिरूपा गौणी भक्ति । विरहिणीरूपा
मप्रीति । ही नारदीय भक्ति महावाक्यार्थीं स्थित असे ॥४४॥ तो
ा वाक्योपदेशू । ज्ञानेश्वर कृपा औरसू । पुढिलिये प्रसंगीं विशेषू ।
संडेल ॥४५॥ तो संतीं सेविजे सुखें । मज अवधान द्यावें निकें ।
पुले जाणोनी कृपाटके । पहावें मज ॥४६॥ असो या समस्त ओंविया।
ाय सूत्रीं गुंफोनियां । श्रीज्ञानेश्वराचार्यपायां । कुसुममाळ अर्पिली ॥४७॥

हरिःॐ तत्सदिति श्रीसद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे ओंविछंद-
भक्तिपदतीर्थामृते श्रीगुरुस्तवनरूपमंगलाचरणपूर्वक भक्त्युपक्रम
रूपणनाम प्रथमस्तरंगः ॥ श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु ॥

---

॥ अध्याय २ ॥

ॐ तत्सत् श्रीसद्गुरु सर्वत्रयशस्वी ज्ञानेश्वरमाउली समर्थ.

नमो श्री सद्गुरु माये । प्रेमें वंदोनियां पाय । हा बालपणाचि
। विश्वाधिष्ठाता ॥१॥ सांख्याचिया आळणी । योगाचिया पाणी ।
ाचिया तरुवनीं । वसंत तूं ॥२॥ कनकबीज सेवितां । आपणा स्वयें
रितां । ब्राह्मण असोनी तत्वतां । शूद्र मी म्हणे ॥३॥ तेवीं आत्म-
या विस्मृती । जे जे देखे द्वैतापत्ति । ती अविद्या तेथ आरूढ चित्तीं।
जीव बोलती सलबद्ध ॥४॥ तिये अविद्येचा चुरा । करावया दातारा।
ने आलेती अवतारा । कारुण्ययोगें ॥५॥ आणि आपुलें म्हणोनि
। मोक्षाचें तंडुल सुरंग । भोजनयोगें अनुराग । वाढिसी कृपें ॥६॥
ा कृपादृष्टीपुढें । बंधासी मोक्षपण रोकडें । चैतन्याचैतन्य फुडें ।
ट होय ॥७॥ मोक्ष द्यावया उदार । न पाहसी कोणाचा अधिकार।
ां पाहणें हा विचार । नसे तव ठायीं ॥ ८ ॥ नाहीं तें
आहे वाटे । तेव्हां विस्मृति हे थाटे । माये तूं भेटलीस

जरी वाटे । तरी हें गोमटें परब्रह्म ॥ ९ ॥ ऐसिया वो माय बहिणी । जीवभाव तनुमनचरणीं । वाहिले आतां कृपा करोनि । अवधान द्यावें ॥ १० ॥ मागा उपक्रम बोलिला । जो भक्तिबोधू आला । तो पाहिजे फीर झाला । महावाक्योपदेशू ॥ ११ ॥ तेथ गुरूचेनि कृपें । महावाक्यही सोपें । भक्तीचेनि आटोपें रूपासि ये ॥ १२ ॥ असो हें काय बोलणें । सद्गुरुभक्तीचिया पुढें वाणें । परब्रह्माहि न्यून होणें । निःसंशय ॥ १३ ॥ तरी तो महावाक्यार्थू । सद्गुरुकृपा स्फूर्ति परमार्थू । ज्ञानेश्वर नामें प्रेमार्थू । फळला ठाके ॥ १४ ॥ चारी वेदांचे चार । असती पैं सःचार । त्या माजी परिकर । तत्वमसि ॥ १५ ॥ 'वेदानां सामवेदोऽस्मीति' । स्वयें मत्कांतोक्ति । ह्मणोनी त्या वेदीचें निश्चिती । वाक्य श्रेष्ठ ॥ १६ ॥ तेथ 'तत्पद' विवरण । करावें हें उपपन्न । लागे ह्मणोनि निरूपण । अवश्य वाटे ॥ १७ ॥ जंव ज्ञात नाहीं पदार्थ । तंव न कळे महावाक्यार्थ । या लागीं तत्पदार्थ । निरूपिजेल ॥ १८ ॥ अखंड सच्चिदानंद ब्रह्म । हा महावाक्य विषय परम । वाच्यांश लक्ष्यांशतः उपरम । अर्थ कीजे ॥ १९ ॥ तत्पदार्थाचें द्विविध लक्षण । ताटस्थ्य आणि स्वारूप्य जाण । वाच्यांश तें तटस्थ लक्षण । स्वरूप लक्षण लक्ष्यांशू ॥ २० ॥ तटस्थ लक्षणाचेनियोगें । ईश्वरा बंधन नाहीं अंगें । गौण भजन मार्गे । या लागीं विवारिजे ॥ २१ ॥ जैसे प्रधानादि रणीं झुंजतां । जय आणिती प्राप्ता । परी जयश्री तत्वतां । रायासीच वरी ॥ २२ ॥ तैसें मायेनें निर्मिलें । आणि हरीवरी कर्तृत्व आलें । परी स्वयें नाहीं केलें । ह्मणोनी तटस्थ ॥ २३ ॥ हें तटस्थ लक्षण निर्गुण । तो वाच्यांश निरसोन । स्वरूपलक्षण सगुण । लक्ष्यांश घेईजे ॥ २४ ॥ सच्चिदानंद अखंड लीला । षड्गुणैश्वर्यानंत्यमाला । अभिमानरहित स्वातंत्र्यशाला । स्वरूपलक्षणाश्रितत्व ॥ २५ ॥ कार्याहूनि जीचें । वेगळेपण न बोलवे वाचे । तें स्वरूप मायेचें । सदसद्वि लक्षण ॥ २६ ॥ तेथ आभासें अधिष्ठान । तें ईश्वराचें तटस्थ लक्षण । येथ आभासवादें करून । प्रतिबिंब न घेईजे ॥ २७ ॥ सत्योपाधिसंयोगें । सत्याधिष्ठानाचेनि संगें । जे असत्प्रतीति होऊं लागे । त्या नांव प्रतिबिंबता ॥ २८ ॥ आणि रज्जुवरी सर्पाध्यास । तो विवर्तभ्रम आभास । सर्पाभासें रज्जूनाश कदापि नोहे ॥ २९ ॥ आणि प्रतिबिंब-

चादें तत्वतां । उपाधीसि येत सत्यता । आणि उपाधि सत्य होतां द्वैतचि नित्य ॥ ३० ॥ ह्मणोनि ऐसें येथ नाहीं । हा मृगजलवत् आभास पाहीं । मृगाप्रति बंधनहीं । मानवा दर्शन तुसुधें ॥ ३१ ॥ आणि चक्रवाका प्रति । कांहींच नसे प्रतीति । तेंवी भगवद्भक्तांप्रति । नाहींच विश्व ॥ ३२ ॥ कां सत्पतिव्रतेचे ठायीं । वेश्यास्त्रीपणाची कल्पना नाहीं । तेंवि भगवद्भक्तां कांहीं । उमटेचिना हें ॥ ३३ ॥ ती यावया भगवद्भक्ति । सद्गुरुकृपाचि उपपत्ति । तन्मुखें महावाक्योपदेशप्राप्ति । भजनप्रतीति तैं लाहे ॥ ३४ ॥ द्विविध भजनाचें शीळ । मर्यादा आणि प्रेमळ । मर्यादा तो वाच्यांश केवळ । प्रेमळ तो लक्ष्यांश कीं ॥ ३५ ॥ ईश्वर आहे जगत्कर्ता । तोचि कर्मफळदाता । तयासि आपण न भजतां । तो शिक्षा देईल ॥ ३६ ॥ ऐसें मानूनि करणें भजन । तेथ मायारूप अधिष्ठान । आणि ईश्वर जरी जाहला प्रसन्न । तरी तटस्थ राहे ॥ ३७ ॥ कां भानूचिया साक्षाकारें । यज्ञ यागादि कीजे द्विजेंद्रें । भानु आपुलेनि आकारें । तटस्थ असे ॥ ३८ ॥ तेंवि आपुलेनि विसरें । शरीरभय वाटे दुसरें । तदर्थ जें भजन बारे । तें मायाव्यापारें । तटस्थत्व ॥ ३९ ॥ ऐसा हा वाच्यांश पहिला । आतां दुजा पाहिजे ऐकिला । जेणें मोक्ष काम चित्तीं धरिला । तदर्थें भजन करी ॥ ४० ॥ आधीं आपणा बंधन कल्पिलें । मग मोक्षासाठीं हरीस पुजिलें । तें सात्विक मायारूप जाहलें । तटस्थ भजन ॥ ४१ ॥ ऐसें तटस्थयुक्त भजन । तें वाच्यांशें मिथ्या जाण । आतां लक्ष्यांशस्वरूपलक्षण निरूपिजेल ॥ ४२ ॥ जाणोनि आपुल्या स्वरूपासी । भेद कांहीं न ठेवी मानसीं । मग द्वैतअद्वैत विशेषीं । होऊनि राहे ॥ ४३ ॥ हा त्वंपदाचा लक्ष्यांश विचार । तो पुढील प्रसंगीं प्रकार । प्रस्तुत सगुण साक्षात्कार । लक्ष्यांश कीजे ॥४४॥ 'त्वंपद' लक्ष्यांशें आपण उमजला । तो येथ अधिकारी झाला । जयाचा समूळ गेला । विपरीत भावो ॥४५॥ जेव्हां देहाभिमान गळे । तेव्हांचि कर्मे आटलीं सकळें । मग सुखदुःखरूप कर्मफळें । बाधतीच ना ॥ ४६॥ जेंवि पतिगृहीं राहणें । तैं मातृगृहाभिमान त्यागणें । तरीच ऋतुसमयीं भोगणें । कांतसुखा ॥४७॥ तैसा 'तत्पद' लक्ष्यांश घेणें । तरी 'त्वंपदें' कामना सोडणें । आपणा उमजूनि होणें । 'असि'पदीं ऐक्य ॥ ४८ ॥ रज्जूवरी सर्प भासला । तरी रज्जु सर्प नाहीं जाहला । तैसा मायागुणें

हरि कर्ता वाटला । परी अकर्ता तो ॥ ४९ ॥ सापाचे पिळादिक धर्म । ते दोरींतहि उपलब्ध परम । तैसे स्वातंत्र्यादिक उत्तम धर्म । स्वरूपें सत्यचि हरिपाशीं ॥ ५० ॥ यालागीं शिक्षा देईल मातें । ऐसिया धरूनि भयातें । राखों पाहणें शरीरातें । नीच भजन तें हा ठावो ॥ ५१ ॥ आणि कर्मफळें होतु कांहीं । तयांते आश्रयचि नाहीं । हें जगचि भासे लवलाहीं । सगुणाकारें ॥५२ ॥ जैसा सर्पाभास गेला । तरी रज्जु वर्तुळ नाहीं झाला । तो पीळरूपें पसरला । जैसा तैसा ॥ ५३ ॥ तेंवि हें जग मिथ्या वाटलें । तरी हरीचें साकारपण नाहीं मोडलें । तें सत्य म्हणोनि राहिलें । लीलाविग्रहें ॥ ५४ ॥ मग गंगेचा बिंदु मुखीं येतां । श्रेष्ठ जेंवि गंगारूपता । तेंवि एकदेशीय ही मूर्ति तत्वतां । पवित्र करी ॥ ५५ ॥ जोंवरी नाहीं ऋतुप्राप्ति । तोंवरी कांतभय चित्तीं । आणि वेळ अनुभवलिया प्रीति । मग दर्शनीं भीति नाकळे ॥ ५६ ॥ तेंवि जंव नुमटे हरिभजन । जंव स्वरूपसाक्षात्कार नव्हे गहन । तोंचि हें तटस्थ लक्षण । भयदातें ॥ ५७ ॥ श्रवणापासोनि आत्मनिवेदनावरी । स्वरूपसाक्षात्कार कुसरी । चढतां लीलाविग्रहा धरी । ऐश्वर्यमंदिरीं सुख ठाके ॥ ५८ ॥ मग स्वतंत्र षड्गुणैश्वर्यसंपन्न । साकार अखंड सच्चिदानंदघन । हें तत्पदलक्ष्यांशस्वरूपलक्षण । प्रत्यया येत तद्रूपें ॥ ५९ ॥ मग विषय जे जे दिसती । ते ते साकार श्रीपति । ही व्रजगोपींची प्रतीति । वाखाणिली ॥ ६० ॥ जेंवि आपुलें धन देतां । अलंकारीं सोन्याची वार्ता । सोनार पाहे त्याचि अर्था । येथहि ठावो ॥ ६१ ॥ आधींच सोन्याचें प्रियपण । वरी अलंकार सुंदर पूर्ण । दोहीं दृष्टी पाहतां जाण । सौंदर्यचि पिकलें ॥ ६२ ॥ तेंवि स्वरूपें स्वतंत्र हरि । परी चतुर्भुज सगुणाकारी । दोहीं दृष्टी निर्विकारी । लीलाचि ते ॥ ६३ ॥ एवं चिन्मय लीलामात्र । हें विश्वचि झालें स्वतंत्र । आतां द्वैताद्वैतवाद अणुमात्र । प्रत्यया न येती ॥ ६४ ॥ रज्जु सर्पाभासीं पाहतां । सर्पभय वाटे तत्वतां । म्हणोनि तो निरसन करितां । सुख बहु ॥ ६५ ॥ आणि सुवर्णाचे अलंकार । चित्ता वाटती मनोहर । ते मोडावे हा विचार । मूर्खेहि नाणी ॥ ६६ ॥ जोंवरि सुवर्ण तोंवरि पाही । अलंकारासि मिथ्यता नाहीं । कोणीतरी अवस्थाहि । घडलीच राहे ॥ ६७ ॥ तैसा नोहे सर्पाभास । दीप आणितां मिथ्यात्व त्यास ।

तेवींचि या सिद्धांतास । अबाध्यता ॥ ६८ ॥ मी देह हा अविद्याभुजंग । तेणें भय वाटे चांग । तो निरसणें हा राग । सहजचि ॥ ६९ ॥ परी अधिष्ठानसुवर्णी । चतुर्भुज चक्रपाणि । तो निरसावा हें मनीं । आणी तो मूर्ख ॥ ७० ॥ न मानलिया एक मूर्ति । तरी काय मोडे लीलाकीर्ति । आणि साकारत्वचि तयाप्रति । भूषणावह ॥ ७१ ॥ केवळ मन हरणें । हें सों नव्हे सुवर्णें । तें कार्य करणें । अलंकारेंचि ॥ ७२ ॥ आणि अलंकार मोडतां दृष्टी । सोन्यासि कोणी तरी आकार शेवटीं । तरी मोडणियाच्या हटीं । पडावें कां ॥७३॥ तैसा मनासि अस्पर्शन । नयनासि अदर्शन। तेथ जीवभाव लीन । करितांचि न ये ॥ ७४ ॥ आणि वास्तवपणें पाहतां । प्रभूसि सत्यचि साकारता । लययोगें या शुद्धार्था । जाणती संत ॥ ७५ ॥ मग परमाणूंचा पुंज । कालयोगीं रूपकंज । तो हा 'तत्'पदलक्ष्यांश निकुंज । स्वरूपें श्रीकृष्ण ॥ ७६ ॥ तेथ पातिव्रत्याची वार्ता । मिळवोनियां परमार्था । चरणीं वाहिली समर्था । ज्ञानेश्वराचिया ॥ ७७ ॥ श्रीज्ञानेश्वरसद्गुरु आई । आत्मा निवेदिला तव पायीं । आतां 'त्वं'पदार्थभक्तिकथनीं । अवधान पुढें ॥ ७८ ॥ तुझेंचि कृपेंकरून । जननी हा ग्रंथ हो पूर्ण । आणि शेखीं अर्पण । ज्ञानेश्वर माय तव चरणीं ॥ ७९ ॥ ' हरिः ॐ तत्सत् ' इति श्रीसद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे, ओंवीछंदबद्धे, भक्तिपदतीर्थामृते, 'तत्'पदार्थलक्षणद्वयनिरूपणानुरूप, श्रीकृष्णसाक्षात्कारजन्यभक्त्युपदेशो नाम, द्वितीयस्तरंगः ॥

॥ श्रीसद्गुरु ज्ञानेश्वरार्पणमस्तु. ॥

---

## ॥ अध्याय ३ रा. ॥

॥ श्रीसद्गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वरमहाराजकी जय ॥

जय जय वो स्वानंदसिद्धे । स्वसुखोदारे प्रसिद्धे । माये तुझिया अविरोधें । विश्व राहे ॥ १ ॥ जंव जंव तुझे पदकमळ । हृदयीं राहती केवळ । तंव हें मायाजाळ । पाहिलेंच नाहीं ॥२॥ तूं स्नेहाची खोली । निगमफळें भरली । परमकृपेची साउली । आपुलिया ॥ ३ ॥ वेदांचा

निरसावया अभिमान । तयाचा नियम टाकिला मोडोन । आपुली अन्यथाकर्तुशक्ति पूर्ण । उघड जना दाविली ॥ ४ ॥ शेखे जे शिणले संसारीं । ते तुझिया नामाधारीं । नाहींच या प्रत्ययाकारीं । सुखावले ॥५॥ तरी जें कां ज्ञान । तव कृपेचें आसन । किंबहुना तव अनुग्रहावीण । ज्ञान तें अज्ञान निश्चयें ॥ ६ ॥ जरी तव अनुग्रह जाहला जननी । तरी ज्ञान तें अज्ञानचि वाटे स्वमनीं । एवं दोन्ही दिठीं अज्ञानकाहणी । मिथ्या जाहली ॥ ७ ॥ तरी आतां ज्ञानाची चाड । उगीच कां करावी जळफड । ह्मणोनि तव भक्तीच गोड । वाटे माये ॥ ८ ॥ अंगें पूर्ण ब्रह्म जाहला । आणि तव पायां विसरला । तरी त्या ब्रह्मत्वाहूनि वहिला । नरक मानिला श्रेष्ठ आह्मीं ॥ ९ ॥ जंव तुझी भक्ति घडे । तंव ब्रह्म तें पायां पडे । हें जाणोनि रोकडें । तुजचि नमिलें ॥ १० ॥ ऐसिया वो कृपाळे । ज्ञानेश्वरमाते स्नेहाळे । तवपदसेवाप्रेम सोहळे । जन्म जन्म देईं कां ॥ ११ ॥ यावीण अन्य कांहीं । सर्वथा मागणेंचि नाहीं । आणि प्रोत्साहन देईं । तूंहि यातें ॥ १२ ॥ तुझेनि बोलें हा ग्रंथ । तव दास्य करो अखंडित । आणि ग्रंथकर्तृत्व हें जाणोनि त्वरित । तव दास्ययुत मी होवों ॥ १३ ॥ मागें 'तत्'पदलक्ष्यांशनिरूपण आधीं । निरूपिलें या शब्दीं । कीं 'त्वं'पद जाणे तोचि अवधि । अधिकारी येथ ॥ १४ ॥ माते 'त्वं'पदवाच्यलक्ष्यें । निरूपिजेल भक्तयपेक्षें । आणि श्रीगुरुकृपापक्षें । आश्रवूनि स्वयें ॥ १५ ॥ कर्मफळाची कामना मनीं । आणि दृढ देहाभिमानी । या अविद्येचा आश्रय करोनि । राहे जीव ॥ १६ ॥ हा मलिन 'त्वं'पदवाच्य पक्ष । आतां शुद्ध बोलिजे प्रत्यक्ष । जो आपणा इच्छी मोक्ष । संसार तोडोनि ॥ १७ ॥ तो जीव 'त्वं'पदवाच्य सात्विक । आभासरूपें सकलंक । परी हा अनादि कंटक । बद्ध आहे ॥१८॥ ईश्वर आभास तटस्थ लक्षणें । जीव आभास आरूढपणें । यालागीं श्रुति ऐसी ह्मणे । आभास दोन्ही ॥ १९ ॥ स्वरूपें जीवहि परब्रह्म । चेतनु ऐक्यत्वें परम । परी सामर्थ्यदृष्ट्या उपरम । दोघांमाजी ॥ २० ॥ हें द्वैतचि परी अद्वैत । आणि परमार्थीं नाही द्वैत । तें अकृत्रिम भक्तिप्रतीत । तेंचि घडे ॥ २१ ॥ कर्मफळकामना धरूनि भजन । तें 'त्वं'पद अशुद्धत्वें मिथ्या जाण । आणि मोक्ष इच्छा ही पूर्ण । तेंविचि असे ॥ २२ ॥ राजा आणि भिकारी स्वप्नींचा । जागेपणीं अधि-

कार नाहीं दोहींचा । तेवींचि विपरीतज्ञान स्वप्नींचा। बद्धमुक्त हा ॥२३॥ एक मृगजळीं बुडाला । दुसरा पार निघोनि गेला । या दोहीं शद्वांला याथार्थ्य नाहीं ॥२४॥ तेवीं बद्ध आणि मुक्त। हें कांहींहि नसोनि निश्चित मृग धांवती तैसा प्रतीत । विपरीतज्ञानें धांवतसे ॥ २५ ॥ हा सकळ 'त्वं'पदवाच्यांश । या दोहोंनि वेगळा लक्ष्यांश । तो बोलिजेल आतां विशेष । सद्‌गुरुकृपें ॥ २६ ॥ व्यतिरेकें चारी देह सांडोनि । अन्वयें ब्रह्मत्व तेथें मांडोनि । बुद्ध्यादि व्यापार तटस्थपणीं। साक्षी राहे ॥२७॥ कामनेचा खेळ सांडी । संचिताची मोडी मुंडी । पुढें वंशजात न मांडी । क्रियमाणाची ॥ २८ ॥ प्रारब्ध भोगी उदार । हा 'त्वं'पदलक्ष्यांशविचार । परी भक्तीविणें साचार । सकळहि व्यर्थ ॥ २९ ॥ मातृकुळासि संबंध सुटला । स्वामिनीपणाचा ठावो लाधला । इतुक्यानेंच न मानी पतिला । तरी पतिव्रता ते नव्हे ॥ ३० ॥ जरी वंदील पतीचे चरण । तरीच शोभे स्वामिनीपण । ना तरी वेश्या हें बोलण । माथांचि ये ॥ ३१ ॥ मग भलताचि चालवी सत्ता । तेणें अनेक कष्ट तत्वतां । आणि कष्ट करूनिहि मधुरार्था । बोलती न कोणी ॥ ३२ ॥ तैसा ज्ञानाभिमानें फुगला । 'मी ब्रह्म'पणें चवताळला । तो सर्वस्वी मुकला । भक्तिसुखातें ॥ ३३ ॥ लोहशृंखळा त्यागूनि । कनकशृंखळा घातली चरणीं । तरी चोर नेतील या भयें करूनि । व्याकुळ चित्त ॥ ३४ ॥ सोनेहि आपुलें नाहीं झालें । पाय दुखणें तैसेंचि राहिलें । बंधन असोनि उगेंचि आलें । रक्षकत्व माथां ॥ ३५ ॥ तैसा 'अहंब्रह्मास्मि'ज्ञानें फुगला । तो अभिमानबंधीं मात्र राहिला । आणि उत्थानभयें तयाला । व्याकुळता न सोडी ॥ ३६ ॥ प्रारब्धाचें दुखणें । न सुटे भोगल्याविणें । ब्रह्म होऊनि जगीं विचरणें । लाजिरवाणें हेंहि एक ॥ ३७ ॥ न भजतां ब्रजराज बिडा । तो सर्वदेशीं काळतोंडा । आह्मी ऐसिया भांडा । पुढें न राहूं ॥ ३८ ॥ ज्याच्या वेदोपदेशें वहिले । ब्रह्मज्ञानी पूर्ण झाले । शेखीं तयाचीं सोडितां पाउलें । ते ऋणदार जाहले हरीचे ॥ ३९ ॥ आणि ज्ञानाभिमानें हा एक न मानी । तरी काय हरिसत्ता होतसे उणी । परी हाचि अभिमानी । मेला ठाके ॥ ४० ॥ जेणें कामें तारिल्या गोपिका । तें सामर्थ्य तुज न ये लेंका । त्या लागीं तो भजावा निका । नंद नंदनु ॥ ४१ ॥ तूं जरी ब्रह्म जाहला आंगीं । तरी भौतिक देह न

सोडी तुज लागीं । आणि हरिभक्ति करितां देहसंगीं । ब्रह्मरूप होशिल ॥ ४२ ॥ हरि असोनि ब्रह्म पूर्ण । तूं ब्रह्मचि तनु ये घेऊन । तूं अन्वयव्यतिरेकें ब्रह्म होऊन । भौतिक तनु कैशी राहे ॥ ४३ ॥ तरी बापा ऐसें न करीं । ब्रह्मज्ञानशोभा निर्धारीं । 'त्वं'पदलक्ष्यांश जाणोनि हरि । 'तत्'पदलक्ष्य भजावा ॥ ४४ ॥ व्यतिरेकें टाकूनि देहाभिमान । अन्वयें साधावें दासपण । हे स्वरूपभजनाची खूण । सद्गुरुकृपें ओळखावी ॥ ४५ ॥ तो सद्गुरुकृपेचा विचार । 'असि'पदविवरण प्रकार । पुढलिये प्रसंगीं सविस्तर । निरूपिजेल ॥ ४६ ॥ तेथ फिटेल सकळ भ्रांति । प्रकाशक शुद्ध भक्ति । वेश्येसारखी लाजोनि मुक्ति । उभी राहील तटस्थ ॥ ४७ ॥ तें सुख मिळावया समग्र । आधीं वंदावे ज्ञानेश्वर । सांडोनि सकळ अहंकार । शरण साचार रिघावें ॥ ४८ ॥ शरण जातां अभयदात्री । ज्ञानेश्वर आई जगद्धात्री । तियेचिया अंगुष्ठपात्रीं । आत्मनिवेदनतंत्रीं राहूं ॥ ४९ ॥ 'हरिः ॐ तत्सत्' इति श्री सद्गुरु ज्ञानेश्वरकृपाप्रसादे ओंवीछंदबद्धे भक्तिपदतीर्थामृते 'त्वं'पदनिरूपणपूर्वक ज्ञानगर्वनिषेधसहित हरिभक्त्युपदेशो नाम तृतीयस्तरंगः ॥ श्री सद्गुरु ज्ञानेश्वरार्पणमस्तु. ॥

## ॥ अध्याय ४ था. ॥

### ॥ श्री सद्गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

जय जय वो मायबहिणी । साष्टांग प्रणाम तव चरणीं । ज्ञानेश्वर आई कृपारूपिणी । सद्गुरु माये ॥ १ ॥ सखे तव कृपेची नवाई । हें ब्रह्म पडे ठायीं । आपुले परावे कांहीं । नेणवे जें तें ॥ २ ॥ पूर्ण प्रेमाचें सुख । तुझे कृपें निष्कलंक । मिळे हाचि एक । शुद्ध भाव ॥ ३ ॥ म्हणोनि सखे आई । तुजवीण कांहीं । नलगे हें ठायी । ठेलेंचि आहे ॥ ४ ॥ कां नवयौवना सुंदरीतुनी । आपुली जे जननी । ती काढावी निवडूनि । तरीच बाळ ॥ ५ ॥ तैसें धुंडतां त्रिभुवन । हेचि लाधले पूर्ण । श्री ज्ञानेश्वरजननीचरण । स्तनपान तेंचि ॥ ६ ॥ तेथील पय पिऊनि गाढें । आणि तियेचेचि केलें निकोडें । हें 'असि'पद फुडें । विवरिजेल ॥७॥ 'तत्' 'त्वं'पदांचें ऐक्यकरण । या नांव 'असि'पद विवरण ।

आणि हेंचि ऐक्यभजन । सार सकळांचें ॥ ८ ॥ तरी भजन त्रिविध असे । तें दृष्टांतें सांगिजे आपैसें । तरी दृष्टांत विवरण दिसे । करणें आधीं ॥ ९ ॥ अहो कुमारवयापासूनि । कपाळीं कुंकूं लावी कामिनी । तैसें 'तत्'पदवाच्यांशस्मरणीं । अलंकारभजन ॥ १० ॥ आणि उपवर जैं होय । तैं लग्ननाम निघे स्वयें । पतिनाम ग्रहण होय । तेच वेळीं ॥ ११ ॥ त्या नामें करूनि ज्ञाण । पतीसि ओळखी आपण । आतां दार्ष्टांता निरूपण । ऐसेंचि कीजे ॥ १२ ॥ प्रेमळ पाहूनि सद्गुरुनाथ । द्वादशाक्षरी उपदेश करीत । तो जपतांचि अंतरस्थ । प्रकटे श्रीहरि ॥१३॥ येथवरी अलंकारभजन । आतां ऐका स्वरूप भजन । जेवीं झालियावरी लग्न । श्वशुराज्ञें करावी पतिसेवा ॥ १४ ॥ तैसें ध्यानीं भजतां हरि । संतआज्ञें परम कुसरी । सेवावा श्रीहरि । जगद्व्यापक ॥ १५ ॥ आणि जेव्हां होय ऋतुप्राप्ति । तेव्हां पहुडणें मंचकावरुती । तैसा भावें सेवितां श्रीपति । सगुणाकृति पुढें ठाके ॥ १६ ॥ येथवरी स्वरूपभजन । आतां ऐकिजे ऐक्यभजन । हेंचि 'असि'पदीं विवरण । निरूपिजेल ॥ १७ ॥ कामें व्यापितां स्त्रीपुरुष । जेवीं मीनती सुरतसुखास । तेवीं अंतर्बाह्य श्रीहरीस । पाहणें घडे ॥ १८ ॥ दोहींमधील एक काम । तैसें दोहींमधील एक प्रेम । हें 'असि'पद परम । विवरण असे ॥१९॥ 'तत्'पदवाच्यांश तटस्थ श्रीपति । 'त्वं'पदवाच्यांश कृत्रिम प्रीति । 'तत्'पदलक्ष्यांशस्वरूपलक्षण सत्पति । आणि शुद्ध प्रीति 'त्वं'पदलक्ष्यांश ॥ २० ॥ या दोहींचें ऐक्यकरण । तें अकृत्रिम भक्तिलक्षण । सर्वांभूतीं सुंदर सगुण । सांवळें दिसे ॥ २१ ॥ अलंकारार्थ सोन्याची आवडी । तेवीं भक्तीसाठींच ब्रह्मगोडी । भक्तीनेंचि तुटे बेडी । पशुत्वाची ॥ २२ ॥ 'सत्'पदें जड जग भासे । 'चित्'पदें जीव विलसे । 'आनंद'पदें प्रत्यय असे । श्रीहरीचा ॥२३॥ हें ऐक्यभजन परी औपचारिक । याहूनि वेगळें पारमार्थिक । काम भोगितां न भोगितां देख । पतिसेवा करणें हा पतिव्रता धर्म ॥२४॥ तेंवि हो न हो आनंदप्राप्ति । परी हरिपदीं सहज प्रीति । ते पारमार्थिक भक्ति । अकृत्रिम ॥ २५ ॥ पांढरें परिमळयुक्त नम्र । हो तीन्ही मिळूनि कापूर । तेंवि 'सत्' 'चित्' 'आनंद' साचार । तिन्हीहि एक ॥२६॥ ( चूर्णिका ):—'सत्'पदें असे । 'चित्'पदें भासे । 'आनंद'पदें विलसे । एकत्वपणें ॥ २७ ॥ परी हें बोलणें काय । 'सच्चिदानंद' हा ठाय ।

अस्तिभातिप्रियत्व होय । सहजाचि जें ॥ २८ ॥ जीभ आणि साखर । त्यांत रस एकचि मधुर । तेंवि सेव्यसेवक द्वैताकार । परी प्रेम साचार एकरूप ॥ २९ ॥ सेव्य श्रीहरि 'तत्'पदलक्ष्य । सेवकान्वयीं जीव 'त्वं'पदलक्ष्य । दोहींचें ऐक्य जो प्रेमपक्ष । 'असि'पद तें ॥ ३० ॥ सत्ता तेचि चैतन्य जाण । कीं चैतन्य तें आनंद पूर्ण । एवं 'सत्' 'चिद्' 'आनंद' मिळोन । एकचि वस्तु ॥३१॥ वृत्ति उठे तें 'सत्'पद । वृत्ति मुरे तें 'चित्'पद । अखंड हरिप्रीति तो आनंद । 'सच्चिदानंद' स्वयंरूप ॥ ३२ ॥ जेंवि पिता उत्तम शिकवी । तेंवि शिक्षार्थ हरी दुःख दाखवी । एरव्हीं हे ठेवी । स्वानंदाची ॥ ३३ ॥ केवळ 'अहं-ब्रह्मास्मि' ह्मणतां । व्युत्थान न चुके सर्वथा । तैसें नाहीं हरिभक्ता ह्मणोनि या पथा अनुसरावें ॥ ३४ ॥ अहो 'सत्'पद तें नामस्मरण । 'चित्'पद तें रूप सगुण । एक प्रीतिसुख गहन । आनंद तोचि ॥३५॥ 'त्याचा तूं आहेसि' हा मलिन गुण । 'तें ब्रह्म तूं आहेसि' हा सत्वगुण । 'हे हरि तें सर्व तूंचि' हें स्तवन । शुद्ध लक्ष्यांश महावाक्याचा ॥३६॥ 'तस्य त्वमसि' हें विपरीत ज्ञान । 'तदेवत्वमसि' हा ज्ञानाभिमान । 'तत्वमसि' रूप सगुण । हें ऐक्यभजन प्रेमरूप ॥ ३७ ॥ उपाधि उपा-धेय कांहीं । सांगावया वेगळे नाहीं । ह्मणोनि निर्गुणता नाहीं । सगुण-चि हे ॥ ३८ ॥ ते मी ह्मणतां अवघे सगुण । तरी येईल विराटाभि-मान । यालागीं श्रीहरीसि अर्पण । द्यावें दासपण आपणाकडे ॥ ३९ ॥ आपण आपुलें काम करितां । जेंवि संकोच न ये गृहिणीचित्ता । आणि पतिप्रार्थनें जातां । लीन होय ॥ ४० ॥ तैसा दासपणीं न लाजें । प्रभु-पूजनीं अनुरंजें । येरां सकळां विरजें । ज्ञानादिकां ॥ ४१ ॥ मग लक्षा-चिया दृष्टीं । अज्ञानाची नाहीं गांठी । तेथ ज्ञानाची उठाउठी । कां करावी ॥ ४२ ॥ दिवसा लावितां दिवा । तरी क्षीण मात्र व्हावा । येरव्हीं कार्यठेवा । कांहींच नोहे ॥ ४३ ॥ तैसा हा संकेत पूर्ण । येथ जें 'अहंब्रह्म'पण । तो उगाचि असे क्षीण । अकार्यरूप ॥ ४४ ॥ तरी ऐसें न करावें । दिवसा डोळां सूर्याचि पहावें । तैसें सकळहि अर्पूनि भजावें । पूर्ण हरीतें ॥ ४५ ॥ ज्ञानें हरवावें विपरीतज्ञान । भजनें सां-डावें ज्ञानोत्थान । मग जें प्रारब्ध दुःखरूप जाण । लागतां हरिचरण सुखरूप ॥ ४६ ॥ जें जें विश्वीं असे कांहीं । तें तें अवघें शेषशायी ।

तयाचें सुखग्राही । व्रजराज तो ॥ ४७ ॥ अमृताचा बिंदु घेतां । सिंधुसामर्थ्य चढे हातां । आणि सिंधुमाजी बुडोनि जातां । घाबरतां बिंदुहि घेववेना ॥ ४८ ॥ तेंवि भजतां कृष्ण रूपडें । 'सच्चिदानंद' हातां चढे । आणि 'सच्चिदानंद' बोलतां कोरडें । दोन्ही न मिळे ॥ ४९ ॥ एवं हें सकळ । जाणोनि भजे घननीळ । तोचि गा प्रेमळ । पूर्ण भक्त ॥ ५० ॥ मग मर्यादा करी पालन । तरी तो प्रेमचि जाण । एवं पद-द्वय वाच्य लक्ष्य मिळोन । भक्तीचि उरे ॥ ५१ ॥ ह्या भक्तिसुखाची नवाई । सकळ रसांची आई । करुणा दाखवी ठायीं । शांतिगुणें ॥५२॥ विश्वीं 'सच्चिदानंद' प्रीति । या नांव 'शृंगार' रस भक्ति । उल्हासें विश्व न भासे चित्तीं । या नांव 'वीर' रस ॥ ५३ ॥ जगदर्पणीं जळ भरी नयन । हें 'कारुण्य' असे गहन । जग चळे हरि न चळे हा अनुभव पूर्ण । 'शांति'रस जाण या नांव ॥ ५४ ॥ अखंड प्रेमानंद उन्माद स्थिति । या नांव 'हास्य' रसभक्ति । मर्यादापालनरूप प्रीति । 'भयानक' स्थिति या नांव ॥ ५५ ॥ भगवन्माहात्म्यज्ञान । हा 'अद्भुत' रस पूर्ण । तिटकारोनि पळे ज्ञानाभिमान । 'बीभत्स' रस जाण या नांव ॥ ५६ ॥ प्रणय कोपाची रीति । ही 'रौद्र'रसाची ख्याति । परम हरिविरहासक्ति । 'माधुर्य' भक्ति हा रसु ॥ ५७ ॥ जैसा आम्रवृक्षाचा सार । फुलामाजीच फळामाजीच अवघा साचार । तेंवि रासक्रीडेमाजी निर्धार । रसलीला सकळहि ॥५८॥ "सर्व गंधः सर्व रस इति" । हरी विषयींच बोले श्रुति । आणि 'रसंह्येवलब्ध्वाऽनंदी भवति' । हें भक्त्या परमानंदप्राप्ति । श्रुति सांगे ॥ ५९ ॥ रसरूप रसात्मा श्रीहरि । प्रेम-रस द्यावा त्या माझारी । मग रस पावूनि अविकारी । सुखाकारी नां-दावें ॥ ६० ॥ हें 'तत्' 'त्वं' ऐक्य 'असि'पद विवरण । रसरूप रस-ग्राहक रसाधिष्ठान । प्रेमें निर्भय ऐक्यपण । परि स्वामी श्रीकृष्ण स्वतं-त्रसेव्य ॥ ६१ ॥ हें द्वैतचि पूर्ण अद्वैत । हाचि शुद्ध भगवत्पंथ । येणें ज्ञानेश्वरचरणीं विश्रांत । व्हावें संतीं ॥ ६२ ॥ ही भक्तिरसाची काव-डी । अभिषेकावया परवडी । ज्ञानेश्वरमात्र चरण गोडी । धरूनि वाहि-ली ॥ ६३ ॥ तें चरणाभिषेकतीर्थ । उत्तर प्रसंगीं बोलिजेत । सावधान श्रोते संत । होवोनि अवधान देइजे ॥ ६४ ॥ सर्वसुखाची पुरवणी । सखे ज्ञानेश्वर माय बहिणी । जीवभाव वाहिला चरणीं । कृपाकर जन-

नी, शिरीं ठेवीं ॥ ६५ ॥ सख्या सद्गुरु मायबापा । ज्ञानेश्वर प्रभो करूनि कृपा । तुमचा चरण मार्ग सोपा । सर्वदा मिळो ॥ ६६ ॥ तरी जन्म जन्म आतां । द्यावें याचि परमार्था । यावीण अन्य सर्वथा । न लागे कांहीं ॥ ६७ ॥ 'हरिः ॐ तत्सत्' इति श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर-कृपाप्रसादे ओंवीछंदबद्धे भक्तिपदतीर्थामृते । संकेतद्दाष्टिमय परमगुह्य 'असि'पद विवरणपूर्वक त्रिविधभजनशुद्धभजनरूप भक्त्युपदेशोनाम चतुर्थस्तरंगः ॥ श्रीसद्गुरु ज्ञानेश्वरार्पणमस्तु. ॥

## ॥ अध्याय ५ वा. ॥

## ॥ ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

ॐ नमो जी विश्वंभरा । सच्चिदानंदा करुणाकरा । भक्तवत्सला ज्ञानेश्वरा । स्वसुखोदारा सगुणरूपा ॥ १ ॥ तूं आपुलिया माउली । पूर्ण प्रेमें पान्हावली । हे सकळहि साउली । तुझीच माये ॥२॥ 'एकाकी न रमते' या बोला । साच करावयाच्या लीला । प्रीति वशें धरिला । सगुणाकारु हा ॥ ३ ॥ अन्वयें जाणावयाचें राहे । मग जाणणें अवघेंचि होय । तेंहि आटोनि सगुण पाय । कळले आह्मां ॥ ४ ॥ ऐसिया निजजननी । मौनें सकळ वाहिलीं चरणीं । आतां नित्यचि नमुनी । ऐसें ठेवीं ॥ ५ ॥ पतिकामभोगाचें फळ । पतिवीर्येचि उमटे बाळ । तरी पतीचें चरणकमळ । चिरंतन होती ॥ ६ ॥ तेंवि महावाक्योपदेशें भाक्ति । करितां पति होय श्रीपति । मग प्रेम पुत्र प्रेमाचि पति । प्रेमरूप युवती आपण ॥ ७ ॥ कामनेची रात्र गेली । प्रेमाची पहाट फुटली । प्रवरतां समूळ तुटली । ज्ञानसूर्य किरणांची ॥ ८ ॥ कोटिसूर्यासम सोज्वळ । कोटि चंद्रासम शीतळ । श्यामस्वरूप घननीळ । अंतर्बाह्य ॥ ९ ॥ नवविधा ती गौणी । जिज्ञासु अर्थार्थी भेदें करूनि । आर्त जे कां सत्वगुणी । तेहि गौणी बोलिजे ॥ १० ॥ करितां आत्मनिवेदन । तत्काळ तुटती त्रिगुण । मी सच्चिदानंद हा अभिमान । विरह भक्तीनें गळतसे ॥ ११ ॥ मग गौणी आणि परा । ह्या भेदासि नाहीं थारा । अवघीच एकाकारा । प्रेमलक्षणा ॥ १२ ॥ श्रवणें हरिगुणश्रवण । मुखें हरिगुण कीर्तन । करें श्रीहरिअर्चन । चरणपथगमन हरिगृहाचा ॥१३॥

घ्राणें निर्माल्यगंध । नेत्रें देखणें श्याम शुद्ध । मन बुद्धीतें सिद्ध । प्रेमामाजी ॥ १४ ॥ प्रेमचि इन्द्रियद्वारें उमटे । प्रेमचि बुद्धीं आत्मीं थाटे । परमात्ममाहात्म्यें एकवटे । प्रेमचि तो॥ १५॥ प्रेमाची पहावया परीक्षा।प्रेमचि प्रभु दे शिक्षा । प्रेमळ सख्याची प्रतीक्षा । प्रेमळातें ॥ १६ ॥ प्रेमळपणें दोनी । स्वयें गेले विरोनि । प्रेमळाचीच खाणी । सर्वेंद्रिया ॥१७॥ बुडालें लौकिकाचरण । तुटलें वैदिक बंधन । जितुके दिसती आश्रमवर्ण । सन्यासचि ते ॥ १८ ॥ कर्मफळांचा लाहो सुटला । कर्माचाही ठावो पुसला । अंतर्बाह्य स्पर्शिला । श्रीकृष्णप्रेमा ॥ १९ ॥ प्रेम सगद्गद प्राणयमन । प्रेमीं प्रत्याहरे मन । प्रेमधारणा रूप सगुण । प्रेमचि ध्यान कृष्णसेवा ॥ २० ॥ प्रेम ओसंडणसमाधि । पूर्वी यमनियमासनादि । आदि अंतीं त्रिशुद्धि । प्रेमचि एक ॥ २१ ॥ प्रेमींच एकपणें द्वैत । प्रेमेंच द्वैतीं अद्वैत । प्रेमेंच नासे द्वैताद्वैत । रासेश्वरीसहित हरि भेटे । ऐसा हा प्रेम शुद्धें । बोलतां न ये विनोदें । याच्याचि अविरोधें । सकळ हे ॥ २३ ॥ व्रजराज तात जया । आह्मीं लंपट तत्पायां । कमळीं भ्रमरी होवोनियां । जये रीति ॥ २४ ॥ कां गोपिकांची रजधूळ । आह्मासि करील प्रेमळ । हा विश्वास मनीं प्रबळ । धरोनि घननीळ चिंतितसें ॥ २५ ॥ माहात्म्यरूपें प्रेम पाहीं । जारपणाहि न ये देहीं । कामचि परी अधिक ठायीं । मोक्षाहूनि पैं केला ॥ २६ ॥ ऐसी जियांची स्थिति । त्या गोपिकादि प्रीति । वंदनादि पुढतपुढतीं । पन्नासो कीं ॥ २७ ॥ जया स्थळीं विरूपाक्ष । मृदंगवादन धरी पक्ष । तें सांवळे ब्रह्म प्रत्यक्ष । प्रीतीनें होऊं ॥ २८ ॥ आणि ब्रह्म होणेंहि सकळ । जयाच्या पायांहूनि केवळ । ओंवाळिजे तो घननीळ । सबाह्यांतरीं पाहूं ॥ २९ ॥ "शिवं भूत्वा शिवं यजेदिति" । ही साह्य नेऊं सखी श्रुति । मग तिलाचि प्रार्थोनि भक्ति । मागोनि घेऊं ॥ ३० ॥ प्रेमाचा करूं कळस । हरीस अर्पू ब्रह्मरस । श्रीकृष्णपदीं सावकाश । सख्यानो भृंगी होऊं चला ॥ ३१ ॥ वाच्य लक्ष्य मिथ्या पक्ष । सर्वदेशी एकदेशी प्रत्यक्ष । स्वयें श्रीकृष्ण सगुण अपरोक्ष । अनुभव साक्ष प्रीतीचा ॥३२॥ परमप्रेमाचें रूप । तो हा व्रजींचा भूप । वेणुनाद संकल्प । सत्यत्वें ठेला ॥ ३३ ॥ सनकादिकांची ध्येय मूर्ति । नारदप्रभूची गेयली कीर्ति । रासमंडळीं प्रेममूर्ति । चला पाहूं सख्यानो ॥ ३४ ॥ व्यापक सुख जें

भरलें । तें संपुटीं एकवटलें । हें ब्रह्ममुसें ओतलें । सांवळें रूप ॥३५॥ जयाचें नाम घेतां वाणी । ब्रह्मरूपत्व शरीरा लागुनी । अस्मत्कांत ते प्रेमदानीं । पद निर्वाणीं सेवूं त्यांचे ॥ ३६ ॥ कल्पना आणि अभिमान । दोन्ही प्रेमरूप जाण । 'सच्चिदानंद' हें खूण । प्रेमामाजी ॥ ३७ ॥ भोळा आणि ज्ञानवंत । प्रेमीं समानचि निश्चित । हें फळ तोडितां महावाक्यार्थ । तरूसम झाला ॥ ३८ ॥ वसंत शृंगार रति । मोह मन्मथ स्थिति । सकळहि श्रीकृष्णप्रीति । रूपा आली ॥ ३९ ॥ वृत्तीचें वृत्तिपण गेलें । जीवाचें जीवपण मेलें । मुक्तिबीजासि अंकुर आले । भक्तिसुखाचे ॥ ४० ॥ हें काय गौण बोलणें । बीज आणि फळ भक्तिच होणें । त्यांतील प्रेमरस चाखणें । नंदनंदनें मत्कांतें ॥ ४१ ॥ पडला अविद्येचा विसर । बुडाला विद्येचा अंकुर । अवघा झाला अविकार । श्रीकृष्णप्रेम ॥ ४२ ॥ जळाली बंधनस्थिति । पळाली लाजोनि मुक्ति । आविष्करिली भक्ति । अकृत्रिम ॥ ४३ ॥ हा आविर्भावो भला । परम गुह्यें निरूपिला । दशोपनिषदां आला । निषेधभावो ॥ ४४ ॥ तो निषेधचि स्तवनविधि । श्रुतिपणें गोपीमांदी । प्रेम साधोनियां संधि । श्रीकृष्णपदीं उडी घाली ॥ ४५ ॥ करुणेचे काढोनि कोंब । श्रीकृष्णवृक्ष स्वयंभ । प्रेमतारुण्यें सप्रभ । टवटवीत ॥ ४६ ॥ लता—गोपिका वेष्टित । रसपुष्पीं सुगंधित । ऐक्य—फळभारें डोलत । प्रेमरसें ॥ ४७ ॥ आह्मां पक्षियांतें सुख जाणा । द्यावया प्रीतिरसरूप रसना । अचल तरुपतिचरणा । करितां अर्पणा स्वानंदु ॥ ४८ ॥ हा स्वानंद वाचाक्रण । न फिटेचि उपायेंकरून । यालागीं मौनेंचि चरण । वंदिले प्रभूचे ॥ ४९ ॥ त्या चरणीं होता ठावो । गेला सर्वहि भावाभावो । सबाह्यांतरीं लाधली ठेवो । कृष्णरूपाची ॥ ५० ॥ सच्चिदानंदवंदनगर्भ । प्रेम शोभा सुखसुरभ । एकचि परी पूर्णप्रभ । व्याप्यव्यापकवर्जित ॥५१॥ षड्गुणैश्वर्ययुक्त । ऐश्वर्य ते विश्व समस्त । विश्वैक्यकरण तो सगुण भगवंत । परी प्रकटसिद्धांत रासामध्यें ॥ ५२ ॥ तें रासमंडळ गोपी-प्रेमें । आह्मां दिधलें गुणोत्तमें । यालागीं तत्पद प्रेमें । रसत्वें सेवूं ॥ ५३ ॥ त्या रसाची प्रीति । तेणें हृदयीं धरूं श्रीपति । साधोनियां अकृत्रिम भक्ति । वाचाक्रण निश्चितीं फेडूं ॥ ५४ ॥ फिटलियाहि वाचाक्रण । न यावा भक्तिधनाभिमान । या लागीं ऐक्यत्वें श्रीकृष्णचरण । प्रीतीनें सेवूं ॥ ५५ ॥

तें सेवासुकृत जें कांहीं । निश्चयें घेवोनि सर्वहीं । अर्पियलें पायीं । ज्ञानेश्वरश्रीगुरूच्या ॥ ५६ ॥ हें करितांचि अर्पण । सद्गुरूनें दिधलें वरदान । हा ग्रंथ एकवीस वेळ पठन । संपुटीं लावूनि करावा ॥ ५७ ॥ ज्ञानेश्वर माउली अनुलोम । प्रेमें तोचि प्रतिलोम । पठन करितां प्रकाशे परम । नित्यसुखदात्री हरिसेवा ॥ ५८ ॥ या श्रीगुरुवचनें भलें । आह्मां पठनाचि फळलें । प्रेमें वंदिलीं पाउलें । वंदनाचि असो ॥ ५९ ॥ अमृतानुभव संपुटीं । ज्ञानेश्वरपदसंपुष्टीं । स्वप्रेम स्वानंदगोष्टी । लाधल्या ज्या कीं ॥ ६० ॥ त्या आणि तन, मन, धन, । जीव, प्राण, ईश्वरपण, । पायीं अर्पोनि हृदयीं चरण । वंदोनि स्थापिले ॥ ६१ ॥ एकत्वें दोहींची पूजा । अर्चिलें श्रीगुरुराजा । अर्चनपुण्य वाहिलें वोजा ॥ श्रीगुरुज्ञानेश्वरचरणीं ॥ ६२ ॥ चरण पाहतां विरालें मन । तेणें ग्रंथबोला पडलें मौन । आतां जयजयकार करून । ज्ञानेश्वर उत्कर्ष ॥ ६३ ॥ नमो ज्ञानेश्वर जगन्माते । कडिये घेवोनि मातें । पाजोनि स्तनप्रेमातें । पायींच ठेवीं ॥ ६४ ॥ या विनंती आदिनाथ । कृपें तोषले समर्थ । चरण वंदितां मत्स्येंद्रनाथ । ओसंडले प्रेमें ॥ ६५ ॥ नमितां मत्स्येंद्र माउली । गोरक्षनाथा कृपा साउली । गैनी पाउलीं । शिर ठेवूं ॥ ६६ ॥ श्रीनिवृत्तिनाथ शंकर । त्या लोटांगण वारंवार । तत्कृपें माय ज्ञानेश्वर । मिळाली आह्मां ॥ ६७ ॥ सोपानदेव कृपाळू तात । मुक्ताबाई कृपावंत । चांगदेव खेचर, नामयादि संत । जनी, मिरा समस्त नमियेले ॥ ६८ ॥ ज्ञानेश्वरप्रभुचिया करकमळें । हृदीं उदेलीं प्रेमफळें । ह्मणोनीच नंदबाळें । अंगीकारिलें ॥ ६९ ॥ यापरी गुरुपरंपरास्मरणीं । प्रेमें राहोनि ज्ञानेश्वरचरणीं । अंगुष्ठ चोखितां धणी । न पुरेचि हे ॥ ७० ॥ यालागीं तें पदकमळ । हृदयीं धरिलें नित्यकाळ । ज्ञानेश्वरनामें कल्लोळ । अंतर्बाह्य ॥ ७१ ॥ ज्ञानेश्वरगुरुमुखपीकप्रसाद । तेथें आटले दुःखानंद । शेखीं अर्पणरूपें शुद्ध- । प्रेमाचि उरला ॥ ७२ ॥ जय जय ज्ञानेश्वरमाउली । सद्गुरुकृपासाउली । आतां बळकट पाउलीं । हृदयीं राखीं ॥ ७३ ॥ आणि हें मागणें मना । पायीं करों सुमना । प्रेमरसें रसना । अंगुष्ठ चाखो ॥ ७४ ॥ ज्ञानेश्वर सद्गुरुनाथ । हाचि येथ निघो अर्थ । सर्वत्र यशस्वी सद्गुरुनाथ । ज्ञानेश्वर माउली ही ॥ ७५ ॥ 'हरिः ॐ तत्सत्' इति श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे ओंवीछंदबद्धे भक्तिपदवीर्था-

मृते फलानंत्यपूर्वक, उर्वरितभक्त्युपदेशोनाम पंचमस्तरंगः ॥ श्रीसद्गुरु-ज्ञानेश्वरार्पणमस्तु. ॥

॥ भक्तिपदतीर्थामृत समाप्त. ॥

---

॥ श्री ज्ञानेश्वरमाउली समर्थ. ॥

॥ श्री गुलाबरावमहाराजकृत. ॥

# ॥ निगमांतपथसंदीपक. ॥

ॐ नमो श्रीसद्गुरु सर्वेशा । शिष्यचकोरचंद्रा पूर्ण परेशा । जय सच्चिदानंदा निरस्ताभिलापा । ज्ञानचंडांशा चित्सुखा ॥ १ ॥ नसतियेचे घरीं । ही जी व्यष्टि अहंकारी । तीते मोचनकारी । कारुण्याचा ॥२॥ पाहे ईशत्व त्रासलें । तें त्वद्बोधें सुखावलें । मग येवोनि ओटंगलें । तव संकेतीं ॥ ३ ॥ पाहे तुझिया साविया दिठीं । अनुपम उल्हासु आपण उठी । हा मीचि परी बैसों पाठीं । महेशाच्या ॥ ४ ॥ रोहिणीउदकें शिणलें । ते तवपायीं मीनलें । आणि मानुखे इये वहिले । रमले तेथ ॥ ५ ॥ ऐसा जिया थोर सानां । पाहूनि टकी नयना । उभा असती दाना । अपवर्गाच्या ॥ ६ ॥ माये तुझिया अपांगपातें । दिसाव्याचें देखतें । होऊनि ठाके परौतें । भावभूत ॥ ७ ॥ चहूं दोषां इया । आश्रो नाहीं पायां । म्हणूनि जातिगुणक्रिया । लोप स्वीकारिती ॥ ८ ॥ इये देखणें समस्तें । तोंडाळपणें गळितें । मग आपसया भ्रियते । तुझेनि माये ॥ ९ ॥ पाहे हा महच्छ्वास । तव कृपेचा वास । कां आपुलें तयास । नेणिवेजेते ॥ १० ॥ स्थानांतरीं तिहीं । आश्रवूनि ठायीं । निःशेष देत ग्वाहि । माहिम्याची ॥११॥ हा गा जाणिवेच्या मिठी । सुवोनि आपुले पोटीं । मग दे प्रसाद गाठीं । प्रसन्न परी ॥ १२ ॥ स्वाच्या प्रीतिपणीं । येशी आंगवळणीं । येरपथ धणी । न पुरशी ॥१३॥ हे फिरलिया तारका । ज्ञप्ति इया काणिका । मग वस्तु भेद्या मुका । दोघांही करिसी ॥ १४ ॥ जैं तुझे आह्मी होणें । तैं ये सुखा येणें । मा कृत्रिम बोलणें । काइसें तें ॥ १५ ॥ हा वाणीपरी गोठो । मग एक-

लिया भेटो । गौण बोला फुटो । वेगळीये ॥ १६ ॥ अंगुष्ठ नीरिया-च्या । ल्या प्रमाणादींच्या । पाहूनि रतनाच्या । भरीं न पडे ॥ १७ ॥ सामर्थ्य पुरुषा जिते । ह्मणोनि ना भाते । तेणे अन्वयीं पदातें । क्रमोनि ठेले ॥१८॥ तरी ते हृदयींचे । फावे तैं साचे । पारणें जिवाचे । फिट-लेंचि आहे ॥ १९ ॥ ऐसिया जननीजनका । ज्ञानेश्वरा निष्कलंका । श्री सद्गुरु तनुमनग्राहका । अभयें बालकवाक्य स्वीकारा ॥ २० ॥ आतां मौनेंचि वाहिले । वाहतेनसी राहिले । चोखावया उरले । अंगुष्ठ ते ॥२१॥ हरि: ॐ तत्सत् इति श्रीनिगमांतपथसंदीपके, श्रीसद्गुरुज्ञानेश्वरकृपा-प्रसादे, ओंवीछंदबद्धे, वस्तुत: सद्गुरुमहिमारूपमंगलाचरणं नाम प्रथ-मोध्याय: ॥

## ॥ अध्याय २ रा. ॥

## ॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

आतां तिया माये । आश्रवूनि ठाये । ह्मणे हो स्वयें । वदिजे आ-तां ॥ १ ॥ हे अपरिच्छिन्न तिहीं । स्वीकारूनि ग्वाही । हा अभिलाषु-चि ठायीं । ऐसा ह्मणे ॥ २ ॥ ययातेंचि देखिजे । देशिक-मुखें ओळ-खिजे । निकें करूनि ध्यायिजे । आपुलिया ॥ ३ ॥ येथ दोन्ही भले । एकोंचि परी विभागिले । शक्तिशक्तिमत्वें बोलिले । प्रेर्यप्रेरक ॥४॥ तेथ अनादि अनंतें । अध्यासें ओटंगतें । प्रेरकें समर्थें । ऐसें केलें ॥ ५ ॥ हें औपचारिकें जर्‍ही । भानु नयनीं तर्‍ही । तेवीं इयापरी । अलिप्तत्वचि ॥ ६ ॥ पाहे पां रोहिणी । मृगाच्या चाळवणी । परी नेणें तरणी । नेटकाचि ॥ ७ ॥ कां सर्पाभासें दोरा । शिवणें नाहीं विकारा । परी अवचनें थारा । द्रष्ट्यालागीं ॥ ८ ॥ तरी इये नेटकें । वारिलिया दीप-कें । कायि आले ठके । आरोपाचे ॥ ९ ॥ परी दिसाव्याचे भेणे । ह्याचि बरवे ह्मणे । ना गाठी येणें । मंदांधारें ॥ १० ॥ तरी इया दोरा । दीप दीपें थारा । परी सामोरा । ठावो नव्हे ॥ ११ ॥ आपण इया देखे । आपणा माजी पोखे । मग आश्रवूनि अनेके । हा सी ह्मणे ॥१२॥ तरी तिये उपहिते । ये अनादि अनंतें । नैसर्गिके सातें । होइजेल ॥१३॥ पाहे युगपत् सारें । स्थलकालक्रमादि रे । नित्यचि नित्याधारें । अनिव-

तके ॥ १४ ॥ परी उगे तें निवर्तले । आधेय तें अधिष्ठिलें । जायें ह्मणोनि बोलिलें । निवर्तक ॥ १५ ॥ तरी मिथ्याबोधें नाना । मार्गीं ओटंगे वासना । तेणें संगु जाणा । यथार्थसा ॥ १६ ॥ हें उगे निवटावें । या लागीं कळवळें आघवें । तया उपहितें बोलवे । सुनिश्चितें ॥ १७ ॥ तें हें शब्दब्रह्म फुडें । उपदेशपरंपरे गाढें । सानाव्याहि चढे । करसंपुटीं ॥ १८ ॥ परी तें लाभे जेणें । तया ऐसें होणें । जे कीं बाह्यपणें । उगे सुटावें ॥ १९ ॥ पार्थक्यें त्यागें शोधें धांवे । यांच्या पायीं पडावें । मग उगे निवर्तोनि व्हावें । हें ऐसें ॥ २० ॥ परी स्फूर्तिभावें । नाथिलें न यावें । या लागीं अर्पावें । उपहितीं तें ॥ २१ ॥ ऐसिया सुखबोधपणीं । प्रीतिये अंगवळणी । मग अर्थपणीं । अनर्थुही होय ॥ २२ ॥ ऐसिये अंगुष्ठें चोखितां । अपूर्व ही अवस्था । ओंव्या गुंफूनि प्रेमसुता । अर्पिल्या भावें ॥ २३ ॥ अहो जी पूर्णब्रह्म सनातना । ज्ञानेश्वरा कृपाघना । ही दीनकन्या चरणा- । वरी आपुल्या ठेवा ॥२४॥ 'हरिः ॐ तत्सत्' इति श्रीनिगमांतपथसंदीपके ज्ञानेश्वरकृपाप्रसादे ओंवीछंदबद्धे हृद्गतोपक्रमो नाम द्वितीयोऽध्यायः ॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥

## ॥ अध्याय ३ रा. ॥

## ॥ श्री ज्ञानेश्वरमाउली समर्थ. ॥

तथीं तें त्रिविधें । चेतन शुद्धाशुद्धें । प्रतिष्ठ सामान्यविशेषसिद्धें एकींचि येती ॥ १ ॥ तेथ हा प्रभु अधिष्ठान । मुक्त तें होतीं समान । बद्धें विशेषें जाण । निर्णायिलें ॥ २ ॥ तेहीं वैशेष्य ये समाना । ते न पविजे अधिष्ठाना । तरी एकीं एकपणा । न भंगे कहीं ॥ ३ ॥ इया एकें जाणिलें । तेणें हें तिन्ही न नेलें । आणि तिहीं नाहीं आणिलें । एकपण उणें ॥ ४ ॥ तेथ एकाचे दोन । एक एकीं आपण । हा भेदु परी जाण । अभेद सत्ता ॥ ५ ॥ ह्मणोनि मथिलेनी । जें हे त्रैविध्यानीं । आणि ते नित्यचि परी स्वस्थानीं । अविरुद्धत्वें ॥ ६ ॥ आतां तो निर्णयु ऐसा । ईश जीव मायाध्यासा । पृथक्त्वेंचि ठसा । एकत्वाचा ॥ ७ ॥ पाहे हीं महन्नीलिमा । महत्वें नित्यचि उगमा । या लागीं नाशोपमा ।

कदाही न ये ॥ ८ ॥ तेथचि जरी घनें । आणिली शोभा ह्मणे । तरी नाहीं उणें । आल्या गेल्या ॥ ९ ॥ येथ अपरिच्छिन्नें जैसें । नैसर्गिकेंही तैसें । हें नानात्व उमसे । ह्मणोनियां ॥ १० ॥ 'एकाकी न रमतें' । हें श्रुति साक्ष देते । या लागीं ह्मणिपते । नानात्व एकीं ॥ ११ ॥ नाहीं हें काहीं । हानि एका गेहीं । हो नानात्वा ठायीं । एकी नसे ॥ १२ ॥ पाहे घटाचिया भीतरीं । परिच्छिन्नें वर्ते परी । एकलिया आधारीं । एकचि महत् ॥ १३ ॥ कां भासकाच्या ठायीं । निसर्गे रोहिणी राही । द्रष्टृभिन्नें परिच्छिन्न तें ही । भासकु एक ॥ १४ ॥ तैसें इये ठिके । हें आश्रयिलें निकें । नानापरिच्छिन्नें एकें । अपरिच्छिन्नें ॥ १५ ॥ परी परिच्छिन्ना अपरिच्छिन्ना । ठावु ये अपरिछिन्ना । यालागीं उपपन्ना । आश्रयिजेल ॥ १६ ॥ पाहे तें जें एकें पाहतां । चतुर्विधें दिसतां । मृगमानुखां समस्तां । एकीचिये ॥ १७ ॥ अदितिसुतोष्मपणीं । निरुगे ही रोहिणी । मानुखा मृगा पाणी । परि दुजा बांधी ॥ १८ ॥ कां दुजा भ्रमें बांधला । तो धावे धांवतचि मेला । जरी होय पाळिला । तरी मनःपूर्ति ॥ १९ ॥ आणि इये पहिलें । जरी भ्रमा सोडिलें । तरी नाहीं त्यागिलें । पाणी व्यवहारा ॥ २० ॥ परी हें उठे कीं नुठे । तया ठाउके न गोमटें । तो तिसरा नेटें । आपण ह्मणे ॥ २१ ॥ येथ मृगा मानुखा इया । देशकालक्रमा ठाया । नानात्वें आरोपावया । लागे ह्मणोनि सिद्ध ॥ २२ ॥ परी दोघांहि । रोहिणी असे ठायीं । आतां उपनाई । करिजेल ॥२३॥ एवं प्रभुसत्ते । हें उणें नव्हे जीवातें । परी हें प्रभूतें । नेणवे जाणवेना ॥ २४ ॥ सत्ते नित्याचिया । नित्या ह्मणिजे माया । तत्सत्ते जीवा इया । एकी नित्य भेदु ॥ २५ ॥ तेथहि दुभागली । स्वभवें इया लागली । ते मृगापरी जाहली । बद्ध सकळे ॥ २६ ॥ तेथ नसोनि अविद्या । तैशी बद्धाऽबाध्या । मुक्ता मानुखा विद्या । अबाध्या कीं ॥ २७ ॥ परी दोघांही माया । साच दुरत्यया । ह्मणोनि मागीं इया । त्यजिजे तिहीं ॥ २८ ॥ जे कीं सूर्यकमळें । अथवा किरणभक्षकें पाळें । न देखती हे डोळे । पोपणें ह्मणोनि ॥ २९ ॥ तेवींचि प्रभूचिया । न दिसे ही माया । लीलाविग्रही इया । आश्रयी तीतें ॥३०॥ तो विग्रहस्थान श्रीपति । जो कांत आह्माप्रति । तया पूजिलें समस्तीं । ओंव्या-पुष्पीं ॥ ३१ ॥ हो बद्ध मुक्त पाळिलें । येणेचि पाणी दीधलें ।

तिया श्रीगुरूचीं पाउलें । मस्तकीं स्थिरे ॥३२॥ ती ही ज्ञानेश्वर माउली । अनुग्रहें पान्हावली । ह्मणोनि पायीं समर्पिली । आथवी पूजा ॥ ३३ ॥ 'हरिः ॐ तत्सन्' श्री निगमांतपथसंदीपिके, श्रीसद्गुरु ज्ञानेश्वरकृपाप्रसादे, कारणसंबंधपदार्थनिर्णयोनाम, तृतीयोध्यायः ॥ श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥

## ॥ अध्याय ४ था. ॥

आतां देशकालक्रमारोपें । उगेपणे हा वासिपें । परी ते वर्ध संकल्पें । निरोपिजेल ॥ १ ॥ तरी स्वसुखें जो आथिला । भ्रमें जाला नाथिला । तो पहिलिया आला । निवर्तनीं ॥ २ ॥ परी जें अनादि अनंत । नसूनियां असत । आमुच्या दिठीं भासत । हरिदिठीं नसे ॥३॥ सागराचा निस्यंदा । तोचि मीठपणाचा बांधा । परी पाणिया माजी द्वंदा । आपण करी ॥ ४ ॥ तेवीं हें सुख उल्हासिलें । तये आर्धी बांधलें । हा हे ह्मणोनि घेतलें । धावणपण ॥५॥ येथ वास्तव तें नाहींपण । ह्मणोनि हरि उपादान । आणि या हे न सुटे ह्मणोन । निमित्त ही तो । हें साचचि लटिकें । आरोपें नैमित्तिकें । अनादि कटकें । करोनि ठाली ॥ ७ ॥ तेथ देशाचेनि बळें । उडी घातली काळें । मा हे क्रमीं सोहळे । ते कें नवल ॥ ८ ॥ पाहे श्रमो जैं बैसे । तैं बुडालें दिसे । उठे तो उमसे । दोघांहीं हें ॥९॥ तेथ समानू कारणें देखे । विशेषु कार्या लेखे । हा क्रमूचि मोटके । कांहीं नाहीं ॥ १० ॥ येथ स्वपर ऐसें । उजाळ भैळें दिसे। तें भैळे विशेषें। समानें उजाळी ॥११॥ भैळें उजाळी उजाळे । आणि तया अपेक्षें उजाळे । देव सुखाचे सोहळे । समर्थें इये ॥ १२ ॥ तें एकीं वहुपणा । परी येथ सदीक्षणा । ह्मणोनि नाहीं कारणा । नाहींसें हो ॥ १३ ॥ येथ भोक्त्याही प्रती । आरोपें जन्मापत्ती । तरी हे गोठी निगुती । व्यासेंचि केली ॥१४॥ 'उत्पत्यसंभवात्' ऐसें । जीवु जन्म न असे । हो कां समान विशेषें । निये तिये ॥१५॥ आणि एकीं समर्थें वेगळें । तोंहि उठे किडाळें । उगे देखते डोळे । आभास ह्मणुनी ॥ १६ ॥ तो आभास घेउनी उठे । मग सत्य ऐसा पैठे । तेणें भोग्य दाटे । भावो बहू ॥ १७ ॥ तया भावें याचिलें । तेंचि तेथ सांचिलें । तंव अधिक माचिलें । नैमित्तिकें इये ॥ १८ ॥ ऐसिया हो

गौणा । जैं जाहली चोदना । तैं उगाचि गुणा । तिहीं आली ॥ १९ ॥ हें ईक्षणेंचि केलें । काळें नसे झालें । ह्मणूनियां गेलें । आरंभाक्षेपें. ॥२०॥ इया भाव याचका । ईक्षणें नैमित्तिका । गणितपूर्ति याचका । याचक्यवृद्धि ॥ २१ ॥ इये अध्यात्में । आतां मैळें जे उमे । ते होवोनि रमे । आरोपेसीं ॥२२॥ वैभवें हा त्याचा । भागु ह्मणिपे साचा । आयता परिक्रियेचा । अनधिकारी ॥ २३ ॥ ईक्षणाभाव संयोगें । पूर्ति वृद्धि भावा लागे । न देतां हि घे । आपणची ॥ २४ ॥ परी दिधलें ह्मणें । तया ईक्षणींच देणें । कल्पतरु माने । आरोपें वळवी ॥ २५ ॥ तो भावो अधिभूतीं । मैळे अध्यस्ती । जैं तैं आकृती । लिंगाचि इया ॥ २६ ॥ महदाद्यनंत भूतें । जे कीं श्रुति निरुतें । तें कारणीं होतें । भगवदुक्ती तें अष्टधा ॥ २७ ॥ मैळें आड पडले । केवळ तम जाले । तेथें निपजले भूतें इये ॥ २८ ॥ तेंचि भावा बाह्यगुणें । रजत्वें इंद्रियां होणें । भाव राखी अंतर्गुणें । उजाळ घेउनी ते सत्वा ॥ २९ ॥ तें सत्वकरण हा तिहींचा । कारण ठावो भ्रमाचा । महाकारण अध्यासाचा । मैळभावाचा कार्य ठावो ॥ ३० ॥ येथ भ्रमूं भावें । अध्यासु राखावें । हेंचि इया होआवें । स्पष्ट लिंग ॥ ३१ ॥ तेथ अंतर्गुणें दोन । अध्यात्मारोहण । आणि हें पंचक जाण अष्टधा ऐसें ॥ ३२ ॥ हे अपरा ह्मणो त्यागिजे । शुद्ध प्रकाशे इया सहजें । ते परा ह्मणे धारिजे । जगज्जीवा ॥ ३३ ॥ भावस्वातंत्र्यें इया । अंशें मैळ्याचिया । पांचांहि करूनि तया । भोग्यें आणिलें ॥ ३४ ॥ तें याचनकर्म । उठवी भोगधर्म । ह्मणोनि भोगायतन परम । बहुला देहा ॥ ३५ ॥ ऐसें अनादि अधिष्ठिलें । लीलें मैळभागा स्पर्शिलें । यया अर्थी केलें । आपुलिया श्रुत ॥३६॥ ती श्रुति आचरण पुराणें । आपुलिया या कारणें । दिलें ह्मणोनि उदार गुणें । स्वा ह्मणविलें ॥ ३७ ॥ तया अचुक पाणीपणें । जैं होय देखणें । तैं आपसयात ह्मणे । पोसणाभावें ॥ ३८ ॥ मग एकादिया स्थानीं । उल्हासु उठे ईक्षणीं । तो इतरां गुणीं । तैसेंचि करी ॥ ३९ ॥ ह्मणोनि श्रमें बैसिजे । मग हें कांहीं देखिजे । परी न धाविजे । तया पाठीं ॥ ४० ॥ उठण्यातें कर्म । बैसण्यातें परम । आतां उद्गम । परम प्रीतीचा ॥ ४१ ॥ तेथ कर्म त्रिविध । बैसवितें द्विविध । एक उजाळी नित्य बैसे प्रसिद्ध । मिथ्या देखतां ॥ ४२ ॥ मैळी क्षणक्षणा बैसे । ते व्यष्टि निद्रा जागरसे । विल-

क्षण समष्टि दशे । जन्मादि ते ॥४३॥ हा तटस्थ भावो निर्गुण स्थिति । सगुण लीलास्वरूप प्रतीति । निर्भाव तेथ अत्यंत प्रीति । ती भाक्ति लीला प्रदर्शक ॥ ४४ ॥ एकीच परी दोहों लीले । हें विलक्षण संचलें । तया ठायें भलें । येरा नोहे ॥ ४५ ॥ भावप्रेरकत्वें जीव स्वतंत्र । याचन पूर्तिपणें परतंत्र । न याची तो लीलामात्र होवोनि ठाये ॥४६॥ हें एकीपरी सिनालिलें । स्थूल सूक्ष्मत्वा आलें । समष्टि व्यष्टि विभागलें । विराट हिरण्यगर्भ विश्व तैजस ॥४७॥ समष्टि प्रळय जीवु प्राज्ञ । व्यष्टि निदे तैसा अज्ञ । येरु अंतस्थ सर्वज्ञ । ईक्षिता जो ॥ ४८ ॥ परी हें कायि ईक्षण । लीलागुणें एकपण । तें कीजेल निरूपण । पुढेंहो ॥४९॥ आरोह सांडोनि सातें । अधिक उजाळे सहितें । भूरादि सत्यातें । अधिक मैळे सात तळें ॥ ५० ॥ देशकाल निमित्तक्रिया । क्रमें पूर्ति याचनें इया । आणि ते संपलिया । याचक होणें ॥५१॥ तेथ मैळे जरी ठाये । तरी तिर्यगादि जाये । अंतर उजाळें होये । फळियाउपरी ॥ ५२ ॥ आणि शुद्ध उजाळ प्रसंगें । चौदा चोदनायोगें । सम विषम भागें । याचका इये परी ॥५३॥ आणि अनादिरूपें लीलेक्षणें । वैकुंठादि होणें । तें प्रेमळा प्रेमगुणें । ठावोनि येती । आतां एक उजाळी बहुपण । तें आश्रयें त्रिदेवत्व जाण । आणि तैसें त्रयत्रिंशें पूर्ण । आदित्यादिकें ॥५५॥ परिवारें नाना तेंहीं । चिद्स्वातंत्र्यें पाहीं । आणि आश्रयाधिका रेंही । मत्कांताधीनें ॥५६॥ ऐसा हा प्रणवु । वाचकानें शब्द बहू । वाच्यत्वें देवू । देवतारूपें ॥ ५७ ॥ संबंधें जीव जग । परमार्थें एकांग । वस्तुत्वें चांग । लीलाप्रियत्व ॥ ५८ ॥ हा लीलाप्रिय भावो । माला गुंफोनि पहा हो । श्रीज्ञानेश्वरपदीं वाहो । आनंतीं ही ॥५९॥ श्री ज्ञानेश्वर माउली । जे लीलासुखा साउली । नित्य तयांच्या पाउलीं । तन मन अर्पिलें ॥ ६० ॥ तेथ ओंवियांकर्ता । हेहि न ये अहंता । आणि ज्ञानेश्वर माता । तत्पदीं अर्पिता उल्हासु ॥ ६१ ॥ 'हरिः ॐ तत्सत्' इति श्री निगमांतपथसंदीपिके, श्रीसद्गुरु ज्ञानेश्वरकृपाप्रसादे, ओंवीछंदबद्धे, 'कार्यसंबंधपदार्थनिर्णयोनाम, चतुर्थोध्यायः ॥

॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥



## ॥ अध्याय ५ वा. ॥

आहे कळे आवडे । या त्रयीं तीनी उडे । कधींही न पडे । भेदारोगी ॥ १ ॥ आहे ह्मणे व्यतिरेके । तों गिवसिजे अभेद दु:खे । कळे ऐसे ह्मणे देखे । तो खोटे दु:ख अभिभूत ॥ २ ॥ हें आवडे ह्मणे वेगळे । ते खोटें आणि न कळे । हें असें ह्मणूनि डोळे । न देखती भेदू ॥ ३ ॥ नम्रश्वेत सौरभे । असिजे की राभे । ती ही उणे गर्भे । एकत्वें तये ॥ ४ ॥ नरम हें पांढरें । पांढरी नम्रें । दुणी विहिते खरे । सौरभे उठे ॥ ५ ॥ तैसी तीही । श्रुती दे ग्वाही । परी आवडीच्या ठायीं । उणें जाले ॥ ६ ॥ कळे तेंचि आवडे । कीं आवडे तें कळे फुडे । अथवा हें जोडे । आहे ते गा ॥ ७ ॥ हें उगे निवडिती । तें खपेंधे होती । संभव ह्मणती । संभवे त्यागू ॥ ८ ॥ पुनवेच्या सतरा । अपरिच्छेदें चंद्रा । राहती तैसें स्वतंत्रा । इया घडे ॥ ९ ॥ हें सिद्ध मोटके । परी वेपिजे केटकें । स्पंधे मिठे पिऊखे । निवाडे असम ॥१०॥ आतां धर्मे हे ये । तो धर्मू ना श्रये । मा क्रिया ठाये । आणि जे के ॥ ११ ॥ देखे येणें ठाये । देखते तें होये । आणि सर्व सिद्धि आणावे । साधनें कार्यी ॥ १२ ॥ व्याप्तीचे अभावे । दोही या नयावे । वाचे काय घेयावे । नसते हे ॥ १३ ॥ अटके नाहीं । मा केटके तिहीं । ह्मणोनि प्रथमा नाहीं । तद्वाक् संख्येची ॥ १४ ॥ आतां इये लखे । विषमें समीपेखे । आघवी इये बाधके । अननुकरे ॥ १५ ॥ ऐसे हे घेइजे काई । ओळखावया नाहीं । परी ओळखचि ठायीं । ठाकली कीरूं ॥ १६ ॥ तळमळो पेगे । के कीजे बागे । वरी खोल तेवी माघे । दाबणें कीरू ॥ १७ ॥ तेवीं इये गुण साखिके । देख तया आपटके । न बोलती नेटके । उगेचि तिये ॥ १८ ॥ आहे तें नाहीं । नसे हें काहीं । आरशीया ठायीं । मुख जैसें ॥१९॥ तेवीं हे कळे । आरिसा वेगळे । येणेंचि आंधळे । विचार कारीं ॥ २० ॥ अर्थ हे आपुला । तो अदु:खें स्थापिला । ह्मणूनी सोपिला । ठावू एकीं ॥ २१ ॥ एकी नये उपाया । अपायीं लक्षणा इया । उगेचि प्रत्यया । जल्पके हें ॥ २२ ॥ अवादन वाद्य नादें । मत्सुत तृप्ती साधे । तैं बोधमदें । घटे ऐसें ॥ २३ ॥ हें आवडलें नाहीं । ना न ह्मणे काहीं । एकी वा दोन्हीं । दोही एकें ॥२४॥

हीं अप्रत्ययू एकोपा । नुठे कोणि या कोपा । जेवीं मी तापा । भयें न काढी ॥ २५ ॥ हें साच उघडे । अबोलणे फुडे । बोलणे गाढे । उगे नसे ॥ २६ ॥ मा प्रत्ययू आला । ते नसी तो गेला । कें वा राहिला । एको पाहा ॥ २७ ॥ ऐशिया सोई । ज्ञानेश्वर आई । लाभली ह्मणूनि पायीं । डोईचि दिधली ॥ २८ ॥ हें मस्तक तीं पाउलें । अपार्थक्यें झाले । वाटणे संचले । अर्पणरूपें ॥२९॥ ऐशा ओंविया अक्षता । सौभाग्यें लिहित पिता । लोभें पायीं अर्पिता । अर्पिलो मी ॥ ३० ॥ आतां ज्ञानेश्वर माउली । समस्ती इये ठाउली । जे कृपा पात्रा साउली । पाउली तियेची हृदिस्थे ॥ ३१ ॥ हरिः ॐ तत्सत् इति श्री निगमांतपथसंदीपके ओंवीछंदबद्ध पदत्रयैक्यविवरणन्नाम पंचमोध्यायः ॥

॥ श्री सद्गुरु ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥

॥ निगमांतपथसंदीपिक समाप्त. ॥

---

॥ श्रीमत्सद्गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

गुलाबरावमहाराजकृत.

# चौसष्टी.

ॐ नमो ज्ञानेश्वर सद्गुरु आई । मस्तक ठेवूनि तुमचे पायीं । तुह्मी शिकविल्याची परीक्षा लवलाही । तुह्मांपुढें देते ती ऐका ॥१॥ ज्ञान शिव शक्ति वृत्ति । हे निरुपाधिकचि संकेती । आणि जगत्कारणें निश्चितीं । ते म्यां वंदिलीं दोघे ॥२॥ ज्ञान तेचि वृत्ती । विषयप्रेमें भासे पालथी । आणि पहातां संकेती । एकचि सरळ ॥३॥ हरि प्रेम अंगीं चढे । तैं दोघांचें दोनपण मोडे । आणि विश्वद्वैत भासलां गाढे । तरी दोनपण पुढती ये ॥४॥ ज्ञान वृत्ति ह्मणावें दोन । तरी एकचि असे ज्ञान । आणि एक ह्मणावें तरी वृत्ती ज्ञान । दोघे ह्मणोनि साकार निवडतां नये ॥५॥ भक्ति सुखाची प्रीति मो-

ठी । तेथ ज्ञान वृत्ति रूप जगजेठी । आणि आश्चर्य हें शेवटीं । दोन पणचि नसे ॥६॥ ऐसे एकरूप दोघे । यातुनी निघतीं जगें । एकचि दोहों अंगें । दिसो लागे ॥७॥ अवघे जग जरी पाहिलें । ते आपुल्या वरीच ओळखिलें । परी ज्ञान वृत्ति वांचोनि नाहीं आले । तिसरें कोणी ॥८॥ दोन्हीही आहेती । ज्ञान आणि वृत्ति । अनादि असती । ज्ञानरूप ॥ ९ ॥ प्रेमामाजीं भेद गेला । तो आनंदामध्यें बुडाला । अद्वैताचा भोक्ता झाला । तोही हरपला भक्ति योगें ॥१०॥ ज्ञानावांचोनि वृत्ती नाहीं । वृत्तीवांचोनि ज्ञान नाहीं । दोन्ही नसोनि पाही । एक आनंद ॥११॥ हा आनंद एवढा प्रकट । परमाणूंतही दिसे स्पष्ट । जग व्यापोनिया वरिष्ठ । उरोनि राहे ॥१२॥ ज्ञान वृत्तीवांचोन । गवतही नाहीं झालें निर्माण । जणो हे जीव प्राण । एकमेकांचे ॥ १३ ॥ विश्वरूप संसार करिते । ज्ञान जेव्हां विसरतें । तैं दोनपणा वृत्तीतें । येत असे ॥१४॥ जरी एखादें स्मरलें ज्ञान । तरी नव्हतेंच विस्मरण । मग विश्व सारें गिळोन । ज्ञानचि होय ॥१५॥ हरपोनि ज्ञान वृत्ति । एकाचि असे हरिप्रीति । विश्व असणें ही प्रतीति । केवळ असे ॥१६॥ ज्ञान विषयि, वृत्ति विषय । कीं वृत्ति विषयि ज्ञान विषय । हे दोन्ही असोनी स्वयें । सुखचि होय ॥१७॥ दोन वीण्यांत एक नाद । दोहीं फुलांत एक सुगंध । दोहों दीपामाजी अभेद । प्रकाश एक ॥ १८ ॥ दो ओठांत एक शब्द । दोन्ही डोळ्यांत रूप अभेद । तैसे विश्व हें प्रसिद्ध । एकचि ज्ञान वृत्तिरूप ॥ १९ ॥ ज्ञान आणि वृत्ति । दोनपण मात्र दिसती । परी स्वानंदप्राप्ति । एकचि असे ॥२०॥ ज्ञानावांचूनि वृत्ती न राहे । वृत्तिवीण ज्ञान विषय न पाहे । कर्तृत्व भोक्तृत्वही नोहे । दोहींविण ॥ २१ ॥ ज्ञानरूपाचि वृत्ति आहे । ह्मणोनी वेगळी करितां नोहे । आणि वृत्तिरूपची ज्ञान आहे । ह्मणोनी वेगळीक नसे ॥२२॥ साखरेची गोडी । कापुराची गंध परवडी । काढितां नये वेगळी । बुद्धी पांगुळी ह्मणोनियां ॥ २३ ॥ दिव्याचा प्रकाश अवघा उचलितां । तरी दिवाचि येत असे हाता । तैसी वृत्ति उठवितां मुरवितां । ज्ञानाचि होय ॥२४॥ बिंबाचि प्रतिबिंबा प्रकाशीत । प्रतिबिंबें बिंबाचें अनुमान होत । तैसें द्वैतमिषें अद्वैत । अनुभवे कीं ॥२५॥ सर्व नाहींपण गेलें । ज्ञानचि वृत्तिरूप झालें ।

वृत्तिपण ही आलें । ज्ञानानेंच तिसी ॥ २६ ॥ संस्कारा सहित वृत्ति । विश्वरूपें विराजती । ज्ञानचि होऊनि नाना आकृती । ज्ञानरूप संचलें ॥ २७ ॥ नामरूप ज्ञानांत नाहीं । परी वृत्ति आटणीं होवोनि पाही । एवढें विश्वनवाई । नाम रूप तेंची ॥ २८ ॥ एका सत्यपटावरी । मिथ्या चित्रें नानापरी । काढोनि लीला प्रकारी । श्रीहरी जो ॥ २९ ॥ वृत्ति आटतां ज्ञान । ज्ञान आटतां वृत्ति स्फुरण । दोवांचेहि एकपण । संकेतें कळे ॥३०॥ वृत्ति पाहे तेव्हां पाहणारें ज्ञान । वृत्ति न पाहे तरी न राहे ज्ञानपण । हे अनुभवाची खूण । जाणती संत ॥ ३१ ॥ वृत्तीनें ज्ञान विश्व आहे । वृत्ति नसतां कांहींच नोहे । परी नाहीं तेंचि आहे । वृत्ति रूपें विश्व ॥ ३२ ॥ येथवरी सूक्ष्म निरूपण । प्रकटाचि परी लोपल्या समान । हें संकेतें पूर्ण । विश्वीं विश्वचि आहे ॥ ३३ ॥ वृत्तीनें ज्ञानासि विषय दिधले पुष्कळ । त्या विषयां सहित वृत्ति आटली सकळ । उरलें तें केवळ । ज्ञानाचि एक ॥ ३४ ॥ वृत्ति ज्ञानाची दर्पण । ज्ञान वृत्ति दर्पण । दोहींचे एकपण । भक्तीमाजीं ॥ ३५ ॥ तें वृत्तीचि होय हरिप्रीति । तैं आनंद मिळे आपणाप्रती । परी तो आनंदभोग वृत्ती– । वांचोनि नसे ॥३६॥ ज्ञान तेचि वृत्ति । वृत्ति तेचि ज्ञानमिति । एकत्र जाणोनि दोहींप्रती । हरि प्रेम सेविती पक्वान्न ॥ ३७ ॥ वायु गति एक जाण । कीं पिवळेंपण मिळोनि एक सुवर्ण । तैसें वृत्तीचि ज्ञान । अवघें असे ॥ ३८ ॥ अग्नि सहित उष्णता । कीं सुगंधासहित कर्पूरता । तैसी वृत्तिसत्ता । तत्वतां ज्ञान ॥ ३९ ॥ रात्री आणि दिवस । दोहींचा सूर्यास नाहीं भास । तैसे भक्ती माजीं ज्ञान वृत्तीस । पृथक्त्व नसे ॥ ४० ॥ किंबहुना वेदाचा पिता । जो ॐ कार तो हेंचि तत्वतां । ज्ञान वृत्ति पृथक्त्वें असतां । विरुद्ध वाटती ॥ ४१ ॥ वृत्ति आणि ज्ञान । हे शब्द मात्र भिन्न । एरवीं अवघें एकपण । त्या हरी तें नमन सद्भावें ॥ ४२ ॥ निश्चय करितां कांहीं । तरी शब्दासी ठाव नाहीं । समुद्रासहित नदी ही । प्रळय पाण्यांत मिळे जैसी ॥ ४३ ॥ वायू आकाशांत गेला सकळ । कीं प्रळयाग्नींत नसे सूर्यमंडल । तैसें सोज्वळ । जाणावें गुरुमुखें ॥ ४४ ॥ दोन्हींच्या भेटी । नाहीं दोनपणाची गोष्टी । परी एकपण उठाउठी । भक्तीनें गौण ॥ ४५ ॥ आणि वृत्ति असली जरी । विषय विषयि भाव

नसे तरी । उलटे ज्ञान वृत्ती दोहीं परी । भक्तींत हराविती संत ॥ ४६ ॥ तेथ नमस्कार म्यां केला । तो एकत्वेंचि झाला । दुसरा नाहीं आला । लाक्षणिकही ॥ ४७ ॥ अलंकार आणि सुवर्ण । न होतां भिन्न । परी शोभे अलंकारपण । सोन्याचि वरी ॥ ४८ ॥ तैसें म्या नमस्कारितां । प्रेमाचि शोभा तत्वतां । पतिपत्नीभाव भक्तां । एकत्वें आला ॥ ४९ ॥ समुद्र आणि नदी । एक मिळे ही प्रसिद्धी । परी पाणीपणाची बुद्धी । दुसरी नाहीं ॥ ५० ॥ कां चंद्राचाचि प्रकाश । जितुका फांकेल भरोनी आकाश । तितुकें चंद्रपणास । भूषणाचि कीं ॥५१॥ कां दिव्याची दीप्ति । उणी न करी दिव्या प्रती । आणि दिव्यास सांडोनि दीप्ति राहतां नये ॥५२॥ मोत्याचें सुंदरपण । जितुकें निघेल परीक्षून । तितुकें मोल पूर्ण । अधिक तया ॥५३॥ अकार, उकार, मकार । मिळोनी एकचि ॐकार । कीं तीन रेघा परी णकार । एकचि असे ॥५४॥ तैसे चिदेकपण नाहीं मोडलें । आणि भक्तींत विशेष प्रेम जोडलें । तरी तरंग समुद्र झाले । गोड पाण्याचें ॥५५॥ तैसें एक करोनी ज्ञान वृत्ति । साधूनिया हरिप्रीति । नमन करावयाची रीति । तेही ऐका ॥ ५६ ॥ वायू राहतां तरंग नुठे । तैसे सगुणपणीं दोनपण नुठे । मग हें गोमटें । सावळें रूप ॥५७॥ निद्रेसाजी जैसी कांहीं । आपुली आठवणची नाहीं । आणि नाहीं हें ही । ह्मणता नयें ॥ ५८ ॥ तैसी बुद्धी संकेती गेली । कृष्ण आणि प्रीति एक झाली । मग ध्येयत्वें जें कां बाह्यांतर प्रकटली । ते मूर्ति वंदिली कृपामय ॥ ५९ ॥ कठिणपणा सांडोनी लवण । स्वयें समुद्र झालें आपण । तैसे तोडोनि ज्ञानाहंपण । झालें अर्पण हरिपायीं ॥ ६० ॥ हरि आणि प्रीति एक । ज्ञान वृत्ति आणि सुख । संकेतासहित सम्यक । कृष्णाचि हा ॥ ६१ ॥ कापुर आकाशीं विरे । परी वास जैसा उरे । तैसा संकेतही आर्पितां खरें । प्रेमें बरें उरलें हरिदास्य ॥ ६२ ॥ ही अद्वैत प्रेम खूण । जेणें संतोषलें पति कृष्ण त्याचि जळें ज्ञानेश्वरतातचरण । अभिषेकिलें ॥ ६३ ॥ दयाळें ज्ञानेश्वर जननी । सद्गुरु सखे माय बहिणी । हें मम सहित आर्पिलें तव चरणीं आतां दासी करोनी दुग्ध पाजी ॥ ६४ ॥ ( चूर्णिका - वार्तिक ) हरिः ॐ तत्सदिति श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वरजननीकृपाप्रसादें गुरुअग्रपरीक्षा बोधें, बोवडयावचनप्रबंधे , निरुपिलें , तें सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर च-

रणीं, उत्कर्षपणीं तद्वाक्यबोधपरीक्षादानशुद्धनिरुपणन्नाम प्रथमो ध्यायः ॥ श्रीसदगुरुज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

॥ चौसष्टी समाप्त. ॥



## ॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

### पत्र १ लें.

ओंव्याः— कन्या मनी भागीरथी । तुज सांगतो एक युक्ति । धरूनियां उदास वृत्ती । व्यर्थ भ्रांतीं पडूं नको ॥ १ ॥ दाखवूं नको ही उदासी । सुखी ठेव मायबापांसी । घरींचिया सासरियासी । चिंताग्रस्त करूं नको ॥ २ ॥ लोकलज्जेचा पडदा । ठेवूनि करी सर्व धंदा । परी अंतरीं परमानंदा । सर्वथा विसरूं नको ॥ ३ ॥ जैसा वनींहूनि आला राम । तें अयोध्येस सुख परम । तैसा चढता वाढता प्रेम । दिवसेंदिवस असों दे ॥ ४ ॥ जेवीं वत्स धेनु वनीं । किंवा पाडस आणि हरिणी तैसा कळवळा असतां गुरुचरणीं । तरी बंधन मग कैंचें ॥ ५ ॥ जैसी जननी कार्यास जाय । तान्हिया बाळास वियोग होय । तैसें चिंतितां सद्‌गुरुपाय । तरी बंधन मग कैंचें ॥ ६ ॥ जैसे दरिद्रियाचें हरपता धन । सर्वदा त्यांताचि खेळे मन । तैसें धरितां सद्‌गुरुचरण । तरी बंधन मग कैंचें ॥ ७ ॥ कां टिटवी फिरतां हाट । सदा पाहे पिलियाची वाट । तैसे गुरुपाय धरितां बळकट । तरी बंधन मग कैंचें ॥८॥ जेव्हां तुझी भेट झाली । तेव्हांचि मी कृपा केली । अंतरीं प्रेमाची साऊली । करूनि ठेविली तुजसाठीं ॥ ९ ॥ जें जें आहे मजजवळ । तें तुज हळु हळु देईन सकळ । परी चित्त स्थिर करूनि केवळ । होईं निश्चळ निजचित्तीं ॥ १० ॥ तूं धुंडिसी ज्याचेसाठीं । तें असे तुझ्याच पाठींपोटीं । जिकडे जिकडे फिरवावी दृष्टी । तिकडे नेहटीं तेंचि तें ॥ ११ ॥ डोळां जें जें देखावें । किंवा कानांनीं जें जें ऐकावें । तें तें करूनि ठेवावें आत्मरूप ॥ १२ ॥ कस्तूरी असतां नाभिकमळीं । हरिण फिरे आळो-

आळीं। तैसी तूं विसरोनि ब्रह्मपाळी। शब्दधुमाळीं पडलीस ॥ १३ ॥ तो संशय सांडूनि सर्व। चित्तीं धरी शुद्ध भाव। मग आत्मब्रह्म अनुभव। सांगेन उपाव तुजप्रती ॥ १४ ॥ जेव्हां आत्मरूप होय दृष्टी। तेव्हां ब्रह्मरूप भासे सृष्टी। मग जातिकुळाच्या गोष्टी। हारपती सर्व ॥ १५ ॥ जातिकुळ देहाचे ठायीं। आत्मा देहाहूनि वेगळा पाहीं। त्याला कुळगोत्र नाहीं। सर्वांचे हृदयीं सारिखा तो ॥ १६ ॥ तूं नव्हेसि स्त्री ना पुरुष। मनी भागीरथी नांव देहास। तूं देहाहूनि वेगळी आहेस। सदा समरस आत्मत्वें ॥ १७ ॥ तेथें तुज जन्ममरण नाहीं। जन्ममरण देहासि पाहीं। तो देहचि मी नाहीं। हें जाणूनि हृदयीं सुखी हो ॥ १८ ॥ जरी पढला नाना ग्रंथ। चारी वेद झाले मुखोद्गत। पुण्यकर्म केलें बहुत। तरी व्यर्थ आत्मप्राप्तीवीण ॥ १९ ॥ जो गर्भी जपत होतीस मंत्र। तो बाहेर येवूनि विसरली सर्वत्र। तो सद्गुरुमुखें घेवूनि पवित्र। पाव परत्र याच जन्मीं ॥ २० ॥ याच देहीं याच डोळां। घेई जीवन्मुक्तीचा सोहळा। परी अंतरीं प्रेमजिव्हाळा। सदा कळवळा असोंदे ॥ २१ ॥ पुत्राहूनि गाढें। शिष्यावरी प्रेम चढे। ऐसें पाहोनि गुरुचें रुपडें। त्यास शरण आधीं जावें ॥ २२ ॥ जनीं बोले चाले हिंडे। परी ज्याची समाधी न खंडे। ऐसें ब्रह्मज्ञान रोकडें। त्यास शरण आधीं जावें ॥ २३ ॥ तो गुरु असो भलती याती। ऐशा बोलती वेदश्रुती। ज्यानें फेडिली सकळ भ्रांती। तोचि निश्चितीं गुरुदेव ॥ २४ ॥ तूं माझी सत्य कन्या। परम पवित्र वेदमान्या। मी आपुल्या अनुभवधान्या। संपूर्ण तुज दिधलें ॥ २५ ॥ तुज दावीन कैवल्य मंदिर। हा मी दिधला पूर्ण वर। परी काहींकाल राही स्थिर। करूनि विचार अंतरीं ॥ २६ ॥ जरी विश्वास असेल माझे वचनीं। तरी हें ओंवीबद्ध पत्र पाहुनी। प्रेम ठेवूनि अंतःकरणीं। हरिस्मरणीं स्थिर होई ॥ २७ ॥ हरिः ॐ तत्सत् इति प्रथम पत्रकं संपूर्णम् ॥

॥ श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु. ॥

---

## ॥ श्री ज्ञानेश्वरमाउली समर्थ. ॥

### ॥ पत्र २ रें ॥

कन्या मनी भागीरथी । आयकावी मम वचनोक्ती । संशयात्मक चित्तवृत्ती । टाकोनि निश्चितीं देई कां ॥ १ ॥ म्या तुज जें दिधलें वचन । तें मीं आपुलें सत्य करीन । तुज एकवेळ दावीन । भगवंतमूर्ती ॥ २ ॥ मी तंव अति अज्ञान । बहु मूर्ख बुद्धिहीन । परी ज्ञानेश्वरकृपें करून । आत्मज्ञान सांगेन तुज ॥ ३ ॥ तें या जन्मीं जरी नाहीं साधलें । तरी पुढील जन्मीं देईन वहिलें । परी मी जें वचन दिधलें । तें खोटें सर्वथा न करीं मी ॥ ४ ॥ मज निंदो अथवा वंदो कोणी । त्याची खंती नाहीं मनीं । परी तुज कष्ट न व्हावे ह्मणोनी । मागें पुढें पहात असें ॥ ५ ॥ देहास मायबाप जन्म देती । परी मोक्ष नाहीं त्यांचे हातीं । ह्मणोनि या नरदेहस्थितीं । सद्गुरूप्रती शरण जावें ॥ ६ ॥ गुरूस जातीचें नाहीं काम । त्याचें कोणीहि असो कुलधाम । परी जो दाखवील आत्माराम । तोचि परम सद्गुरु ॥ ७ ॥ तेथ भीड नसावी कांहीं । कल्पना न घ्यावी देहीं । शरण जाऊनि तयाचे पायीं । वस्तु लवलाही पुसावी ॥ ८ ॥ ज्यास करणें आहे तरणोपाय । त्यानें जातिभेद पाहूं नये । हें खरें किंवा खोटें आहे । तें शोधून पाहीं वेदीं आणि भागवतीं ॥ ९ ॥ तूं तंव माझें तान्हें बाळ । ह्मणोनि वाटत असे कळकळ । परी तूं स्वतंत्र नाहींस केवळ । तेथें मम अन्याय कोणता ॥ १० ॥ तुज मी सांगतो कांहीं । तिकडे आतां लक्ष देई । सांडोनि बहुत ग्रंथाची नवाई । धरीं सोई आत्ममार्गाची ॥ ११ ॥ एकाग्रचित्तीं एकांतीं । जाऊनि बैसें निर्मलक्षितीं । सद्गुरुरूप आठवूनि चित्तीं । आत्मप्रीति साधावी ॥ १२ ॥ मग डावे मांडीवरी उजवा पाय । तैसा उजवीवरी ठेवीं डावा पाय । ऐसें आसन साधूनि स्वयें । मग करावें स्थिर मन ॥ १३ ॥ हनुवटी हृदयीं लावीं । दृष्टी भ्रूमध्यें घालावी । ऐशियापरी साधावी । योगमुद्रा ॥ १४ ॥ मग आधीं दिसेल रक्तवर्ण । पुढें दिसेल श्वेतवर्ण । जैसा चंद्राचा प्रकाश जाण । तैसें चांदणें चक-

चक ॥१५॥ पुढें दिसेलश्यामवर्ण जया ह्मणती देह कारण। नंतर दिसेल नीलवर्ण । महाकारण निर्मल जें ॥ १६ ॥ पुढें दिसेल अति आंधार। तेथें चित्त न राहे स्थिर। परी धैर्य धरूनि साचार। पुढें दृष्टी फेंकावी॥१७॥ येथवर पुष्कळ योगी येती । शेवटीं मागें पलटूनि जाती । जरी सद्गुरु भेटेल कृपामूर्ती । तरीच पावती पार ते ॥ १८ ॥ जरी अनंत जन्मीचें नसेल सुकृत । तरी हें न सांपडेल निश्चित । पुनःपुनः नीलबिंदुगत । दृष्टी फिरे ॥ १९ ॥ जरी नसती पुण्यें कोटी । तरी कधीं न चाले पुढें दृष्टी । ह्मणोनि सोहं मंत्र कोटी । जपावे आधीं ॥ २० ॥ मग तो आंधार निरसोनि जाय । कोटिसूर्याची प्रभा होय । येथें कधीं घाबरूं नये । पुढें चालावें सावधपणें ॥ २१ ॥ येथें जे कोणी घाबरती । ते अर्धवट विदेही होती । पिशासारिखे राहती । जगामध्यें ॥ २२ ॥ एथूनि सावध जाय वाटे । पुढें दृष्टी फेकें नेटें । मग ब्रह्मांड उजळलें वाटे । एकाएकीं ॥ २३ ॥ त्या प्रकाशामध्यें अकस्मात । एक सिंहासन दिसत । त्यावरी प्रत्यक्ष भगवन्त । चतुर्भुज दिसतसे ॥ २४ ॥ शंख-चक्रपद्मगदा । ऐसिया पाहतां गोविंदा । त्रिविध तापाच्या आपदा । तुटोनि जाती ॥ २५ ॥ वेदाचें काहीं न चाले । शास्त्राचें मौन पडिलें । अठरा पुराणें परतले । लाजोनि मागें ॥ २६ ॥ ऐसी साधणें जीवन्मुक्ती । त्याला देवही शरण येती । परी भुलो नये तयांप्रती । भुलतां श्रीपती अंतरतो ॥ २७ ॥ जो चमत्कारामध्यें पडला । तो काळाचे मुखीं सांपडला । जो न भुले लोककीर्तीला । त्यासि सांपडला भगवन्त ॥ २८ ॥ ऐक कन्ये ताई । तुज आवडेल तरी हें घेई । नाहीं तरी सोडून देई । व्यर्थ खटपट करूंनको ॥ २९ ॥ तूं जरी पढलीस नाना ग्रंथ । चारी वेद केले जरी मुखोद्गत । तरी या वस्तूवांचोनि मुक्त। कधीं न होसी ॥ ३० ॥ म्या तुझा शुद्धभाव पाहोनी । दृष्टांत दिधला स्वप्नीं येऊनी । प्रेमाचा वृक्ष लावोनी । ठेविला असे ॥ ३१ ॥ गंगाबाई निज जननी । मस्तक ठेवूनि तुमचे चरणीं । हे ओंवीबद्ध वाणी । बोलणें आतां संपवितों ॥ ३२ ॥ हरिःॐ तत्सत् इति द्वितीय पत्रकं संपूर्ण ।

॥ श्री सद्गुरु ज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

## ॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

## ॥ पत्र ३ रें ॥

ॐ नमो जी ज्ञानेश्वरा । भक्तवत्सला करुणाकरा । विश्व-व्यापका दीनोद्धारा । स्वसुखोदारा श्रीसद्गुरु ॥ १ ॥ कन्यामनीं भागिरथी । पूर्ण होवो तव मोक्ष आरती । दिक्कालरहित तुज-प्रती । सुख निश्चितीं मिळो कां ॥ २ ॥ उत्तम तुझीं तीन्हीं पत्रें । आलीं प्रेमबद्ध पवित्रें । तीं वाचूनि विचित्रें । स्वानंदभरें मन धालें ॥३॥ ज्ञानेश्वरीचा विचार । तुज घडला साचार । येणें योगें मम अंतर तृप्त आहे ॥ ४ ॥ सगुण योगाची प्रतीति । जरी अपूर्ण राहिली निश्चितीं । तरी योग पहावयाची आसक्ती । सोडूं नको ॥ ५ ॥ आणि मनपवनाच्या भेटीं । घालीं सोहंची गांठी । ब्रह्मउपासनेची कसोटी । लावीं अंगीं ॥ ६ ॥ आणि तुझें आत्मरूप जें निर्गुण । त्यातें पाहीं सांडोनि त्रिगुण । मी देह ऐसा अभिमान । त्यागूनि उन्मन मना करीं ॥ ७ ॥ वाचूनियां परमामृत । तीन्ही देह निरसीं त्वरित । घेऊनि आत्मरूपप्रचीति । मग शोकमोहार्थ भ्रमूं नको ॥ ८ ॥ सद्गुरुप्रेमें क-रिसी शोक । हें तंव अनुचित निष्टंक । आत्मा सर्वांतरीं साक्षी एक । तेथें नसती देख गुरुशिष्य ॥ ९ ॥ देहासीच गुरु मानिसी । तंव तो असे विनाशी । जरी आत्म्यासि गुरु ह्मणसी । तरी तो सर्वांशीं साक्षित्वें वर्ते ॥ १० ॥ यालागीं विचार करूनि पाहीं । भ्रांति जाणूनि सर्वही । पडूं नको नसते प्रवाहीं । होऊनि विदेही रहा सुखें ॥ ११ ॥ आत्मा तुझा माझा एक । तो जाणूनि सोडीं भेद विकल्प । याच देहीं जीवन्मुक्ति-सुख । निष्कलंक सेविजे ॥ १२ जैसें घटीं बिंबलें घटाकाश । घट फु-टलिया तें महाकाश । परी कधींहि न घडे नाश । गगनाचा पैं ॥१३॥ तैसें जड शरीराच्या लोपीं । सर्वथा नाश नाहीं स्वरूपीं । ह्मणोनि हें तों नारोपीं । भ्रांति माये ॥ १४ ॥ अहो हे साध्वी जननिये । या बोधामृतीं तृप्त राहें । मग विश्व व्यापूनि ब्रह्मचि आहें । हें वाटेल स्वयें तुजलागीं ॥ १५ ॥ हें तत्व न जाणतां देख । वैकुंठीं जातांहि न

सुटे दुःख । यालागीं सेवोनि आत्मसुख । सांडीं शोक महाभागे ॥१६॥ परी तुज जें उपदेशिलें कांहीं । तें न उघडावें प्राण गेलियाही । कोणी अधिकारी असलिया पाहीं । मग अर्पी ते ठायीं किंचित ॥ १७ ॥ तुझा सगुणयोग असे अपूर्ण । परी निर्गुणयोग असे पूर्ण । यालागीं विशेषतः करावा निर्गुण । सामान्यतः सगुणहि पहावा ॥ १८ ॥ असो बोध जहाला एथवरी । इकडे कुशल आहे सर्वोपरी । मी गेलों होतों पंढरी । पहावया श्रीहरी भक्तसखा ॥ १९ ॥ तेथें करूनि चंद्रभागा स्नान । घेतलें पुंडलिकाचें दर्शन । पुजोनि विठ्ठलरुक्मिणीचरण । स्वग्रामा परतूनि आलों पैं ॥ २० ॥ या पंढरीयात्रेचें सुकृत । ताई म्यां दिधलें समस्त । यावरी आशीर्वाद अनंत । दिधलें पुन्हा ॥ २१ ॥ हें वाचूनियां पत्र । पुढें लवकरी पाठवी उत्तम । तुझीं प्रेमळ वचनें मधुर । वाटती मातें ॥ २२ ॥ सद्गुरु ज्ञानेश्वराचे पायीं । प्रेमभावें तल्लीन होई ! मग तत्प्रसादें याच देहीं । जीवन्मुक्त होई मम कन्ये ॥ २३ ॥ तृतीय पत्रकं संपूर्णम् ॥

॥ श्रीसदगुरुज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

---

## ॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

### ॥ पत्र ४ थें ॥

( गद्य. )

गंगा भागीरथी कन्या मनी उर्फ भागीरथीबाई हीस अनेक आशीर्वाद विशेष. तुझें विनयपत्र आलेलें वाचून परमानंद झाला. परंतु तूं वारंवार स्वेदयुक्त होतेस हें उत्तम नाहीं. यद्यपि तुज असें वाटत असेल कीं, गुरुचरणीं सदा प्रेमयुक्त असावें; तथापि तुला शोक करण्यास अवकाश नाहीं. कारण शोक, मोह, भय, राग, द्वेष काम

क्रोध, दंभ विकल्प इत्यादि मनाच्या उर्मी, केवळ देहच मी मानणाऱ्या अहंकाराच्या ठायीं राहतात. आणि तूं तर त्या अहंकारास जाणून स्वात्मरूप निस्संग व त्याहून भिन्न आहेस; हा प्रत्यक्ष अनुभव तुला झाला असूनहि, शोकादि अहं ऊर्मी, तुझे ठिकाणीं कशा संचार करितात!! तूं लिहिलें कीं, आपल्या उपदेशा प्रमाणें क्रम सुरू आहे; पण मला असें वाटतें कीं, तुला अनुभव प्राप्त झाला हें खरें; परंतु वैराग्य प्राप्त झालें नाहीं. ह्मणूनच शोकादि ऊर्मी, तुझे ठायीं बळेंच संचार करितात. कदाचित् गुरुप्रेमामुळें शोक करीत असशील; तर तेंहि उचित नाहीं. बरें, तूं गुरु तरी कोणाला मानितेस? देहास, अहंकारास, किंवा आत्म्यास, देहास गुरु मानून शोक मानीत असशील, तर देह काष्ठवत् जड व पांचभौतिक असून नाशवंत आहे. याविषयीं शोक करणें अनुचित होय. आत्म्यास जर गुरु मानीत असशील, तर तो निस्संग, चैतन्यघन, अव्यय, निर्मल, सर्वव्यापी, अविनाशी व नित्य असा आहे. तो तुझ्या आणि माझ्या अंत:करणांत एकच आहे. मग भ्रमानें आपला आपण शोक कां करतेस? अहंकारास जर गुरु मानीत असशील, तर तो मिथ्या व सर्वथैव भ्रांतिमूलक आहे. सर्वस्वी बंधनरूप व सुखदु:खहेतु हा अहंकारच आहे, हें तूं जाणत असूनही पुन:पुन्हा त्याला धरून वासनेच्या जालांत गुंतून, जन्ममरणाच्या भोवऱ्यांत सांपडतेस, तर आतां तुझें ज्ञान किती ह्मणून वर्णन करावें. हे साध्वी, या जगांत कोण कोणाचे पुत्र! कोण कोणाचे आईबाप! कोण कोणाचीं भावंडें! कोण कोणाचे गुरुशिष्य! कोण कोणाचा पति! कोण कोणाचे मित्र! तस्मात् हें सर्व स्वप्नाप्रमाणें इंद्रजाल आहे. मग याविषयीं शोक करणें मूर्खत्व नव्हे काय? तस्मात् हे साध्वी, हीं माझीं अक्षरें हृदयांत धरून, शोक सांडून स्थितप्रज्ञ होऊन, अखंड ब्रह्मानंदांत निमग्न रहा. आणि हें तूं न जाणशील तर प्रत्यक्ष वैकुंठांत जाऊन देखील तुझें दु:ख नष्ट होणार नाहीं. ह्मणून लिहिल्या अक्षरांचा पूर्ण विचार कर, आपले ठिकाणीं संतुष्ट हो, आणि पूर्वीं सांगितलेला उपदेशक्रम सोडूं नको. तेणेंकरून सहजच जीवन्मुक्त होशील. परंतु एवढें लक्षांत ठेव कीं जे कुतर्की, श्रद्धाशून्य, मूर्ख, विषयांध, दांभिक, वरवर उत्तम आणि आंत वाईट, द्वेषी अशा पुरुषांना मी केलेल्या

उपदेशांतील एक चकार शद्व देखील सांगू नको, आणि होईल तितक्या अवकाशानें सत्समागम करीत जा. कितीही जरी दुस्तर प्रसंग आले तरी आपला मार्ग सोडूं नको. हा ज्ञानेश्वरकृपेनें लिहिलेला लेख याचा विचार करून तृप्त हो. पूर्णता. पुन्हा प्रसाद. चतुर्थ पत्रकं संपूर्णम् ॥

॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥

---

## ॥ श्रीमत्सद्गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

### ॥ पत्र ५ वें ॥

ॐ नमो जी ज्ञानदेवा । नित्य घडो तुमची सेवा । तुमचा प्रेमप्रसाद ठेवा । जन्मोजन्मीं सांपडो ॥ १ ॥ जय ज्ञानदेवा श्रीगुरुमूर्ती । अखंड अविनाश तुझी कीर्ती । तव कृपें ममकन्येप्रती । स्वात्मस्फूर्ति पूर्ण हो ॥ २ ॥ अथवा जेवढें मी पुण्य केलें । ताई तुज तें सर्व दिधलें। तेणेंयोगें तुज वहिलें । भवदु:ख सर्वदा न बाधे ॥ ३ ॥ तुझा प्रेमळ पत्रलेख । वाचूनि हरपलें सर्व दु:ख । वाटे जणूं ब्रह्मसुख । जवळि आलें ॥ ४ ॥ तुझी वाक्यवृत्ति मधुरा। ऐकोनि सुटल्या विमलांबुधारा । सर्व प्रेमाचा निगूढ थारा । एकसाधारां ॥ ५ ॥ तूं लिहिलें वाक्य एक। कीं मजमध्यें उठती वृत्ति नास्तिक । तरी तो मिथ्या जाणोनि सम्यक । त्यागीं सकळ ॥ ६ ॥ हें वाईट हें उत्तम । ऐसे सकळ बुद्धिचे धर्म । बुद्धिवेगळा आत्माराम । तेथें काम निष्काम दोन्ही नाहीं ॥ ७ ॥ मज झालें सुख दु:ख । हे अहंकाराचे धर्म देख । आत्मयाचा जाणता निष्टंक । तेथें सुख, दु:ख दोन्ही नाहीं ॥ ८ ॥ आपुलें जें कामीपण । तें समूळ सांडावें चित्तांतून । मग जें उरेल जाणीवपण । तेंचि प्रमाण रूप तुझें ॥ ९ ॥ तेथें न चले वृत्तीसि फाव । सरली अभ्यासाची हाव । शद्व आघवे झाले वाव । मृगजलवत् मिथ्यात्वें ॥ १०

## गद्य.

हे जननी, जोंपर्यंत मीपणा असतो, तोंपर्यंतच निश्चय असतो. अमुक वस्तु आहे ह्मणण्यास जसा निश्चय करावा लागतो, तसा अमुक वस्तु नाहीं असें ह्मणण्यासहि निश्चय करावा लागतो. आणि निश्चय तर बुद्धीचा धर्म आहे. पण तूं बुद्धीहून निराळी आहेस. तुला ज्या नास्तिक वृत्ति वाटतात, त्या थोडासा निश्चयाचा अंश राहतो ह्मणूनच. तर तूं आतां असें कर कीं, आहे किंवा नाहीं हा निश्चय सोडून केवळ जाणीवरूपच होऊन बैस. घोटाळ्यांत पडशील तो संशयहि सोडून दे; एकदेशीय निश्चयहि सोडून दे व स्वतः तूंच होऊन रहा. परंतु एक मात्र खबरदारी ठेव कीं, वाचेनें अथवा देहानें मीपणा सुटला तरी, मनांत मात्र त्याची ऊर्मी रहात असते. कोणतेंहि काम करतांनां हा मीपणा जर नसेल तर शरीराला देखील चालण्याची शक्ति नाहीं. हा मीपणा प्रथम मनावर येतो; नंतर वाचेवर येतो, ह्मणून याला तूं मनांतल्या मनांतच दाबून टाक. परंतु मी याला दाबतें, अशा प्रकारचा एक मीपणा उठवून दुसरा मीपणा दाबून घेऊं नको. तर जेव्हां सर्व वृत्तींचा लय होईल तेव्हां तूं आपल्या मीपणाचा लय करून, स्वतःला विसरून जा. याला समाधि ह्मणतात. सर्व आनंदाचें स्थान हेंच. हें प्राप्त झालें ह्मणजे अभ्यास संपला. मग वृत्ति उठेना बापडी. धुळीनें का कधीं आकाश मळत असतें ? परंतु याचा विचार मनांतच कर. ईश्वरकृपेनें तें तुला मिळालेंच आहे; व त्याची वृद्धिहि होईल. साऱ्या शास्त्रांचें रहस्य तें हेंच. या विषयीं **अमृतानुभवाच्या** ८ अध्यायांत ज्ञानेश्वर ह्मणतात:— ( ओंवी ) परी आह्मां आह्मीं आहों । तें कैसें पाहों जावों । तंव काय कीजे ठावो । लाजिजे ऐसा ॥ १ ॥ ही गोष्ट वाचेनें कधीं सांगतां येत नाहीं; तर ती आपली आपणच जाणली पाहिजे. याविषयीं त्याच अध्यायांत पुन्हा ह्मणतात:— किं बहुना श्रीनिवृत्ति । ठेविलों असों जया स्थितीं । तें काय देवों हातीं । वाचेचिया ॥ १ ॥ याहून परतें वेदांत शास्त्रांत ईश्वराजवळ किंवा गुरूचे हृदयांत दुसरें काहीं नाहीं. याविषयीं भगवान् ज्ञानेश्वर ह्मणतात:— यया परौतें काहीं । सच्चिद्रहस्य नाहीं ।

आणि हें तया आधींही ॥१॥ असतचि असे ॥ जें जें बोलिलें तें तें नव्हे । होय तें तंव न बोलवे । साउलीपरी न मववे । मविते जैसे ॥ २ ॥ हे देवी, तूं परमगुह्य जाणून श्री सद्‌गुरु ज्ञानेश्वर प्रसादीं तद्रूप हो.

ओंव्याः—आतां भय सांडूनि सकळ । तूं ब्रह्मचि होय केवळ । या अनुभवाचें उत्तर । तत्काळ लिहूनि पाठवी ॥ ११ ॥ तुझी प्रेमाक्षर मधुर वाणी । सुखद वाटे वो मायबहिणी । तरी आळस न करोनी । पत्रोत्तर पाठविजे ॥ १२ ॥ श्रीज्ञानेश्वरगुरु समर्थ । तुझे पुरवो मनोरथ । आशीर्वादहि अनंत । तुज पावोत सम कन्ये ॥ १३ ॥ हारिः ॐ तत्सत् इति पंचम पत्रकं संपूर्णम् ॥ मणिकर्णिका रामचंद्रभाऊ व नामदेवभाऊ यांचे अनेक आशीर्वाद.

॥ श्री सद्‌गुरुज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

## ॥ पत्र ६ वें ॥

ॐ नमो जी भक्तवत्सला । सच्चिदानंदा पूर्णा निष्कला । श्री ज्ञानेश्वर प्रभू सद्‌गुरु दयाला । विश्वपाला सुखार्णवा ॥ १ ॥

सद्‌गुणखाणी कन्या मनी तथा भागिरथी हीस अनेक आशीर्वाद. अभिनंदनादि विनंति विशेष. तुझें पत्र मामीचे हस्तें येऊन पोंचलें. तें वाचून परमानंद जाहला. तूं लिहिलें कीं, मी सर्वदा एकच गोष्ट लिहीन, तर श्रीगुरूस दुःख होईल, पण ही तुझी गोष्ट असंबद्ध आहे. कारण तूं कितीहि जरी कडक लिहिलें, तरी भरतास रामवचनाप्रमाणें मला तुझीं वाक्यें प्रेमळच वाटतात. पण तुझें दुःख जात नाहीं, एवढेंच मात्र मला दुःख वाटतें. एरवीं, तुझ्या लिहि

ण्याचें दुःख वाटत नाहीं. हे आई, मी जसा इतरांवर कृपादृष्टीनें ज्ञानामृतवर्षाव करितों, तसा तुजवरहि करीत आहें. परंतु त्यामध्यें एवढें मात्र विशेष आहे कीं, तुझा निस्सीम प्रेमा पाहून धेनुवत्सन्यायें, माझें साद्रींत:करण चित्त, मन व बुद्धि हीं सर्व तुजकडेसच धांव घेत आहेत. जशी तूं मला माता, पिता व गुरु मानीत आहेस, तद्वत् मीहि तुला कन्या, जननी व बहीण मानीत आहें. तुझें चित्तांत शुद्ध भाव, निस्सीम प्रेम, ज्ञान, वैराग्य व अकृत्रिम भक्ति या पंचारविंदांचे ठायीं, साक्षात् स्वानंदघन, वैकुंठनिवासी, उरुक्रम भगवान, परमात्मा, तो देखील आपलें कृपास्पद करील. मग आह्मां क्षुद्र प्रेमळांची कथा काय? तुला मुळींच उपवास करावे लागत नाहींत. व तूं उपवासी होत नाहींस. आतां तुला ज्या परमेश्वराचा आश्रय पाहिजे, तो परमेश्वर तुजहून भिन्न नाहीं. विचारून पहा; सूर्य कोठें बोचक्यांत सांपडला आहे काय? अग्नि कोठें तृणांत लपला आहे काय? याच प्रमाणें परमेश्वर मायेच्या आवरणांत केव्हांही लपत नाहीं समुद्रांत जशा हंसाच्या उदकपानार्थ, गोड जललहरी उठतात, त्याचप्रमाणें अखंडैकरस ब्रह्मानंदसमुद्रांतून भक्तांच्या प्रेमदानार्थ, किंवा जिज्ञासूंच्या ज्ञानदानार्थ रामकृष्णादि अवतार आणि जगदुपदेशक सद्गुरु, हे तरंगामृताप्रमाणें जगांत येऊन त्यांचीं कार्यें झालीं ह्मणजे पुन: ते आपल्या ब्रह्मसमुद्रांत एकदम लीन होतात. सारांश हें सारें क्षणिक आहे. ब्रह्मा विष्णु, महेश्वर, किंवा रामकृष्णादि अवतार यासारखेच अनंत जीव, त्या आत्मसमुद्रांत कोणीकडे तुषाराप्रमाणें पडले असतील, याचा थांग लावण्यास श्रुतीही समर्थ झाली नाहीं. असें जरी आहे तरी, आपण त्यांतून तृषेपुरतें उदक घेतलेंच पाहिजे. हे साध्वी, आपण सर्व एका त्या परमात्म्याचे अंशभूतच आहोंत. परंतु दोरीवर जसा सर्पाचा भास होतो, तशा भ्रमरूप मायेनें किंवा खरोखर पाणी नसतांहि सूर्याचे ठायीं वास्तविक उष्णताच; पण दृष्टीला मात्र पाण्यासारखें भासणारें, जें भ्रमरूप मृगजल; तशीच ब्रह्मतेजरूप सूर्याचे ठायीं भासणारी ही मृगजलवत् माया आहे. तिच्या योगानें आपण मुळींच ब्रह्म असतांहि आपणांस जीवत्व प्राप्त झालें. तें जीवत्व ह्मणजेच देहाभिमान होय. देहच मी आहें अशी जी बुद्धि; तिच्याच योगानें आपणास

चांगलीं वाईट कर्में घडतात. आणि त्या कर्माच्या योगानें प्रवृत्त झालेली जी वासना, तिच्या योगें जन्ममरण भोगावें लागतें. ह्मणून तूं मी देह आहें अशा बुद्धीचा त्याग करून, मी ब्रह्म आहे, अशी दृढ बुद्धि धारण कर. परंतु येथें सूक्ष्म विचार केला पाहिजे. नाहीं तर मी देह नव्हें असा मनांत जप करीत करीत, स्वप्नासारखा एक कल्पनेचा देह तयार करून, जर आत्मानुभव घेण्याला जाशील, तर, मात्र, अनंत देह फिरूनहि, तो तुला मिळणार नाहीं. ब्रह्मज्ञान अगदीं सोपें आहे. तें सर्वत्र व्यापकच आहे, परंतु तूं जशी मी देह आहें ही बुद्धि सोडून देतेस तसा तो मीपणाहि विरवून आनंदमय होत्साती स्तब्ध रहा. यासच समाधि ह्मणतात. येथें नामाची गरज नाहीं व रूपाचीहि गरज नाहीं. वर सांगितलेलें ब्रह्मांडरूप ब्रह्म; तेंच तुझें खरें स्वरूप आहे, मी स्त्री आहें, मी ब्राह्मण आहें व हें घरदार, सासु, सासरे, हे माझे आहेत, असें मानणें, देहच मी आहें या अहंकाराचें आहे. तूं या अहंकाराहून भिन्न आहेस. आत्म्याचे ठायीं तूं, मी, हे शब्द नाहींत. पण ते तुला बोध होण्यासाठीं पत्रांत लिहिले आहेत. तुला ज्या अनंत कल्पना येत असतील, त्या कोणत्या रीतीनें येतात ? ज्ञानावर विश्वास बसत नाहीं अशा येतात ? किंवा तुझ्या अभ्यासांत व्यत्यय आणणाऱ्या संसारासंबंधीं येतात ? अथवा भलत्याच काहीं तरी येतात ? भलत्याच येत असतील तर त्या मिथ्या आहेत, असें ह्मणून सोडून दे. जर संसारसंबंधीं अभ्यासांत व्यत्यय आणणाऱ्या कल्पना येत असतील, तर मनांत वैराग्य धरून, थोडी थोडी सत्ता मिळवून, धैर्यानें व्यत्ययरूप कल्पना सोडून दे. आणि आत्मज्ञानावर विश्वास न ठेवण्याविषयीं कल्पना येत असतील, तर जडचैतन्याच्या विवेकानें, त्यांचा नाश कर. तो विवेक येथें सांगतो:—सृष्टींत दोनच पदार्थ आहेत. ते कोणते ह्मणशील तर जड आणि चैतन्य. आतां यांच्या व्याख्या सांगतो. आपणालाही जाणतें व दुसऱ्यालाही जाणतें त्याला चैतन्य ह्मणतात. स्वतःलाही जाणत नाहीं व दुसऱ्यालाही जाणत नाहीं तें जड. आतां विचार करून पहा कीं, तूं जड आहेस कीं चैतन्य आहेस ? तुझा देह आपणालाहि जाणत नाहीं व दुसऱ्यालाहि जाणत नाहीं. ह्म-

णूनच तो जड आहे. तूं तर देहालाहि जाणतेस व त्या जाणिवेलाही जाणतेस, ह्मणून तूं चैतन्य आहेस. या जडचैतन्याचे विवेकानें, स्थिरबुद्धि होऊन, जें जें जड असेल त्याचा बुद्धीनें त्याग कर, आणि निश्चय, संशय व मीपणा यांसाहित चैतन्यांत लीन हो. मग, हे ताई, तूं आणि ईश्वर यांत दुजेपणा कसा राहिला हें तूंच सांग. हे बहिणी, या ज्ञानासच अद्वैत ज्ञान किंवा ब्रह्मज्ञान ह्मणतात. या ज्ञानरूप आत्म्याहून तुझा कृपालु ईश्वर, तुझ्या मतें, जर कोणी निराळा असेल, तर आह्मीं त्याचें तोंडहीं पाहूं इच्छीत नाहीं. कारण त्याला आह्मीं स्पष्ट जड ह्मणतों. चैतन्याहून निराळें तें सारेंच जड. मग त्याला कृपालु ह्मणावें तरी कसें? बरें, चैतन्यालाच जर ईश्वर मानीत असशील, तर तुझ्या हृदयांतील चैतन्य व ईश्वर हे सहजच एक झाले. सारांश ईश्वर, तूं व मी हे सर्व एकच आहों. देहबुद्धि मात्र सुटली पाहिजे. धुळीनें जसें आकाश मळत नाहीं; तशी अनंत कल्पनानींहि तुझी हानी होत नाहीं. देहबुद्धि नष्ट झाली ह्मणजे सर्व कल्पना आपोआपच नष्ट होतात. पुष्कळ जन्माची देहबुद्धि एकदम नष्ट कशी होईल? ती ज्ञान झालें तरी, पुनःपुनः उठत असतेच. याला तोच अभ्यास पुनःपुनः केला पाहिजे. दुसरा उपाय नाहीं. ( या विषयीं तिसऱ्या अध्यायांतील ३३ व्या श्लोकावरील ज्ञानेश्वरी पहावी. ) हे जननी, या ज्ञानानें आतां तुला नवा जन्म घ्यावा लागणार नाहीं. आणि तुला भीतिच असेल तर त्याही जन्मीं पुत्ररूपानें येऊन मी तुझा उद्धार करीन, आणि तुजबरोबर अनेक मुमुक्षूंचेंहि कल्याण करीन. तूं सर्वथा भिऊं नको. या ज्ञानाचा विचार जर तुला आतांच झाला, तर तुला पुन्हा जन्म खचित प्राप्त होणार नाहीं. सर्व हृद्गुह्य मी या पत्रांत लिहिलें आहे. म्हणून तूं याचा नीट विचार कर. एकाएकीं हें भलत्याच्या हातीं जाऊं देऊं नको. तुझ्या ज्या काहीं कल्पना सांगण्या सारख्या असतील, त्या लिहून पाठीव. त्यापासून मला दुःख होत नाहीं. उत्तराविषयीं आळस करूं नको. तुझीं प्रेमळ वचनें अति मधुर वाटतात. म्हणून त्यांची प्रतीक्षा करीत आहे. तुला जें दुःख आहे, तें मामीच्या मुखानें कळलें. त्याचें निवारण होईल. सध्या धीर धर. त्या मुळें जर तुला कल्पना येत असतील तर ज्ञानानें व

नामानें, त्यांचें शांतवन करून सध्या स्थिर हो. तुला ज्ञानेश्वराचा प्रसाद आहे. ते भगवान् सदगुरुच, तुझे मनोरथ पूर्ण करोत. पत्र वाचून उत्तर लवकर पाठीव. ( ओंवी ) सर्वत्र यशस्वी सदगुरु । जो बाप माउली ज्ञानेश्वरु । जो सच्चिदानंद निर्विकारू । तत्कृपे उद्धार तुझा कन्ये ॥ हरि:ॐ तत्सत् इति षष्ठ पत्रकं संपूर्णम् ॥

॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥

======

## ॥ श्रीमतसद्गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

### ॥ पत्र ७ वें ॥

**आर्या:**— यदुकुळीं जन्मुनि ज्यानें गोपींचा भाव गोकुळीं हरिला ॥
दिधलें निजपद संतां नमितों त्या विश्वव्यापका हरिला ॥१॥

**ओंव्या:**— कन्या मनी भागीरथी । तुज प्रसन्न असो श्रीपती । सकळहि तुझ्या अनुभवाप्रती । अर्पी भगवंतीं महाभागे ॥ १ ॥ ज्या ज्या कल्पना उठती मनीं । त्या त्या त्यागी असत्य मानुनी । दुसरे पत्रीं निर्वाणीं । उपपत्ति सोपी सांगेन ॥ २ ॥ तूं लिहिलेंस पत्र । कीं अहिल्याबाइनें मारिला पुत्र । तैसेंचि मज करावें परत्र । तरि हें असंबद्ध कीं ॥ ३ ॥ तूं जरी गेलीस नरकांत । तरी मी होऊनि तव सुत । उद्धार करीन निश्चित । मग भय व्यर्थ कां जननी ॥ ४ ॥ तुज जरी प्राप्त झाला नरक । तरी मी सोडोनि मोक्ष सुख । अवतरेन तेथें निःशंक । भय सर्वथा धरूं नको ॥ ५ ॥ ब्रह्म स्वयं सर्वव्यापक । तेथें नाहीं स्वर्ग नरक । व्यर्थ मानूनि काल्पनिक । करिशी शोक कासया ॥ ६ ॥ आहे तुझा प्रवेश निर्गुणीं । नरकभय मानिसी मनीं । कल्पवृक्षाखालीं बैसोनी । दारिद्र्य कल्पिसी किमर्थ ॥ ७ ॥ कर्में करावीं चित्तशुद्धि । भक्तीनें करावी स्थिर बुद्धि । ज्ञानें साधावी मोक्षसिद्धि । याच देहीं

स्वतंत्र ॥ ८ ॥ अंगीं असावें वैराग्यबळ । चित्तीं प्रेमा असावा सोज्वळ । आत्मानुभव परम निर्मळ । असावा केवळ स्वानंदें ॥ ९ ॥ स्वर्ग नरक हे वासनबद्ध । त्यां नाहीं ज्ञानासी संबंध । हें जाणूनि तूं प्रसिद्ध । सांडीं भेदकल्पना ॥ १० ॥ तुझें वाचूनियां पत्र । परमानंद झाला थोर । पुढें पाठवीं उत्तर । प्रेमळ मधुर जननिये ॥ ११ ॥ जो सत्य ज्ञान अनंत । परब्रह्ममूर्ति भगवंत । श्री ज्ञानेश्वर कृपावन्त । पुरवील मनोरथ तुझे तो ॥ १२ ॥

टीप:— यांत कांहीं गुप्त लिहिलें आहे; ह्मणून भलत्यांचे हातीं न द्यावें. हरि:ॐ तत्सत् इति सप्तमपत्रकं संपूर्णम् ॥

॥ श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु. ॥

---

## ॥ श्री ज्ञानेश्वरमाउली समर्थ. ॥

## ॥ पत्र ८ वें ॥

**ओंवी:**— ॐ नमो जी कृपावंता । श्री ज्ञानेश्वर सद्गुरुनाथा । अभय हस्त माझिया माथां । ठेवूनि वाक्यार्था चालवावें ॥ १ ॥

**श्लोक:**— ज्याला ब्रह्म असेंचि बोलति सदा वेदांतवेत्ते मुनी ।
ज्या सांख्य प्रकृती पुमान्हि ह्मणती कर्माख्य तें जैमिनी ॥
नैयायीक जयास ईश वदतीं विश्वत्रया कारण ।
अस्मद्विघ्नविनाशकारक प्रभू तत्पादुकीं वंदन ॥ १ ॥

**ओंवी:**— कन्या मनी भागीरथी । तुज मिळो कैवल्यसंपत्ती । अखंड ब्रह्मानंद स्थिती । निजात्मगती निश्चयें ॥ १ ॥ आतां भय सांडूनि सर्व । अंतरीं धरी शुद्ध भाव । मग ब्रह्मैक्यानुभव । सहजचि लाहे ॥ २ ॥

( गद्य. )

हे जननी, जीवाची सुटका होण्याकरितां पुत्रवात्सल्यानीं श्रुतिमातेनें कर्म, उपासना व ज्ञान असा त्रिविध मार्ग निर्देश केला आहे. बुद्धीचे ठायीं तीन दोष असतात. ते मल विक्षेप आणि आवरण या नावानें प्रसिद्ध आहेत. मल हें पापाचें नांव आहे. जन्मांतरीं केलेल्या दुष्कृतीमुळें, सदोष संस्कारदूषित बुद्धीची, दुष्ट विषयाचे ठायीं प्रवृत्ति होते, आणि त्याप्रमाणें पुन्हां दुष्ट विषयाचें आचरण केल्यावर, तेच संस्कार दृढ होऊन, उत्तरजन्मास कारण होतात. हे जननी, अशा अनंत जन्माच्या दुर्निवार्य संस्कारग्रंथि, अंतःकरणांत कशा रुजून बसल्या आहेत, आणि त्याचा अविरल प्रवाह जन्ममरणरूप बंधनास कारणभूत कसा झाला आहे तो पहा. आई, कर्माचा नियम अबाधित आहे. याचीं उदाहरणें पुराणांत आहेतच त्यांतील एक उदाहरण सांगतों. इंद्रपद घेण्याकरितां बळि राजानें शंभर यज्ञ करून, भगवान् वामनरूप परमात्मा जवळ आले असतांही त्याला ज्ञान झालें नाहीं. इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष देवानें त्याच्या मस्तकावर पाय ठेवून, पाताळीचें राज्य दिल्यावर देव द्वारपाळ झाले. परंतु हा परमात्मा आहे, असें बळीनें स्वप्नांत देखील जाणलें नाहीं. हें कशाचें फळ? तर कुकर्माचें. ताई! तूं आपल्याकडेच पहा. तुझा जन्म उत्तम जातींत ब्राह्मण कुळांत, सद्गुण खाणींत झाला असून तुला पति आणि चांगलें ठिकाण मिळावें हें पुण्याचें फळ; पण त्यांतल्या त्यांतच पहा. एवढ्या वयांत आणि तारुण्य दशेंत, हा बालवैधव्याचा प्रसंगरूप प्रचंड पर्वत तुजवर काय ह्मणून कोसळला? याला कारण जन्मांतरींचें दुष्कर्मच ना? होय दुसरें काय ह्मणावें? जननि, एवढ्याही प्रसंगीं सुदैववशात् तुला आत्मप्राप्ति झाली आहे, हें कशाचें फळ? पाप आणि पुण्याची समान सांखळी आहे. कर्माचा नेम तर अगदीं कांटेतोल चालला आहे. त्यांत राईएवढासुद्धां बदल पडत नाहीं. तेंच कर्म असत् असलें ह्मणजे मलरूप होत. जननि, तुझ्या अनुग्रहाला थोडे दिवस झाले असूनहि, तूं आत्मप्राप्तीसाठीं अगदी विरक्त झाली आहेस. आणि तुझे बंधु वर्षानुवर्ष जवळ असतांहि आळसानें फुकट काळ

घालवीत आहेत. याला कारण अंतःकरणांतील मळच होय. या मलदोषनिवृत्तीसाठीं, श्रुतिमातेनें कर्ममार्ग निर्देश केला आहे. सत्कर्मे करून मलदोष निवृत्त करावा. तीं कर्में द्विविध आहेत. सकाम व निष्काम. सकाम कर्मांनीं मनुष्य बद्धच होतो, परंतु कर्म न करण्यापेक्षां तें बरें. जीं सकाम कर्में तींच निष्काम होतात. पण ईश्वरार्पण बुद्धीनें केलीं पाहिजेत. सकाम कर्म करणारे नित्यकर्मांच्या घोर जालांतच गुंतून राहतात. आणि निष्काम कर्में करणारे मात्र, भगवत्प्रेमानें मोकळे होतात. प्रत्येक जीव कर्मप्रवाहांत फिरत आहे. हें त्याच्या मनोवृत्तीवरून ओळखतां येतें. ज्या मनुष्याला व्यवहारांत पशुतुल्य वागावेंसें वाटतें, केवळ आहार, निद्रा, भय, मैथुन यांशिवाय दुसरें कळत नाहीं, ते मनुष्य पूर्वजन्मीचे पशु किंवा तामसच होत. त्यांचें जन्मास येणें आणि न येणें सारखेंच असतें. त्याहून उच्चतर कक्षेचे लोक, रजतमिश्र होत. त्यांचा व्यवहार केवळ कपटरूप असतो. ईश्वरावर पुरासा विश्वास नसतो. अशापासून, कोणाला केव्हांहि सुखप्राप्ति होत नाहीं. आणि किंचित् संगतीनें सुख झालेंच, तर त्याचा परिणाम अंतीं दुःखदच होतो याहून उच्च कोटीचे लोक शुद्ध रजोगुणी असतात. त्यांच्या अंगांत स्वार्थ भिनून जातो. त्यांचा ईश्वरावर विश्वास असतो, पण आज हा देव, तर उद्यां तो देव, अशी त्याची कामनेंसाठीं धांदल उडून जाते. त्यांनां थोडेसें दुःख झालें, तर ते दहा पंधरा देवाचे नवस,एकदम करून सोडतात, त्यांच्या पासून कोणास दुःख व कोणाला सुख होत असतें. याहून श्रेष्ठ लोक सत्वतममिश्र होत. यांचा ईश्वरावर पूर्ण भरंवसा असतो. आणि व्यवहारांतहि हे चतुर असतात. देशाभिमान, स्वराज्यप्रीति व थोडासा कपटभाव हे सर्वत्र त्यांचे हातून होतात. त्यांच्या हातून जितक्यांस सुख होतें तितक्यांसच दुःखहि होतें. त्याहून उच्च लोक, सत्वरजमिश्र होत त्यांनां व्यवहारांत चोख वागावेंसें वाटतें. असत्याचा थारा देखील त्यांनां आवडत नाहीं. इतकेंच नव्हे, तर ते असत्यास तिरस्कार बुद्धीनें पाहतात. त्यांच्या पासून बहुशः सर्वांस सुखच मिळण्याचा संभव असतो. त्यांनां विद्येची आभिरुचि असते. बहुशः मान आवडत नाहीं. आत्मस्तुति आणि परनिंदा यांचा त्यांनां

मनापासून तिटकारा असतो. पण दुसरी मजा ही कीं, त्यांचें मन आत्मप्राप्तीसाठीं झुरत असतें, पण संसार सोडवत नाहीं. केव्हां केव्हां वैराग्य उत्पन्न होतें, पण अंतरीं संसाराच्या चिंतेमुळें, त्यांची वैराग्य दशा टिकत नाहीं. त्यानां वैराग्य मोठें तीव्र होतें, आणि ते संसारांत लवकरच पडतात. कोणी आत्मबोध शिकवूं लागल्यास, त्यांची बुद्धि तिकडे लागते, परंतु मन मात्र निद्रेंत, आळसांत किंवा मलतीकडे भ्रमत असतें. हे पुरुष परमार्थदृष्टया जरी गौण असले, तरी व्यवहार दृष्टीनें ते उत्तम आणि साऱ्या विश्वाचें भांडार होत. ताई, तुझे वडील बंधु रामचंद्र याच कक्षेचे आहेत. याहून वरिष्ठ पुरुष शुद्ध सात्विक होत. त्यांची लक्षणें पुढें केव्हांही सांगेन. हे जननि, प्रत्येक पुरुषानें आपल्याकडे पाहून, ज्या गुणांचे आणि कर्मांचे आपण असूं, त्याहून अधिक गुणाची व शुद्ध कर्माची आपल्यांत भर घालीत गेलें पाहिजे. कोणी ह्मणतील कीं भर कशाला? आपल्या प्रारब्धांत असेल तसें होईल. तर हे मनुष्य पशूहून नीच ह्मणून समजावे. मनुष्यजन्मांत येऊनहि आपली उन्नति करून न घेतां जे केवळ प्रारब्धावरच हवाला देतात, ते जगांत येऊन आईला शीण व भूमीला भार दिल्याशिवाय दुसरें कांहीं साधीत नाहींत. ताई, प्रयत्नावांचून प्रारब्ध पंगू आहे. ह्मणून प्रत्येकानें आपल्या स्थितीकडे पाहून, असेल तेवढ्या आयुष्यांत उन्नति करण्याचा यत्न करावा. या विवेचना वरून कोण मनुष्य कसा आहे, हें तुला लवकर कळून येईल. तुझा अधिकार या सर्वांहून उंच आहे, ह्मणून तूं या कर्ममार्गाची अधिकारी नाहींस. हे ताई, तूं भय सोडून दे. आह्मी लहान बालकें तुझ्या पोटीं आहों तर तुला भय कशाचें? हरिः ॐ तत्सत् इति अष्टमपत्रे प्रथम भागः संपूर्णः॥

---

## ॥ अथ द्वितीय भाग प्रारंभः ॥

पूर्व भागांत सांगितलेल्या निष्काम कर्मांनीं, ज्याचें चित्त शुद्ध, झालें आहे, त्याला भगवान् स्वानुग्रहानें भक्तिपंथास लावतो. तोच पुरुष उपासनेचा अधिकारी होय. कर्मांनीं मलदोष नष्ट झाल्यावर,

राहिलेला विक्षेपदोष उपासनेनें निवृत्त होतो. विक्षेप नाम चंचलतेचें आहे, ह्मणजे एकाच ध्यानावर मन स्थिर न बसणें. काय करावें? माझें कल्याण कसें होईल? मी यज्ञ करूं कीं दान करूं? तपें करूं कीं तीर्थं करूं? याग करूं कीं योग करूं किंवा स्वस्थच राहूं? अशाप्रकारचे जे अनंत विचार त्यांसच विक्षेप ह्मणतात. हा विक्षेप भगवद्भक्तीनें नष्ट होतो. ही भक्ति कोणत्याही जातिकुलाची अपेक्षा करीत नाहीं. भक्तिकालीं सर्व कर्मे सुटतात. मग, कर्मकालांतील जातिकुल कसें राहील? ही भगवद्भक्ति अनेक प्रकारची आहे. शिव, विष्णु, आदिमाया भगवती, गणेश व सूर्य, या पंचायतन देवता किंवा षड्गुणैश्वर्यसंपन्न, परब्रह्मरूप उरुक्रम, भगवल्लीलाविग्रही, सत्परिपालक, रामकृष्णादि अवतार, यांतून कोणाचीहि भक्ति केल्यास, फलद्रूप होते. भक्तीचे अनेक प्रकार आहेत. त्यांतील चौदा प्रकार सांगतो. १ श्रवण = भगवद्गुणानुवाद ऐकणें; २ कीर्तन = भगवद्गुणानुवाद गाणें; ३ स्मरण = रामकृष्ण, गोविंद, हरि, शिव, दुर्गा, गजानन, भास्कर, वासुदेव, यांतून ज्या देवतेची प्रीति असेल, तिच्या नामाचा आसनीं, शयनीं, भोजनीं अविरल जप करणें; ४ पादसेवन = संत हे भगवान् आहेत असें समजून, त्यांची, तशीच श्रीगुरूची किंवा आपल्या आवडत्या मूर्तीची, प्रक्षालनादि उपचारांनीं पादपूजा करणें; ५ अर्चन = षोडशोपचारांनीं सर्वांगपूजा करणें; ६ वंदन = नमणें; ७ दास्य = मी देवाचा सेवक आहे, अशी भावना धरणें; ८ सख्य = देव माझा मित्र आहे, असा भाव धरणें; ९ आत्मनिवेदन = सर्व तुझेंच आहे व मीहि तुझाच आहें, ह्मणून आतां भीति नाहीं, असा भाव धरणें; १० मातृभक्ति = देवाला आई मानणें; ११ पितृभक्ति = देवाला पिता मानणें; १२ वात्सल्यभक्ति = देवास पुत्र मानणें; १३ माधुर्य भक्ति = गोकुळींच्या गोपिकासारखी पतिपत्नीभक्ति; याप्रमाणें, तेरा प्रकार ईश्वरसगुण भक्तीचे; आणि चौदावा श्रीगुरुभक्तीचा. ही श्रीगुरुभक्ति मागें सांगितलेल्या प्रकारांपैकीं, पहिल्या बारा प्रकारांनीं किंवा ज्ञानेश्वरीच्या तेराव्या अध्यायांत ३६९ ते ४६० ओंव्यांमध्यें सांगितलेल्या गुरुसेवेनें ही श्रीगुरुभक्ति घडते. ईश्वरभक्ति करणें असल्यास, त्याचे चतुर्भुज किंवा दशभुज, शिवरामकृष्णादि अवतारांचें किंवा कोणत्याहि आवडत्या देवतेचें,

सांगितलें असेल तसें मनानें ध्यान करावें. सद्गुरुभक्ति करणें असल्यास, गुरुजवळ असेल, तर प्रत्यक्ष शुद्धभावानें अवलोकन करून, प्रेमपुरस्सर पूजा करावी. आणि श्रीगुरु दूर असेल, तर जसें त्याचें स्वरूप असेल तसें ध्यान करून मानस पूजा करावी. तिचे प्रकार मागें सांगितलेच आहेत. हे साध्वी, या विवेचनावरून आपण कोण्या भक्तीचे अधिकारी आहों, आपणास कोणता प्रकार पाहिजे, असें प्रत्येक मनुष्यानें आपलें आपणच जाणून, भक्तीची उन्नति करूं लागलें ह्मणजे चित्तांतील विक्षेप दोष जाऊन स्थितप्रज्ञ झाल्यावर शीघ्र कल्याण होतें. हे ताई, कोण, कसा, कोणत्या मार्गाचा अधिकारी आहे, हें तूं आपल्यासुद्धां पहात जा. व त्याप्रमाणें पुढें चाल करीत जा व करवीत जा. हरिः ॐ तत्सत् इति अष्टमपत्रे द्वितीय भागः संपूर्णः॥

॥ अथ तृतीय भाग प्रारंभः ॥

ॐ अथातो ब्रह्मजिज्ञासा ( वेदांतशास्त्रः– अध्याय १ पाद १ अधिकरण सूत्र १ ) पूर्वभागीं सांगितलेल्या साधनानंतर, भगवदनुग्रहानें पुरुषाला ब्रह्मजिज्ञासा उत्पन्न होते. दत्तात्रय अवधूत गीतेंत असेंच ह्मणतात. मनुष्याला अद्वैतवासना, ईश्वरानुग्रहानेंच उत्पन्न होते. योगवासिष्ठांत भगवान् वसिष्ठ ह्मणतात, रामा, जोंपर्यंत साक्षात् परमेश्वरानुग्रह झाला नाहीं, तोपर्यंत सद्गुरु किंवा सच्छास्त्र यांतून कशाचीच प्राप्ति होत नाहीं. यावरून ईश्वरानुग्रहानेंच सद्गुरुप्राप्ति होते. हे सद्गुरु देवापेक्षांही श्रेष्ठ होत. कारण देवाला जसें भजावें तसें फळ तो देतो. आणि सद्गुरु प्रसन्न झाले कीं सत्यज्ञानानंतानंदाची पेटीच उघडून देतात. अशा कालांत उपासनेची गरज नसते. सर्व काय तें सद्गुरुच होऊन राहतात. सद्गुरुमुखानें सर्व ब्रह्म आहे, असें वाक्य श्रवण करून, मनांत ब्रह्म भावना धरून, त्यांनीं दिलेला ॐकारसंयुक्त मंत्र सोहं मध्यें मिळऊन, त्याचा अविरल जप करणें, त्यास निर्गुण उपासना ह्मणतात. मामीचा अधिकार इतका झालेला आहे. तिला उपदेशच करायचें बाकी राहिलें आहे. ताई, ही निर्गुण उपासना, परिपक्व झाली ह्मणजे, परोक्ष ज्ञान होतें. व तव्हांच

बुद्धीचें आवरण नष्ट होतें. मूळचा ब्रह्म असतांही, भ्रांतीनें मी देह आहें या अज्ञान वासनेनें कर्मे करून, जीव हा जन्ममरणावतरी होतो. यासच आवरण ह्मणतात. साऱ्या बंधनाचें मूळ हेंच. हें ज्ञानानें नष्ट होतें. मग थोडेंसें कर्म राहिलें तर, तें देहापुरतेंच असतें, पुढें जन्म देत नाहीं. आपल्या मनांत ज्या कल्पना येतात, त्या श्रीगुरुनाथार्पण कराव्या आणि आपल्या ज्ञानांत निमग्न असावें. मी देह आहें अशी बुद्धि सुटून मी ब्रह्म आहें अशी बुद्धि दृढ होईपर्यंत, अभ्यासच करावा. वत्से, तूं माझें तान्हें बाळ आहेस. ह्मणून मी वेदाचें सार, कर्म, भक्ति व ज्ञान हे तीन्ही मार्ग तुझ्या हातीं दिले. आतां भीति सोड. भीतीविषयीं मागें लिहिलेंच याहे. मला पुनर्जन्माची भीति नाहीं. त्यांत तुझ्यासारख्या निर्मल रत्नाच्या उदरीं जर माझा जन्म असला, तर मी खराच भाग्यवान. हे माते, तूं विचार करून पत्र पाठीव. तुझीं प्रेमामृतवचनें संजीवक वाटतात. जननि, मजकडून काय अपराध झाला ह्मणून त्वां उत्तर पाठविलें नाहीं. आतां तरी कृपाकरून पत्र पाठीव. चमत्काराच्या भरीस पडूं नको. मान मिळविण्यासाठींच चमत्कार आहेत. सर्वच जर ब्रह्म आहे तर अपमान कोणाला? व कशाचा? मग चमत्कार कशाला पाहिजे? कोणी चांगलें ह्मणतील, कोणी वाईट ह्मणतील, तर ह्मणोत बापडे. त्याचा हर्षही मानूं नये व खेदही मानूं नये. आपलें चित्त शुद्ध असलें ह्मणजे झालें. वत्से, मामीचा अधिकार पाहून त्यांच्या उन्नतीचा यत्न कर. हे माते, या पत्राचा विचार करून ब्रह्मानंदी हो. श्रीज्ञानेश्वर तुला तद्रूप करोत.

( ओंवी ) सद्गुरु ज्ञानेश्वरकृपाप्रसादें । आर्ष पत्र लिहिलें नुसधें । तें वाचूनि प्रेमानंदें । पत्रोत्तर पाठवी ॥ १ ॥ सर्वत्र यशस्वी सद्गुरू । समर्थ माउली ज्ञानेश्वरू । तो तुज प्रसन्न सर्वेश्वरू । असो साचारू सर्वदा ॥ २ ॥ तूंचि कन्या तूंचि माता । तूंचि बहीण तत्वतां । ह्मणूनि महावाक्यार्था । लिहूनियां पाठविलें ॥३॥ श्रवण केलेंचि करावें । ध्यान धरिलेंचि धरावें । येणें अभ्यासें स्वभावें । विकल्प जळती ॥४॥ ऐशी तूं जालिया स्वयें । मग देहशत्रू करितील काय । या लागीं आठवीं

पाय । ज्ञानेश्वर माउलीचे ॥ ५ ॥ हरिः ॐ तत्सत् इति श्रीज्ञानेश्वरकृपाप्रसादे, वेदांतसारे कर्मोपासनाज्ञानकांडपूर्वकमष्टमपत्रकं संपूर्णम् ॥

॥ श्री सद्गुरुज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

## ॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

### पत्र ९ वें

माता कन्या आणि बहिणी । व्यक्ति एकवटले तिन्ही । ऐशिया भागीरथी मनीं । आशीर्वादत्वें वंदन ॥ १ ॥ तूं लिहिलेंस पत्र । परमप्रेमबद्ध पवित्र । आणि ऐसेंही दिधलें उत्तर । कीं दुःख वाढूं न द्यावें ॥ २ ॥ तरी तुझ्या वचनें माय । मातें कधीं दुःख न होय । ह्मणूनि ऐसा लिहीत जाय । अनुभव आपुला ॥ ३ ॥ तूं बोललीस एक । कीं कर्म भोगूं नेदी सुख । हें वचन अरोचक । मूर्खत्वसूचक असे कीं ॥ ४ ॥ वस्तू चिद्घन अविकृत । कर्म अतिजड प्राकृत । अनुभवरोध करावया समर्थ । कर्म बापुडें नव्हे कीं ॥ ५ ॥ ह्मणूनि प्रारब्धवाद सांडावा । अंतरीं ब्रह्मप्रयत्न मांडावा । देहाहंकारभाव दंडावा । खंडावा क्रोधू ॥ ६ ॥ मनाविरुद्ध जे उठती शद्ब । तें लय विघ्न जाण प्रसिद्ध । तयाचा नाश करावया प्रबुद्ध । विवेकचि कीजे ॥ ७ ॥ श्रीरंगनाथ प्रसाद शक्ति । जिचें नाम महावाक्यसंवृत्ती । ते मी सांगेन तुजप्रती । विघ्नें नाशती सर्व तेणें ॥ ८ ॥ तो ग्रंथ बहुत थोर । संख्या साडेपांच सहस्र । ह्मणोनि मागें ठेविला साचार । सांगावयाचा ॥ ९ ॥ ताई, तूं कर्माची न धरावी भीती । मी सुत असतां तुजप्रती । पायांतळीं चारी मुक्ती । लोळतील तुझिया ॥ १० ॥

हे जननि, तूं मला तिसऱ्या अध्यायाचें उदाहरण दिलें, तो

अध्याय कर्मांचे अधिकाऱ्यासाठीं आहे, तुझ्या करितां नाहीं. तूं आपल्यासाठीं सर्वधर्मान् परित्यज्य हा अठराव्या अध्यायांतील ६६ वा श्लोक पहावा. ताई, धनाची आशा व खेचरी मुद्रेचें बंड अशानें साधुपण येत नाहीं. याची परीक्षा रा. रा. हरि गणपत केवले, रा. रा जगजीवनराव शिरपूरकर, रामराव मनोहर मुनशी वाशिमकर यांनीं व मी मिळून केली. परंतु कावळ्याच्या दृष्टीनें क्षतेंच दिसतात, त्याप्रमाणें माझ्या गाढवबुद्धीस भासलें तसें लिहिलें मुद्दे कांहीं क्षण, याविषयीं गोरक्षनाथांचें पद आहे.

वो नर कच्चा बे, कच्चा बे । नही गुरूका बच्चा ॥ धृ० ॥
गुप्त होकर प्रकट न जावे, गोकुल मथुरा काशी ॥
प्राण निकारे शीघ्र चढावे, सत्यलोकका बासी ॥ १ ॥
दुनिया त्यजकर खाक लगावे, जाकर बैठा बनमों ॥
खेचरिमुद्रा वज्रासनपर, ध्यान धरत है मनमों ॥ २ ॥
कुंडलिनीकूं खूब चढावे, ब्रह्मरंध्रमें जावे ॥
चलता है पानीके उप्पर, जो बोले सो होवे ॥ ३ ॥
पुराण में तो कछु ना पाया, झूटा ग्यान कमाया ॥
वेद विधीके मारग चलता, तनका लकडा किया ॥ ४ ॥
हुकुम गुरू गोरक्ष कहते, करनी करके रहना ॥
सद्गुरुकी कृपा भई तो, आप आपकू चीन्हा ॥ ५ ॥
वो नर सच्चा बे सच्चा बे, वही गुरूका बच्चा ॥

या पदावरून जो आपलें स्वरूप जाणेल तोच सत्य गुरुपुत्र. इतर साधन करणारे नव्हेत. हे ताई, पत्र वाचून उत्तर लवकर पाठीव. हरिः ॐ तत्सत् इति नवमपत्रं संपूर्णम् ॥

॥ श्रीज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥

## ॥ श्रीमत्सद्‌गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

### ॥ पत्र १० वें ॥

### ॥ मंगलाचरण. ॥

#### अभंग १.

वंदुनिया भावें गुरू रंगनाथ । वेदांत लिखित आरंभिलें ॥ १ ॥
कन्या मातृ दोन्ही मानुनियां भाव । वंदन सावेव आशीर्वादें ॥ २ ॥
साधन ते चारी करूनियां अंगीं । मग हो प्रसंगीं ब्रह्मनिष्ठा ॥ ३ ॥
ज्ञानेश्वर प्रभु कृपें तुजप्रति । अद्वैत प्रतीती सुखें येवो ॥ ४ ॥

#### अभंग २.

कोणतें साधन कैसा विनियोग । तोचि सांगोपांग ऐक आतां ॥ १ ॥
वेद, शास्त्रें आणि पुराणें सकळ । बोलती प्रबळ हेचि आधीं ॥ २ ॥
विवेक, विराग, शमादी षडंग । मोक्ष इच्छा चांग चवथें तें ॥ ३ ॥
उपक्रम ऐसा चारी साधनाचा । ज्ञानेश्वरें साचा सांगितला ॥ ४ ॥
यथाक्रमें ऐक तयांचीं लक्षणें । श्रुत्यादि पुराणें साक्ष देती ॥ ५ ॥
ऋग्वेदादि चारी उपनिषदां थोरी । होय अधिकारी साधक तो ॥६॥
जग मिथ्या सारें ब्रह्म सत्य एक । बोलती विवेक मुनी यातें ॥७॥
आधीं हा विवेक सुदृढाचि व्हावा । ज्ञानेश्वर सेवा करूनियां ॥ ८ ॥

#### अभंग ३.

सुत, धन दारा, मित्र, गोत, देह । भूलोकाचे गेह नाशिवंत ॥ १ ॥
इंद्र, चंद्र, सूर्य, ब्रह्मा, विष्णु, शिव। नाशिवंत ठाव सकळही ॥२॥
केलिया कर्माचें देती सिद्ध फळ । संपतां तत्काळ खालें पडे ॥ ३ ॥
ऐसें जाणुनी जो करूं इच्छी त्याग । नावडती भोग, किंचीत ही ॥४॥
पृथ्वी, स्वर्ग, सत्य, वैकुंठ, कैलास । याचा होतो नाश प्रलयांतीं ॥५॥
जितुकें गाठीं पुण्य तितुकें देती फळ । म्हणुनी सकळ त्यागयुक्त ॥ ६ ॥
ऐसें हें साधन झालिया संपूर्ण । वैराग्य निर्वाण मुनीमुखें ॥ ७ ॥
ज्ञानेश्वरप्रभुमतें ययालागीं । बोलिला सुरंगी ब्रह्मवेत्ता ॥ ८ ॥

## अभंग ४.

तिसरें साधन सहा प्रकाराचें । लक्षणानीं त्यांचें रूप करूं ॥ १ ॥
शम, दम आणि एकि उपरम । तितिक्षा, संभ्रम, श्रद्धा, तोष ॥२॥
ऐसी त्रयरूपें साधनाचीं अंगें । मुमुक्षुत्व लागे चतुर्थक ॥ ३ ॥
जन्म, मृत्यु, जरा यांतूनि उद्धार । ऐसी इच्छा फार जीवीं लाहे ॥४॥
तोचि पैं मुमुक्षा बोलताती मुनी । ज्ञानेश्वरवाणी ऐसीच कीं ॥ ५ ॥

## अभंग ५.

ऐसीं हीं साधनें झालियाहि चारी । होय अधिकारी मोक्षाचा तो ॥१॥
ऐसियानें गुरू पहावा श्रोत्रिय । ब्रह्मवेत्ता स्वयें महाराज ॥ २ ॥
तयातें पुसावें जोडूनियां कर । स्वामी हा संसार पार करा ॥ ३ ॥
सेवा आणि स्तुति करूनियां तपा । साधावी पैं कृपा त्यांची आधीं ॥४॥
ज्ञानेश्वर प्रभु सुखाचा सागर । सद्‌गुरु दातार तोचि आह्मां ॥ ५ ॥

## अभंग ६.

असो आतां माते सोडूनियां भय । धरीं दृढ पाय श्रीहरीचे ॥ १ ॥
महावाक्यबोध मानुनियां शुद्ध । इतर अशुद्ध कर्में त्यागी ॥ २ ॥
भागीरथी नामें देह दृढबुद्धी । सांडोनि त्रिशुद्धि पंचकोशा ॥ ३ ॥
तत्वमसि ऐसा उपदेशठेवा । पावूनि स्वजीवा ब्रह्म करीं ॥ ४ ॥
त्वंपद तो जीव तत्पद ईश्वर । दोघांचा विचार एकपणें ॥ ५ ॥
ज्ञानेश्वरप्रभुकृपें मार्ग सोपा । करूनि आरोपा वारीं कन्ये ॥ ६ ॥

## अभंग ७.

रज्जुचिया ठायीं सर्परूप दृष्टी । तैसी जाण सृष्टि भ्रांतिमय ॥ १ ॥
शिंपेवरी रुपें उगाचि आभास । मृगजळीं पाश तैशापरी ॥ २ ॥
वास्तविक ब्रह्म मिथ्या मायारोप । वारूनि स्वरूप शुद्ध पाहें ॥३॥
तूंचि देव भक्त होउनियां दोन्ही । महावाक्यवाणी अक्ततत्वें ॥ ४ ॥
ज्ञानें ब्रह्मरूप पाहीं तीन्ही लोक । सांडीं सर्व शोक महाभागे ॥५॥
जे जें दिसे सृष्टीं तें तें नारायण । बोध हा प्रमाण श्रुतिसिद्ध ॥६॥
सर्वांभूतीं प्रभु पाहीं ज्ञानेश्वर । आपण ईश्वर होउनीयां ॥ ७ ॥

## अभंग ८.

उठलिया जरी नानारूप वृत्ती । तरी दुःख देती ऐसें नाहीं ॥ १ ॥
आकाशीं पवन सागरीं तरंग । तैशा ब्रह्मरंग वृत्ति साऱ्या ॥ २ ॥
तुज वाटे वृत्ति सकळहि जाव्या । जडाचिये ठेव्या कां घेतेस ॥३॥
चेतनही वस्तु विश्वमय स्फूर्ती । तेचि नानावृत्तिरूप होय ॥ ४ ॥
ब्रह्मींचें तरंग तैसें जाण जग । जाणुनियां रंग आत्मरंगीं ॥ ५ ॥
कठीण ही गोष्टी पाहूं जातां वेध । सोपी तुज सैंघ होईल ते ॥ ६ ॥
मृत्तिकेचा घट तंतूमाजी पट । तैसें जग दृष्ट ब्रह्माधारीं ॥ ७ ॥
घटामाजी माती पटामाजी तंतू । तैसें जीवजंतु ब्रह्मरूप ॥ ८ ॥
ज्ञानेश्वरकृपें करूनि विचार । एथें चित्त स्थिर ठेवीं सदा ॥ ९ ॥

## अभंग ९.

वेदांचें रहस्य शास्त्रांचें माहेर । पुराणांचें सार हेंचि एक ॥ १ ॥
भक्तीचा शेवट योगाचें शिखर । ज्ञानाचा आधार हेंचि एक ॥ २ ॥
कर्माचें सत्यत्व देवाचा सिद्धांत । येथें होय अंत वासनेचा ॥ ३ ॥
जेथें जेथें मन जाऊनियां पाहे । तेथें तेथें आहे ज्ञानेश्वर ॥ ४ ॥

## अभंग १०.

पाण्याचा तरंग पाण्यांतचि उठे । पाण्यांतचि दाटे हरपे तेथें ॥ १ ॥
तरंगासी कांहीं पाण्यावीण नाहीं । किंबहुना तेंहि पाणीच कीं ॥२॥
तैशा तुझे ठायीं जाण सर्व वृत्ति । उठती पावती विलयातें ॥ ३ ॥
परी तूं निश्चळ जैशी तैशी राहे । साक्षी होऊनि पाहे नानावृत्ति ॥४॥
वाईट उत्तम प्रकृतीचा खेळ । जाणुनी निश्चळ शुद्ध होई ॥ ५ ॥
जे जे वृत्ति ते ते माझी न ह्मणावी । ब्रह्मस्थ करावी स्थिर बुद्धी ॥ ६ ॥
ऐसी ज्ञानेश्वरब्रह्मबोधमाळा । घालुनियां गळां सुखी होई ॥ ७ ॥

## अभंग ११.

जंव गृहकष्ट नाहीं तुझे उणे । तंव माझें येणें नव्हे तेथ ॥ १ ॥
जन्मोजन्मीं सुत होईन मी तुझा । ऐसा भाव माझा जाण कन्ये ॥२॥
ज्ञानेश्वरकृपें जीवन्मुक्ति ठेवा । पावोनि स्वभावा ब्रह्म करीं ॥ ३ ॥

( गद्य. )

हे जननि, जीवन्मुक्ताला पुनर्जन्म नाहीं, असें सर्व श्रुति सांगतात, आणि तुह्मी पुनर्जन्म इच्छितां हें कसें ? अशी तुला शंका येईल, ती इष्ट नाहीं, कारण भगवान् गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील तेराव्या श्लोकानें असेंच सांगतात.

" देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा । तथा देहांतरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १ ॥ "

अर्थः— ज्या प्रमाणें जीवाला देहाच्या ठिकाणीं, बालपण, तारुण्य व वृद्धपण प्राप्त झालें असतांही, जसा खेद होत नाहीं, त्या प्रमाणें धैर्यवान् जीवन्मुक्तही स्वेच्छेनें पुनर्जन्म झाला असतांनां देखील अविद्यावद्ध जीवाप्रमाणें मोह पावत नाहीं. हे साध्वी, या श्लोकांवरून सिद्ध होतें कीं जीवन्मुक्ताला पुनर्जन्माची भीति नाहीं, आणि तूं ह्मणशील कीं, भीति नाहीं तरी पण, जीवन्मुक्तानें जन्मबंधन कां अडकवून घ्यावें ? तर सांगतों ऐक. ब्रह्मसूत्रांत भगवान् वेदव्यास श्रीबादरायणाचार्य ह्मणतात कीं ' लोकवत्तु लीलाकैवल्यम् ' ( अध्याय २ पाद १ सूत्र ३३ ) ज्याप्रमाणें ईश्वराची कांहीं इच्छा नसतांही तो लीलेनेंच जगदुत्पत्ति करतो त्याप्रमाणेंच जीवन्मुक्ताची इच्छा नसतांही आपल्या लीलेनेंच पुनर्जन्म घेतो. हे ताई, व्यासवचनावरून सिद्ध आहे कीं जीवन्मुक्ताचा जन्म लीलामात्रच असतो. वस्तुतः मला तर सहजच असा प्रसंग प्राप्त झाला आहे. आईही जीवन्मुक्तच आणि पुत्रही जीवन्मुक्तच. अशा समयीं जन्माचें सुख किती ह्मणून वर्णावें. हे साध्वी, हें पत्र वाचून उत्तर लवकर पाठीव.

अभंग १.

वाचूनियां पत्र पाठवीं उत्तर । अक्षरें मधुर प्रेमबद्ध ॥ १ ॥
पहातसों बहु वचनप्रतीक्षा । माता सुतईक्षा तयापरी ॥ २ ॥
ज्ञानेश्वरप्रभुकृपा तुजवरी । राहो निरधारीं सर्वकाळ ॥ ३ ॥

ॐतत्सदिति हरिपदसुख । घेवोनियां लेख संपविला ॥ ४ ॥
हरिःॐ तत्सदिति दशमपत्रं संपूर्णम् ॥

॥ श्री सद्गुरुज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

॥ पत्र ११ वें ॥

ॐ नमो वो गुरुमाये । नित्य वंदितां तुझे पाये । अज्ञानतम निरसोनि जाये । उदय पावे कूटस्थ ॥ १ ॥ सखे तुझिया कृपानीरें । निगमवल्ली फळें भरें । तियेचा रस पाझरे । मुक्तहंसा ॥२॥ नाना शास्त्रांच्या उभारणीं । नाना योगाच्या कडसणी । करितां होऊनि अभिमानी । तुझिये स्थानीं न येती ॥ ३ ॥ माये तुझिये दृष्टीपुढें । उभें ठाकलें ब्रह्म रोकडें । मोक्ष तोहि पायां पडे । त्वद्दासाच्या ॥ ४ ॥ ऐसा महत्कृपेसी आदरू । संपूर्ण प्रेमासी सादरू । तेचि तूं श्रीज्ञानेश्वरू । मातृपितृत्वें ॥ ५ ॥ गोत्र पिता आणि आई । व्यक्ति प्रेमळा एके ठायीं । तरी मग न्यून तें कांहीं । सर्वथा न पडे ॥ ६ ॥ एवं वंदूनि सद्गुरुनाथ । पुढें आरंभिलें लिखित । बोबडी भाषा अनर्थ बहुत । ते अंगीकारीं जननिये ॥ ७ ॥ कन्या भागीरथी मनी । तुज प्रसन्न होवो चक्रपाणी । दिवसें दिवस प्रेमखाणी । अधिकाधिक दुणावो ॥ ८ ॥ दिवस झालेती बहुत । तरी त्वां धाडिलें नाहीं लिखित । तरी आमुचा अन्याय तिथ । कोणता दावीं ॥ ९ ॥ येथें योगानंदसरस्वती । खेचरी मुद्रा लोकां सांगती । शरीर अमर करावें ह्मणती । भूलोकीं विचरावें ॥ १० ॥ त्यानीं तुज करविलें दर्शन । मजहि तैसेंच दाविलें जाण । परी मी मंदमति अज्ञान । ह्मणोनि तें गुह्य कळेना ॥ ११ ॥ ब्रह्मा विष्णु परमेश्वर । जे संपूर्ण योग आचरणार । तयालागीं हीं साचार । मरण असे प्रलयांतीं ॥ १२ ॥ शरीर मळबद्ध अविद्यायुक्त । पंचभौ-

तिक मिथ्याभूत । त्यातें रक्षूनि पुरुषार्थ । काय साधिला सांग पां ॥ १३ ॥ आत्मा मुळींचाचि अमर । तो नव्हे मन ना शरीर । अखंड व्यापक निर्विकार । योगा थार नसे तेथें ॥ १४ ॥ जे अखंड व्यापक सर्वांभूतीं । असा अनुभव आलिया चित्तीं । मग योग साधुनी तटस्थ वृत्ति । वृक्षासारखी कासया ॥ १५ ॥ महाप्रलयीं ब्रह्मांड बुडे । तेथें योगी ते काय बापुडे । एक ब्रह्म तेंचि सत्य फुडे । येर विश्व मिथ्या ॥ १६ ॥ असो मी तो मंदमति अज्ञानी । स्वामी महायोगी ब्रह्मज्ञानी । तेथ माझी बोबडी वाणी । ऐकेल कोण ॥ १७ ॥ स्वामी मजला ऐसें ह्मणती । तूं करीं माझी संगती । मग मी सांगेन तुजप्रती । खेचरी मुद्रा ॥ १८ ॥ परी एक ऐकें ताई । तुझिया चरणाहूनि कांहीं । मज सर्वथा श्रेष्ठ नाहीं । आण लवलाहीं तुझीच ॥ १९ ॥ पुढिलिये पत्रामाझारी । लिहीन महावाक्य उजरी । परी आधीं पत्रोत्तरीं । आश्वासिजे ॥ २० ॥ मी तंव तुझें तान्हें बाळ । बोबडीं वचनें लिहिलीं सकळ । तीं अंगीकारुनी सोज्वळ । पत्रोत्तर पाठवीं कृपें ॥ २१ ॥ सच्चिदानंद श्रीगुरुदेव । जो भक्तभूषण ज्ञानदेव । त्यांचे चरणीं ठेवूनि भाव । स्वानुभव घेई माते ॥ २२ ॥ हरिः ॐ तत्सादिति एकादशपत्रं संपूर्णम् ॥

---

॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥






॥ श्रीमत्सद्गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

॥ श्री गुलाबरावमहाराजकृत. ॥

# ॥ श्रीमद्भगवद्गीतासंगति. ॥




नमः श्री करुणाघना। आळंदीपते कल्याणनिधाना। निर्विकारा निस्त्रिगुणा । भवेभ-भंजना भवहृदया॥ १ ॥ जयामलमतिगतिप्रचोदा । जयाविद्यवेद्यविभेदा । सुविद्यवेद्यसुप्रदा । सद्गुरूराया ॥२॥ जय हृत्सकलसमापदा। जय विमलकमलषट्पदा । जय सामान्यचैतन्यसत्पदा । स्वानंदसंपदा सम्मुने ॥ ३ ॥ जय कारुण्य-पवन-पाखरा । जयानाहतसंगीतसुधाकरा । जय कोमलोल्लसितसौकरा । श्रीज्ञानेश्वरा सुखाब्धे ॥ ४ ॥ जयांगक्ष्मासुकुंभिनी । जय प्रियप्रेमसंजीवनी । जय कर्माकर्मदहन-वन्ही । स्वानंद-दानी शीतपवना ॥ ५ ॥ जयानंत-ब्रह्माण्डगगना । जय सर्वज्ञसमभिज्ञमना । जयानंदसंदोहजीवना । सुखैक-घना ब्रह्मरूपा ॥ ६ ॥ ऐसिया प्रणमोनि विशेषा । सच्चिदानंद निःशेषा । धरूनि मधुरालापाभिलाषा । ऐकिजे स्तवना ॥ ७ ॥ उच्छिष्ट सेवूनि वडिलांचे । बाळ जेंवि निर्भर नाचे । तेंविंचि चाटूनि मी-येथिचें । घेतसो सुख ॥ ८ ॥ जे परंपरेची गोडी । निगमान्तरस लवडसवडी । भगवत्पादवाणी प्रौढी । परवडी जें ॥ ९ ॥ तदर्थ प्रयत्नें करून । उपलभ्य तेवढा सेवून । गूढार्थपुष्टिप्रदर्शन । सुखें होकां ॥ १० ॥ तिया पुष्टीचेनि बळें । गती करू अंतराळें । कामादि अरींचीं पांळेंमुळें । खणोनिया कीं ॥ ११ ॥ सकल अरींचें अधिष्टान । तो संसार हा एक जांण । आणि संसारासी कारण । अविद्या ती ॥ १२ ॥ तियेची सकार्यनिवृत्ति। जे विवेकिभूप इच्छिती । वेदान्त-शास्त्रीं प्रवृत्ति । याचिसाठीं ॥ १३ ॥ **पूर्वपक्षः**— अहो या जगीं सकळ । विषय

इच्छिती केवळ। विवेकि-भूप प्रबळ । कोणीचि नसे ॥ १४ ॥ ह्मणोनि गीतासंगती । येथें कवणाची नव्हे प्रवृत्ति । **सिद्धांतः**— परी या निष्फळ उक्ती । श्री गुरु-कृपें ॥ १५ ॥ जन इच्छिती सुख । हें निर्विवाद देख । परी न जाणोनि ब्रह्मसुख । आरोपिती विषयीं ॥ १६ ॥ वासनाबळें बाहेर मन । विषयाकार घे धावोन । तेथ इदमाकारें एकाग्र होवोन । स्वानंद प्रतिबिंबवी ॥ १७ ॥ एकाग्र होतांचि मन । आत्मानंदाचें होय भान । तोचि विषयावरी आरोपण । करून ग्रहण करी स्वयें ॥ १८ ॥ मन एकाग्र विषयावरी । तैं भोग्योपहित चिदानंद उजरी । होवोनि भोक्त्रानंद परी । एकत्र पावे ॥ १९ ॥ इदंताप्रत्ययीं एकाग्रवृत्ती । भोग्योपहित चित्सुखाप्रति । घे तेंवि अहंताप्रत्ययीं वृत्ती । भोक्त्रुपहित चित्सुखाप्रति घे ॥ २० ॥ सुख ह्मणोनि सुखा । धरी इदंतेसह अविवेका । सुखी ह्मणोनि अविवेका । अहंतेसह धरी ॥ २१ ॥ मग या सकळांचा अविवेक । करोनि विषयीं मानी सुख । ऐसेनि विषय इच्छी देख । अविवेकी जन ॥ २२ ॥ सुख आणि सुखी यौगुल्य एकीं । परी हें सुख मी सुखी । आणी या द्वंद्वा ॥ २३ ॥ सुखें सुखावे तोखे । आणि सुखित्वें तोखे पोखे । पूर्वस्थानीं ये अविवेके । उत्तरस्थानीं विवेके माजे ॥ २४ ॥ अयोग्य विवेक तें भेदज्ञान । सुख सुखित्वा वेगळेपण । विवेक तें ब्रह्मज्ञान । जेथ जड चिद्घन निवडती ॥ २५ ॥ ह्मणोनि योग्यविवेका । केलिया इच्छिणें घडे सुखा । सुखा आणि सचित्सुखा । भेदू न घडे ॥ २६ ॥ ऐसे अखंड सुख इच्छिती । परी न कळे ह्मणून विषय घेती। एवं मुमुक्षुतापत्ति । सकळ जनां ॥ २७ ॥ तथापि ऐसे जैं कळे। तैं उपजती मोक्ष डोहळे । चित्त सुखार्थ डहुळे । विषय ओंगळे चाळोनी ॥ २८ ॥ एवं अधिकारसंपत्ति । शीस मोट जिया व्यक्ती । ती मोक्षश्री-मंदिराआतौती । यावया पात्र ॥ २९ ॥ आतां प्रधानपेशिंदे । ह्मणती हें जाहले संबोधे । परी सुख इच्छिती हें विरोधे । आणलें केवीं ॥ ३० ॥ त्रिविध दुःखाचें निरसन । अपेक्षिती भूपजन। आणि सुखवृत्ती सत्वगुण । तेहि दुःख ह्मणोनि निरसावे ॥ ३१ ॥ तरी याही शङ्का । आतां आणी स्तब्धा । कीं विवेकवृत्ती प्रबोधा । अंश ऐसा ॥ ३२ ॥ प्रकृतित्यागें दुःखत्याग । हे अनात्मांश त्याज्यत्वें चांग । विवेकाचे प्रथमांशांग । ऐसा उमग पडे ॥ ३३ ॥ परी आत्मा-

कार जी वृत्ती । तैं होताचि समाधान स्थिती । हे विवेक द्वितीयांशाग प्रतीती । सुखत्वाची ॥ ३४ ॥ निदिध्यासनवरी जो योग्य विवेक । अहंब्रह्म झालिया तो मोक्ष सम्यक । एवं दुःखाभावप्राप्त सुख । श्रौत कैवल्य ॥ ३५ ॥ इतर दृष्टोपायादिकीं । कोणी नाहीं अत्यंत सुखी । ह्मणोनि वैद्यादि अविवेकी । व्युदसिले ॥ ३६ ॥ प्राप्त मोडिलें चौढाळ । अनिगम तोंडाळ पुंडाळ । मग निजयोग्य भांडाळ । निगमवेत्ते ॥ ३७ ॥ तिहीं निर्धारिलें साचें । श्रौत कैवल्य हे वाचें । प्रयोजन वेदान्ताचें । मुख्यत्वें आहे ॥ ३८ ॥ यमधिकृत्य प्रवर्तन । पुरुषाचें ते प्रयोजन । स्वयं इच्छाविषय ते मुख्य जाण । गौण अन्येच्छाधीनेच्छाविषय ॥ ३९ ॥ श्रवणीं योग्य विवेक उत्पन्न । मननीं तथा अंगधरण । निदिध्यासनीं होय तरुण । साक्षात्कारी मोक्षत्वें परिणमे ॥ ४० ॥ मग तया साक्षात्कारांतूनी । साक्षात्कारी निमित्तक वाणी । निघे ते अधिकारसंपन्न श्रवणीं । स्वफलदानी प्रवर्ते ॥ ४१ ॥ तोचि तया ग्रंथ । वैराग्य निस्कंथ पंथ । मिळवोनि संभ्रांत संथ । कराया उपयोगी ॥ ४२ ॥ श्रवण करोनि ग्रंथ रचणें । तेथ संगृहीत उसनी वचनें । ग्रंथ बहु न वाचतां वांचणें । तें एक बरें ॥ ४३ ॥ मनन करोनि ग्रंथरचना । तेथ बहुधा युक्ति सूचना । श्रवण झालियावरी मनना । उपयोगार्थ वाचिजे तो ॥ ४४ ॥ निदिध्यासकरचित ग्रंथ । परम प्रक्रियाभरित पंथ । कुतर्के करूनि जे जाहले संथ । तिहीं सेविजे तो ॥ ४५ ॥ परी निदिध्यासका । जो प्रक्रिया आवांका । तोचि साटोप निका । तिये ग्रंथीं ॥ ४६ ॥ ह्मणोनि कष्टें आत्मकळा । तेथूनि कळूं शके सकळा । कहीं कहीं विकळा । नाकळता होय ॥ ४७ ॥ ब्रह्मनिष्ठ-साक्षात्कृत । तद्रचित जे ग्रंथ । ते नानाप्रक्रियासमन्वित । शिष्यबोधार्थ प्रकटती ॥ ४८ ॥ जैसी ठिणगी पेटे तृणावर । विझोनि जाय पडतां नीर । तैसें श्रवणें ज्ञान उपजे साचार । परि मायाजळ लागतां मावळे ॥ ४९ ॥ मेघांत विद्युल्लता अग्नि जैसा । पाणी पडतांही न विझे अपैसा । परी क्षणें उत्पन्न, क्षणें नाशा । प्राप्त होय ॥ ५० ॥ तैसें मननज्ञान । क्षणैक युक्तिबळें समाधान । क्षणैक संसारें मावळे जाण । क्षणैक विपरीतपण कुतर्कें ॥ ५१ ॥ क्षणैक आंगीं वैराग्य चढे । क्षणैक व्यवहार चातुर्य उघडे । क्षणैक वाद गळां पडे । क्षण एक मोडे विषयवृत्ति ॥ ५२ ॥ क्षणैक बिहे संसारभया ।

क्षणैक तनुजतनुकामिनीदया । क्षणैक मनीं फाविजे लया । क्षणैक यामिनीलया पावे ॥ ५३ ॥ समुद्रांत वडवानळ । निजबळें भक्षी तुं-बळ जळ । न विझे परी सबळ । प्रकाशही देवों न शके ॥ ५४ ॥ तैसें निदिध्यासज्ञान । ब्रह्माकारवृत्तिसंपन्न । कदापि संसारमोहेंकरून । न मावळे ते ॥ ५५ ॥ ह्मणजे ब्रह्माकारवृत्ति । तियेसी विरुद्धवृत्ति मोडो न शकती । परी साक्षीची सहज स्थिती । वृत्तित्वासुळें प्रकटेना ॥ ५६ ॥ जैसा सहज प्रकाशे रवी । आणि न मावळे कदा केंवीं । तेंवि ब्रह्मसा-क्षात्कृत कवी । सहज झळके ॥ ५७ ॥ कदा न मावळे तत्ब्रह्मस्थिती । कदा न भोगी जन्ममृती । साक्षीची सहज स्थिती । जे तेचि कीं तो ॥ ५८ ॥ शद्बें ब्रह्मप्रत्यभिज्ञाश्रवण । युक्त्या ब्रह्मानुमान मनन । ब्रह्म-प्रत्यभिज्ञा चिंतन निदिध्यासन । पक ब्रह्मरूपभवन समाधी ॥ ५९ ॥ वा ब्रह्मापरोक्षकर महावाक्यश्रवण । असंभावनाद्वय निवर्तक मनन । विपरीत-भावना-नाशन निदिध्यासन । स्वानंदरूप-भवन साक्षात्कृती ॥ ६० ॥ अवांतर-वाक्याचें श्रवण । करी ब्रह्म-परोक्षज्ञान । तें ब्रह्म आहे ऐसें मन । श्रद्धा धरी ॥ ६१ ॥ मी ब्रह्म आहे ही अपरोक्ष वृत्ति । ज्ञाने करूनि दे महावाक्यश्रुती । तेथ समुल्लिखे चिद्व्याप्ति । सुविचार-बळें ॥ ६२ ॥ वेद ब्रह्मप्रतिपादक । किंवा कर्माचें बोधक । ही प्रमाण असंभावना देख । वेद साधक मननें गळे ॥ ६३ ॥ सत्य भेद कीं अभेद । ही प्रमेय असंभावना प्रसिद्ध । स्वमत-ग्रहण परमत-त्यागरूप शुद्ध । मनन करितां हारपे ॥ ६४ ॥ विप्रतिपत्तिजन्य संशय । विचारा वया उपयोगी होय । ह्मणोनी त्यागावया विपाय । आश्रयिजे मननीं ॥ ६५ ॥ मग त्याचा त्याग झालियावरी । असंभावनानिवृत्ति सारी । एवं तर्कें करूनि निर्धारी । निवटे भेद ॥ ६६ ॥ मननज्ञान दृढ होय जेव्हां । तर्कें संसार बाध्य कळे तेव्हां । तर्कें करोनि पुढती मग केव्हां । संसार सत्य न वाटे ॥ ६७ ॥ परी अनंत जन्माची श्रद्धा । ते आणी संसार-सत्यत्व-बोधा । निदिध्यासन करूनि बाधा । तेही पावे ॥ ६८ ॥ विपरीत भावना जे मानिजे । तीही निदिध्यासनें अपनीजे । साक्षात्कारें राहिजे । ब्रह्मचि होवूनी ॥ ६९ ॥ जेथ जग झालेंचि नाहीं । तेथ सा-क्षात्काराची नवाई । पावलिया मग कांहीं । उरेना प्राप्य ॥ ७० ॥ श्रद्धा आणि तर्कें करून । जगत् सत्य मानी मन । ब्रह्माचें अस्तित्वही

ग्रहण । न करी कधीं ॥ ७१ ॥ या नांव बद्धस्थिती । जेथ असे वि-
क्षेप आणि द्विविध आवृति । पूर्ण अविद्याप्रतीती । याचि नांव ॥७२॥
शास्त्र-विहित कर्म न करितां । ऐहिक भोगीं आसक्तता । ते वेळीं ही
पामरता । नांव पावे ॥ ७३ ॥ नाशवंत इहलोकस्थिती । ह्मणोनि
व्हावी स्वर्गप्राप्ती । तदर्थ करी काम्यकर्म रीती । ते ही बद्धस्थिती वि-
षयिता ह्मणिजे ॥ ७४ ॥ या लोकींचे आणि परलोकींचे । भोग दुःख-
मय जाणोनि साचे । कर्मकृती निष्कामतेचें । स्वरूप पावे ॥ ७५ ॥
तेणें निष्काम कर्में चित्तीं । सहज शुद्धता ये निरुती । तदा आली सा-
धक स्थिती । ह्मणावी कीं ॥ ७६ ॥ मग पुराणेतिहास-भगवच्चरित्रें ।
श्रवण-कीर्तनादिसाधनें विचित्रें । तैं भेटतां सुगुण सत्पात्रें । भगवत्स-
गुण चित्रें चित्तीं येती ॥ ७७ ॥ त्यांतूनि प्रिय आणि कोमळ । सुरेख
आणि विमळ । सुबाहू आणि सुनीळ । जे स्निग्ध सोज्वळ आलिंगनीं
॥ ७८ ॥ नयन कटाक्षी सुसाळ । जे चुंबनापेक्षी रसाळ । तारकत्वें
विशाळ । चैतन्यभरित ॥ ७९ ॥ ऐसें एक घेवोनि त्रिशुद्धी । प्रेमें ता-
रक ब्रह्मबुद्धी । उपासिजे तैं एकाग्रसिद्धी । सहज फावे ॥ ८० ॥ मग
अवांतरवाक्य श्रवण करितां । श्रद्धाजन्य ब्रह्मपरोक्षता । उपजे तैं अ-
सत्वापादक तत्वतां । आवृती नाशे ॥ ८१ ॥ उपासनेंत जे एकदेशी
सगुण । तेचि व्यापक वाटे, होतां परोक्षज्ञान । तैं ध्यानावरी मन ।
अधिक चढे ॥८२॥ जंव जंव ध्यानें व्यापकदृढता । तंव तंव भेद वाटे
वृथा । मग ये विवेकयोग्यता । बुद्धीसी स्वयें ॥ ८३ ॥ योग्यविवेकें
विषयप्रमा । सरोनि विवेकानुयोगी आत्मा । कळे तैं निःशेष भोगसं-
भ्रमा । सांडी चित्त ॥ ८४ ॥ या नांव विवेकानुसार विरक्ति । हीस
बाणूं न दे विषयाभ्यासवृत्ति । तैं मग निग्रहसंपत्ति । प्राप्त क-
रणें ॥ ८५ ॥ तदंश मनोनिग्रह तो शम । इंद्रिय-निग्रह तो दम ।
विषय मन नेघे हा उपरम । तितिक्षा संभ्रम सहिष्णुता ॥ ८६ ॥ सा-
धतां साधन संपत्ती । नाना सुखदुःख येती । ते साहविल्या न जाती ।
तितिक्षेंवीण ॥ ८७ ॥ चोर हरोनि नेती धन । तैं साहावे लागे दरि-
द्रपण । उदार होऊनि करितां दान । मिळे मान तैं उदासीन राहणें
॥ ८८ ॥ चूर्णिकाः— निंदा अत्यंत करिती पिशुन । तैं अपमान दुःख
सहावे लागे जाण । साधू ह्मणोनि देती मान । तें सुख साहून उदासी-

न रहावे ॥ ८९ ॥ भिक्षा न मिळे वेळेवरी । सहणें लागे क्षुधा भारी । सहणें लागे वनान्तरीं । तृषाही कदा ॥ ९० ॥ न मिळे रहावया घर । या लागीं शीतोष्ण जलधार । घेणें लागे शिरावर । साहोनिया ॥ ९१ ॥ न पाहुनि जीवन मरण । देहाचें नांव ठेवूनि पाषाण । धैर्ययुक्त राहे मन । या नांव तितिक्षा ॥ ९२ ॥ एवं सुख दुःख करितां सहन । संसारीं न धांवे मन । तंव पूर्वील विवेकदाढर्येंकरून । श्रुतिगुरुवचन श्रद्धा घे ॥ ९३ ॥ मग फळ जरी न मिळे कांहीं । श्रद्धाबळें अभ्यासे तरी ही । समाधान तें पाही । याचि नांव ॥ ९४ ॥ इतरेच्छांची झाली निवृत्ति । ह्मणोनि ब्रह्मसुखेच्छा बळावली चित्तीं । जे सामान्य होऊनि राहिली होती । इतरेच्छातळीं ॥ ९५ ॥ ती विशेष तीव्र आतां जाहली । ह्मणोनि ह्मणावी मुमुक्षा लाधली । ही कोण्याही वर्णा फावली । यत्नें वा दैवें ॥ ९६ ॥ तैं मग्नचेतन कनवाळू । भववनवाजीवन नवाळू । तो भेटे सद्गुरू अळुमाळू । पाजोनि वाक् रसाळू आश्वासी ॥ ९७ ॥ ते अभयदानें उठाउठी । न सांवरतां उल्हास उठी । तैं मन घे श्रवण संपुटीं । महावाक्यामृत ॥ ९८ ॥ तिये महावाक्यश्रवणें । अपरोक्ष ज्ञान हातां येणें । तैं द्विविध जे जगत्सत्य वाटणें । त्यांतील श्रद्धांश जाय ॥ ९९ ॥ मननें करून पाहतां । यौक्तिक जगद्बाध होय तत्वतां । परी दृश्याभ्यासश्रद्धा । जगत्सत्ता भासवी पुन्हा ॥ १०० ॥ ही विपरीत भावना निदिध्यासें । नाशिलीच होय सहज नाशे । मग वृत्तिपकता समाधिदशे । सहजचि ये ॥ १०१ ॥ करें तरुशाखा लववून धरणें । तेंवि निदिध्यासीं ब्रह्माकारवृत्ति करणें । शाखा सहज लीन राहणें । तैसी वृत्ती लीन सहज ते समाधी ॥ २ ॥ व्यतिरेकसमाधी जोंवरी । तींत ताटस्थ्य राहे तोंवरी । अन्वय होतां निर्धारी । व्युत्थानींही समाधीचि ॥ ३ ॥ ते वेळीं जे निगे वाणी । ते वेदसम ग्रंथखाणी । शिष्यबोधार्थ मंदाकिनी । प्रगटली राहे ॥ ४ ॥ श्रवण करूनि रची जो ग्रंथ । तयाचें कार्य जिव्हेनें होत । मनन करूनि रची जो ग्रंथ । तयाचें कार्य होत अंतःकरणें ॥५॥ निदिध्यासन करितां ग्रंथ । रची तैं देवता स्फूर्ती देत । आणि जो कां ब्रह्मसाक्षात्कृत । समाधिस्थ मुनी ॥ ६ ॥ तो ब्रह्मनिष्ट श्रोत्रिय साचारी । तयाची जे प्रकटे वैखरी । ते ब्रह्मतनयाचि ग्रंथाकारी । निगमप्रणवरूपिणी ॥ ७ ॥ इंद्रियज्ञान जयांसी । दृढ देहाभिमान त-

यासी । खानपान जलान्नाशीं । पशुसमान जडतसे ॥ ८ ॥ जयासी अं-
तःकरणज्ञान । तयासी कांहींसे विचारीपण । सत्य स्वधर्म कर्माधीन ।
राहत सदा ॥ ९ ॥ शारीरिक स्वधर्म कर्म । उपासना मानस कर्म । ऐ-
से दोन्हीही शुभकर्म । करितां होय ॥ ११० ॥ परी उपासना प्रधान ।
भगवद्भक्ती संपूर्ण । आवडे अंतःकरण ज्ञान । जया राहे ॥ ११ ॥ आ-
त्म्याचें ज्ञान जयासी । जो सदा व्यतिरेकवासी । वेदान्तसिद्धान्त त-
यांसी । कळला ह्मणावा ॥ १२ ॥ परमात्मैक्य अपरोक्षानुभव । तोचि
ज्ञानी स्वयमेव । भ्रमरहित ब्रह्मभाव । पावला ह्मणिजे ॥ १३ ॥

**चूर्णिकाः—** श्रवण करूनि रचित ग्रंथ । तेथ शब्दज्ञान होत । मननें क-
रूनि रचित ग्रंथ । तेथ अनुमानें कळती सिद्धांत आणि पूर्वपक्षच्छेदक
बहुत युक्ती असती ॥ १४ ॥ निदिध्यासकरचित ग्रंथ । तेथ प्रक्रिया-
सहित असती सिद्धांत । परी निदिध्यासक जी प्रक्रिया करित । तीचि
प्रधान राहे ॥ १५ ॥ ब्रह्मसंपन्नरचित ग्रंथ । तेथ अवर्णनीय अनुभूत
सिद्धांत । नाना-प्रक्रियासंभरित । सर्व कांहीं मिळत निःसंशय ॥१६॥
प्रथम ग्रंथांत शब्द प्रमाण । परी युक्ती न दिसती जाण । द्वितीय ग्रंथांत
शब्दप्रमाण । आणि युक्ती ॥ १७ ॥ तृतीयग्रंथांमाजीं निश्चिती । शब्द प्र-
माण आणि युक्ती । प्रक्रियासहित अनुभूती । तीही सांपडे ॥ १८ ॥
चतुर्थ ग्रंथामाझारी । न्यूनता नाहीं कवणेपरी । श्रुती युक्ती अनुभव नि-
र्धारी । प्रक्रिया ही परी बहुत असती ॥ १९ ॥ यास्तव साक्षात्कृतर-
चित ग्रंथ । टीका अथवा मूळ परी ते समस्त । ब्रह्मबोध करावया स-
मर्थ । अधिकारियाप्रत सहज होती ॥१२०॥ ब्रह्मवेत्ता ब्रह्मरूप आहे ।
तयाची वाणी वेद होय । मग अखंड ब्रह्म जें लवलाहे । श्रीकृष्णमूर्ती
॥ २१ ॥ आत्माराम जरी होती । तरी रक्षावया जीवन्मुक्ती । सुखाची
होवावी प्रारब्ध स्थिती । ह्मणूनि ज्या भजती अकृत्रिम ॥ २२ ॥ तो
ज्ञानीभक्त, भज्यगोविंद । जो बोलिला श्रौत अनुष्टुप्छंद । तीं गीता
माउली जनासी दुग्ध । सर्वदा पाजी ॥ २३ ॥ ह्मणूनि तद्दुग्धपुष्टी ।
संगतीरूपें गोमटी । श्रुत्यर्थपरिपाटी । विस्तरिली ॥ २४ ॥ प्रत्यक्ष
बोलिली देवें । ह्मणूनि श्रीगुरु ज्ञानदेवे । गीता ही श्रुती स्वभावें । बोलि-
ले आहे ॥ २५ ॥ आणि भगवत्पाद भाष्यार्थ । तैसा मधुसूदनकृत
उपोद्घात । आणि जे बोलिले ज्ञानेश्वरतात । एतदाश्रवूनी गीतासंगतिग्रंथ

रचित हा ॥ २६ ॥ कीं रसना शद्ब उच्चारिजे । तेणें अर्थही रसनाचि जाणिजे । तैसा गीतावचनें ओळखिजे । गीताश्रय कृष्ण ॥ २७ ॥ न्याय परमाणू नित्य ह्मणती । वैशेषिक काल नित्य साधिती । मीमांसक कर्म नित्य ह्मणती । सांख्य साधिती प्रकृतिनित्यता ॥ २८ ॥ ऐसी चिद्भिन्न जडासी । जे नित्यता निश्चयेसी । ते जयाची सत्ता विशेषी । बोलिली आहे ॥ २९ ॥ जीवासी चेतनपण । तें जयाचें चेतन । जो परमानंदघन । राधिकाप्रिय ॥ १३० ॥ असो ही ऐसी त्रिविधता । जडासी जडपणता । चेतनावीण तत्वतां । कळों न शके ॥ ३१ ॥ आणि सत्ता चेतनासी । तीचि आहे जडासी । तें चित् सोडोनि निश्चयेसी । जाईल केवीं ॥ ३२ ॥ जग दृश्य, विभू आणि परिच्छिन्न । परि निर्धाराचें व्यापकपण । निर्धारावांचूनी जडपण । घेतां नये कीं ॥ ३३ ॥ अनिर्धारित अज्ञातसत्ता । जडाची मानिलिया तत्वतां । तरी अज्ञातत्व ग्रहणीं जडता । वा चेतनता आहे ?॥ ३४ ॥ अज्ञातत्व ह्मणिजे जड । तरी ते ज्ञातसत्ताचि सुगड । निर्धारावांचूनी उघड । न दिसे कांहीं ॥ ३५ ॥ पूर्व आहे ह्मणूनि कळलें । हें बोलणेंचि व्यर्थ गेले । कळलें ह्मणोनि पूर्वत्वा आलें । तें पूर्वत्व झालें ज्ञातसत्ता ॥ ३६ ॥ पूर्वत्व कळलें मात्र । तरी कळलियावीण स्वतंत्र । सांगतां ये काय अतंत्र । पूर्वत्व तें ॥ ३७ ॥ न सांगोनि भासे । तरी काय अनिर्वचनीय असे । मनासि जरी भासे । तरी तें न पूर्वत्व ॥ ३८ ॥ मनासी कळे तरी पूर्वी आहे । तरी कळतें मन काय पूर्वी नोहे । आहे ह्मणाल तरी तेव्हांही आहे । निर्धार असणें ॥ ३९ ॥ दोन ह्मणतां जरी । ज्ञेयासी व्याप्यता तरी । व्यापकता निर्धारी । ज्ञानासी कीं ॥ १४० ॥ अग्रसंयोग ह्मणतां । तरी अग्राकारवृत्ति होआवी तत्वतां । सर्व घटाकारवृत्ति सर्वथा । होवूंचि नये ॥४१॥ ह्मणवूनि पूर्वत्व देशे काळे । किंवा वस्तुत्वें वस्तुपाळे । जडत्व हें प्रबळें । चेतनें नेलें ॥ ४२ ॥ जडाचिया पाठींपोटीं । निर्धारकांस गोमटी । निर्धाराच्या पाठींपोटीं । चित्परिपाटी स्वतंत्र ॥ ४३ ॥ उक्तनिर्धारता वेगळी करूनी । जड दावावे कोठें कोणी । आत्माचित्ता वेगळी करूनी । निर्धारू दावावा ॥ ४४ ॥ स्थूलदृष्टि-परंपरा । येरव्हीं चेतन विश्वपसारा । चेतन भिन्नपणें निर्धारा जडत्वाचि ॥ ४५ ॥ ह्मणोनि वृत्त्युपहित चेतन । तेंचि विषयोपहित जाण । तें चै-

तन्य वेगळेंकरून । दाखवावें जड ! ॥ ४६ ॥ एवं अन्वयव्यतिरेकें । जड नाहीं ऐसें देखे । आतां चेतनचि निःशेखे । उतरलें दिठी ॥ ४७ ॥ आणि अज्ञानांतुनी ज्ञान । विरोधें नोहे उत्पन्न । अभावा पासुनी भावपण । कदा नोहे ॥ ४८ ॥ केवल प्रागभावापासाव । उत्पन्न नाहीं घटभाव । मृत्तिकाभावतेपासाव । घटभाव आहे ॥ ४९ ॥ अभावापासूनि उत्पन्न । तरी अभाव सर्वत्र सुलभ जाण । तरी सर्वत्र सर्वोत्पन्न । सुखें व्हावें ॥ १५० ॥ पूर्वी कांहीं येत कल्पना । ते कल्पना तरी आहे ह्मणा । अभावापासूनि भावोत्पन्ना । कांहीं न चाले ॥ ५१ ॥ ह्मणवूनि अज्ञानांतुनी ज्ञान । कदापि नोहे उत्पन्न । पूर्वी घेतां तरी चेतन । घेयावे कीं ॥ ५२ ॥ विरोधींत विरोधी लीन । ऐस नाहींच देखण । ह्मणवूनि ह्मणावें चेतन । यासीचि कीं ॥ ५३ ॥ यासी जडचि ह्मणतो आतां । तरी वादासि नाम मात्रता । काहींच बुद्धिमत्ता । नलगे येथ ॥ ५४ ॥ असो ऐसे जरी काहीं । तरी सुखता चेतनाविण नाहीं । आणि जगीं तंव सुख नाहीं । ह्मणूनि प्रवृत्ति इकडे ॥ ५५ ॥ वृत्तिस्थ सुख पूर्वी वळिलें । ह्मणूनि वृत्याश्रय सुख पाहिजे वहिले । तें अनुभवा नाहीं आलें । चेतनाविण ॥ ५६ ॥ तें नाहीं ह्मणतां दुःख न सुटे । दुःखनिवृत्ति इच्छाही प्रकटे । शशशृंगादि इच्छा कोणा न घटे । ह्मणोनि आहे चित्सौख्य ॥ ५७ ॥ हें चित्सौख्य परम निधान । तेंचि शुद्धवृत्तित्वें श्रीकृष्णपण । अशुद्धवृत्तित्वें जगपण । जाहलें कीं ॥ ५८ ॥ नाहींच अज्ञातसत्ता । मग वृत्तीची जी अव्यक्तता । ती कारण तत्वतां । स्थायी अविद्या ॥ ५९ ॥ परी ती अनादि ज्ञानें नाशे । ह्मणवोनि सकार्याविद्यानिवृत्ती असे । प्रयोजन ऐसें गीताशास्त्राचें ॥ १६० ॥ अविद्याकाळीं अविद्या न सांपडे । आणि निवृत्ति झालिया न घडे । या लागीं अनादि सुरवाडे । ज्ञाननाश्य हे ॥ ६१ ॥ ज्ञानकाळ जो भासे । तो बाधितवृत्तीमुळें दिसे । बाधितानुवृत्या जगचि भासे । विदेहकैवल्यवरी ॥ ६२ ॥ हें प्रश्नासि मात्र उत्तर । येरव्हीं जीवन्मुक्ती आणि विदेहमुक्ती सार । दोन्ही ही साचार । ब्रह्मचि एक ॥ ६३ ॥ असो जैसा होय तैसा । बोधूचि घ्यावा आपैसा । बोधक बोध्य खाऊनी ठसा । बोधाचाचि ॥ ६४ ॥ एवं वस्तूसि जाणू जातां । जाणणेंचि वस्तू तत्वता । ह्मणोनि प्रमाणादि वृथा । या तातासिद्धांतां आश्रयिलें ॥ ६५ ॥ तोचि

सिद्धांत कळावया । अविद्या तोंवरी उपाया । ईश्वरवाणी सांगे तया । बोलिजे वेद ॥ ६६ ॥ ईश्वरवाणी निर्भ्रमज्ञान । आणि तेणें नाशे अज्ञान । ब्रह्मही संपूर्ण । अपरोक्ष कळे ॥ ६७ ॥ ऐसी सांगे आप्तपरंपरा । आणि विद्युत्वत् प्रकाश आपणासही होय खरा । वैराग्य नाहीं ह्मणूनि थारा । ब्रह्माचा न होय ॥ ६८ ॥ वैराग्यावांचूनि कहीं । ज्ञानासि तगणेंचि नाहीं । येणेंचि अभिप्रायें आई । बोलिली हे ॥ ६९ ॥ ह्मणवूनि वेद-प्रमाण । तयाचेंचि श्रवण । दृढ व्हावया मनन । उपपत्ती कीजे ॥ १७० ॥ मनन झालिया ध्याइजे । मग साक्षात्कारें कृतकार्य होइजे । श्रवण मनन ध्यान हें जाणिजे । दर्शनहेतुत्रय ॥ ७१ ॥ फळ झाडा-वरील पाहिल्याविण । यत्नें आणितां न ये तोडोन । तेविं परोक्ष आत्म-याचें करूनि दर्शन । श्रवणादि यत्नें अपरोक्ष कीजे ॥ ७२ ॥ विद्युत्वत्ता सूर्यवत्ता । येणें रीती पाहतां । अपरोक्षांश परोक्षता । परोक्षपूर्णता अप-रोक्ष ॥ ७३ ॥ श्रद्धेमुळें परोक्षत्व आलें । तें तदाश्रयें जरी घेतलें । तरी अपरोक्षचि वहिले । परोक्ष नाहीं ॥ ७४ ॥ विद्युत्वत् सूर्यवत्वें । दोहों रूपें अपरोक्षत्वें । भासे परी परोक्षत्वें । स्थिरतार्थ घेइजे ॥ ७५ ॥ थोडे दिसे ह्मणूनि आहे । ऐसें मेघीं विद्युत्चें असणें राहे । विद्युत् न दिसे तरी आहे । ज्ञान हें स्थिर ॥ ७६ ॥ तेंवि संध्यादि स्थानीं । भासे विजेवानी । तेंचि नासले ऐसें कल्पनी । येईल ह्मणी ॥ ७७ ॥ ह्मणू-नि श्रुती सांगे ते असे । कल्पनेमुळें न भासे । भासलें होते जे आपैसें । तें जाईल कोठें ॥७८॥ विद्युत्वत् जें भासलें । पुन्हा वृत्तीखालतें लो-पलें । तरी आहेपण जाये रक्षिलें । श्रद्धेनें जिया ॥ ७९ ॥ हें श्रद्धाज-न्य ज्ञान । तयाची सत्ता तरी स्थिर व्हावी ह्मणून । निकें परोक्षज्ञान । स्थापी श्रुती ॥ १८० ॥ मग तें महावाक्यें अपरोक्ष होय । तेंचि मन-नीं उपपाद्य आहे । भेद वारूनी लवलाहें । अभेद साधणें ॥ ८१ ॥ अभेद साधावया आधीं । कीजेल भेदमिथ्यासिद्धी । वाद जल्प वितंड प्रसिद्धी । घेवूनिया ॥ ८२ ॥ वाद जल्प वितंड यांतून । कोणीही एक कथा घेवून । भेद मिथ्या उपपादन । करावें कीं ॥ ८३ ॥ निश्चय असतो पक्षतेचा । ह्मणोनि अनुमित्यनुपयोग संशयाचा । तरी त्यागा-वयासाठीं तयाचा । उपयोगू आहे ॥ ८४ ॥ पूर्ववत् मिथ्या साधितां भेद । तो अभेद सत्तेनेंचि सिद्ध । ह्मणोनि एक अभेद । तोचि सत्य

॥ ८५ ॥ येणें मिथ्यामिथ्यात्व । तरी मग एकाचि सत्व । जें अभेद-
तत्व । श्रीकृष्णरूप ॥ ८६ ॥ मनन झालिया ऐसें । जें फावे निदि-
ध्यासें । साक्षात्कारदशे । पावे जे ॥ ८७ ॥ तें पावावया पूर्ण । प्रा-
प्तीची प्राप्ती करणियाकारण । कंठचामीकरवत् निरूपण । करी हा वेदू
॥ ८८ ॥ पूर्वी बोलिलें अनुमान जें । तेंही वेदानुकूलचि पाहिजे । अ-
न्यथा न लाहिजे । कल्पांतीही ॥ ८९ ॥ परी तें वेद त्रिवर्णी । राहती
न सर्वस्थानीं । यास्तव स्वामी कळवळूनी । बोलिलें पुन्हा ॥ १९० ॥
जें सर्ववर्णी सुहित । कोणत्याही आश्रमी होत । युद्धनिरूपण मिषें
निश्चित । हेंचि दाविलें ॥ ९१ ॥ अर्जुन क्षत्रिय गृहस्थ । संन्यासाधि-
कारविवर्जित । गोत्रहत्या करावया स्थित । जाहला वरी ॥ ९२ ॥ पु-
न्हा मोहें कवळिला । परी देव सखा केला । यास्तव उपदेशिला । वे-
दांत हरीनें ॥ ९३ ॥ एवं सखा असतां श्रीपती । कोणा कैशाही परि-
स्थिती । साधन सहित परमात्मप्राप्ती । निश्चयें फावे ॥९४॥ ऐसी बो-
धक एक गीता । अष्टादशाध्यायघटिता । हरिवाणीत्वात् वेदरूपता ।
कांडत्रयता यास्तव ॥ ९५ ॥ कोण्याही एकदेशी होतां रज्जुज्ञान । तरी
सर्वदेशीय सर्प निवृत्त जाण । तेंवि कोण्याही कांडीं ब्रह्मज्ञान । होवो सु-
खें ॥ ९६ ॥ निष्काम कर्म करावें । तेणें समजे यावे । ह्मणजे 'त्वंपद'
फावे । सहजाचि ॥ ९७ ॥ देहासी सुखदु:खता । मी देहा-वेगळा त-
त्वतां । हें त्वंपद विवेकयोग्यता । समत्व अंगीं येतां मिळे ॥ ९८ ॥
उपासना करितां जाण । निज उपास्य व्यापक पूर्ण । येणें तत्पद विवेक आ-
पण । सहज होय ॥ ९९ ॥ कर्म उपासना करितां । यावी ऐसी विवे-
कयोग्यता । ह्मणजे तत्त्वंपद ऐक्यता । ज्ञानकांडीं सहजचि ॥ २०० ॥
ही नूतन प्रक्रिया । प्रभूनें प्रकट केली कृपया । जन आश्रयें ईचिया ।
तरेल सकळ ॥ १ ॥ ती प्रक्रियाचि गीता । आद्यषडध्यायी तत्वतां ।
त्वंपद विवेकसहिता । कर्म्मकांडात्मिका ॥ २ ॥ आणि द्वितीय षड-
ध्यायी । तत्पद विवेक सह पाही । उपासनाकांडात्मिका तीही । देवता-
कांड ही संज्ञा ईची ॥ ३ ॥ तृतीय षडध्यायी ज्ञानकांड । ऐसें हें जग-
त्कल्याण तुंड । गतिशास्त्र प्रचंड । उभे आहे ॥ ४ ॥ उपासना ज्ञान
दोन्ही । उपनिषदीं एकपणीं । गीतेंत कांड तीन्ही । एकत्वा आले ॥५॥
अथवा सहाव्यावरी कर्मकांड । बाराव्यावरी देवताकांड । पंधराव्या

पर्यंत ज्ञानकांड । पुढें उपसंहार अध्यायत्रय ॥ ६ ॥ हें ज्ञानेश्वर प्रभूचें सामान्यमत । आणि त्यांचेचि विशेष मत । ऐसें कीं जे गीता सातशत । ते अध्यायांत नवविया एका ॥ ७ ॥ सहावा गीतावल्लीचें ठाण । अठरावा एकाध्यायी गीता जाण । गीतेंत सर्वत्र प्रतिपादन । तेंचि तें ब्रह्म ॥८॥ या विशेष मतांहून । निष्कर्ष काढितां जाण । तरी सर्वाध्यायीं सर्व संपूर्ण । गीता ही असे ॥९॥ ' परी हर ह्मणे नेणिजे । देवी जैसें कां रूप तुझें । तैसे नित्य नूतन जाणिजे । गीतातत्व ' ॥ २१० ॥ येणेंही बोले । स्वामीनींच प्रकट केलें । जे कीं सर्वां सर्वत्र भरलें । गीतातत्व हें ॥ ११ ॥ गीताचि एक माता । काव्याची सद्गुरुगीता । हेही बोलणें ताता— । मुखेंहूनिचे ॥ १२ ॥ आणीक तातचरण । जे बोलिले तेचि प्रमाण । यत्सेवा परमार्थां जन्मस्थान । ह्मणवूनि कीरू ॥ १३ ॥ आणि तद्विरुद्ध नाहीं । यास्तव प्रमाण दुसरे ही । येथ मधुसूदनस्वामी कांहीं । बोलिले बरवे ॥ १४ ॥ कर्म आणि ज्ञान । यांचा समुच्चय नाहीं ह्मणून । भगवंते उपासन । घातलें मध्य ॥ १५ ॥ कुशल आणि धनवंत । मी द्विज ऐसा बुद्धिमंत । विद्वान कर्तृतारोपभारित । अधिकारी कर्मा ॥ १६ ॥ सर्व त्यागी सन्यासी । विरक्त अधिकारी ज्ञानासी । यास्तव समुच्चय दोहींसी । सर्वथा नाहीं ॥ १७ ॥ अग्नि आणि शीतल जीवन । दोहोंच्या युगपत्पानें करून । तृषाशांति निष्पन्न । नाहीं जेंवि ॥ १८ ॥ तेंवि कर्मी आत्मयासी कर्तेपण । आत्मा अकर्ता या नांव ज्ञान । अतः समुच्चय जाण । न घडे कदा ॥ १९ ॥ काम्यकर्माचा न्यास । या नांव पैं सन्यास । आणि सन्यासी अधिकारी ज्ञानास । सिद्धचि आहे ॥ २२० ॥ काम्यकर्म ज्ञानाचा । समुच्चय नसो साचा । परी निष्काम कर्म आणि ज्ञानाचा । समुच्चयो आहे । ॥ २१ ॥ तरी तैसेंही नाहीं । फलत्यागें करूनि लवलाहीं । कर्तृताबुद्धि पाही ! त्यागविली ॥ २२ ॥ आणि विविदिषा-सन्यासासाठीं । निष्काम कर्मांची आटाआटी । सिद्ध तंव अनाग्रहें शेवटीं । करिती कर्मे ॥ २३ ॥ किंवा लोकसंग्रहार्थ करण । ते ही न होय आपणा साधन । आणि निष्काम कर्मही भगवदर्पण । बोलिले देवें ॥ २४ ॥ भगवदर्पण जहीं जाहलें । तेव्हांचि कर्मपण गेलें । भगवद्रूप चैतन्य वाहिलें । या लागीं उरलें ज्ञान ॥ २५ ॥ भेदपणें उपास्य नाहीं । यालागीं उपासना ज्ञानाही । समुच्चय भाव कांहीं । न

दिसे कीरू ॥ २६ ॥ ज्ञानी भक्ताची भक्ती । ते तंव अखंड सकळाप्रती । अपेक्षित परी एकचि समुच्चिती । ह्मणूनि नाहीं ॥ २७ ॥ तथापि जिज्ञासु दृष्टी । कदाचित् ज्ञान कर्म एकवटी । यास्तव उपासना पोटीं । घातली दोहींच्या ॥ २८ ॥ आणि ही भगवद्भक्ती । मध्य सांगावयाप्रती । दुसरे ही निश्चिती । कारण एक ॥ २९ ॥ नित्यासही पितृलोकीं फळ । ऐसी श्रुती सांगे केवळ । हें एक कर्ममार्गी प्रबळ । विघ्न आहे ॥२३०॥ ज्ञानाचा अभिमान । हें एक ज्ञानमार्गी विघ्न । या दोहोंस निवर्तक भक्ती ह्मणोन । घातली मध्यें ॥ ३१ ॥ कर्म करितां कृष्णार्पण । तत्काल निवटे प्रथम विघ्न । गुरुभक्तिनें फेडितां वाचाक्रण । ज्ञानाभिमान विघ्न तुटे ॥ ३२ ॥ **यथा देवे तथा गुरौ** या श्रुती । समान श्रीगुरु परमात्मभक्ती । यास्तव मध्यास्थिती । बोलिली देवें ॥ ३३ ॥ अथवा भगवद्भक्तांचें मतीं । एवंविध गीतासंगती । भगवद्भक्तिनिष्ठास्थिती । त्रिविध आहे ॥ ३४ ॥ कर्ममिश्रा भगवद्भक्ती । प्रथमषट्का आंतौती । जे समस्त विघ्नाप्रती । निवर्ती क्षणें ॥ ३५ ॥ कर्म करून भगवदर्पण । करीत जावे क्षणक्षण । येणें देहाभिमान । सहज जाय ॥ ३६ ॥ मग भगवंताचेनि प्रेमें । होवूं न शकती कर्में । तेव्हां ध्यानचि मनोधर्मे । शुद्ध राहे ॥ ३७ ॥ ती नुसुधी भक्तिनिष्ठा । मध्यमषट्कें बोलिली स्पष्टा । तृतीयषट्कीं वरिष्टा । ज्ञानमिश्रा ॥ ३८ ॥ किंचिद्भेदें करितां ध्यान । कितीही प्रेम असतां जाण । तरी तो आत्मप्रीतीहून । अधिक न घडे ॥ ३९ हे प्रेमळा न दिसे योग्य । यालागीं निगमकथितांग्य । ज्ञान घेवोनि श्लाघ्य । होतीं स्वयें ॥ २४० ॥ मग ज्ञानीं जी आत्मप्रीती । तीचि प्रेमीं भगवद्भक्ती । सच्चिदानंद सहजस्थिती । गीतासंगती बोलिजे ॥४१॥ अथवा कर्म आणि तत्यागेंकरून । त्वंपदाविवेकानिरूपण । प्रथमषट्कीं संपूर्ण । बोलिले देवे ॥ ४२ ॥ द्वितीयषट्कीं भगवद्भक्ती । भगवत्परमानंदस्थिती । सांगोनि तत्पदाविवित्ती । अवधारिली ॥ ४६ ॥ तृतीयषट्कीं दोहींचें ऐक्य । सांगूनि स्पष्ट केले महावाक्य । एथ भाष्यकारमतप्रमाधिक्य । उपेगा आले ॥ ४४ ॥ असो हें गीतातत्व । जें कैवल्यसाधनपर्व । दाखवूनि शास्त्रार्थत्व । बोलिजे आतां ॥ ४५ ॥ काम्य निषिद्ध त्यागोन । निष्कामकर्मानुष्ठान । हा वैदिकधर्म जाण । परी भगवद्भजन याहून श्रेष्ठ ॥ ४६ ॥ निष्काम कर्म हा धर्म । आणि

भगवद्भजन परम धर्म । जपस्तोत्रादिकीं पुरुषोत्तम । आळवी प्रेमें ॥ ४७ ॥ तिया परमात्मप्रीती । आणि नामस्मरणसंपत्ती । चित्तशुद्धी एकाग्रताप्राप्ती । सहज होय ॥ ४८ ॥ अनंत जन्माची पापें संचित । ते सकळचि असती अज्ञात । त्या सर्वांचें प्रायश्चित । घेणें अशक्य ॥ ४९ ॥ ह्मणोनि करावें गंगास्नान । तेणें पापें जळती संपूर्ण । ते गंगा चरणांगुष्ठीहून । निघाली ज्याच्या ॥ २५० ॥ भक्तध्यानीं प्रकटे जेव्हां । गंगा पदनखीं दिसे तेव्हां । प्रेमळ भक्तांचिया अनुभवा । मिथ्या न ह्मणावे ॥ ५१ ॥ त्या प्रभूच्या सर्वांगीं नाम व्यापक । तत्स्मरणें कोणतें उरेल पातक । नाम शस्त्रचि संघातक । अनादिकर्मा ॥ ५२ ॥ हरिनामीं शक्ती केवढी । असो परी पापें नाशक जेवढीं । पापिया पापकृती करणें तेवढी । ईशसृष्टींत अशक्य ॥ ५३ ॥ प्रत्यक्ष गंगाचरण संबंध । आणि नामरूपाचा कल्पित अभेद । ह्मणोनि गंगे ऐसें प्रसिद्ध । नाम न घडे ॥ ५४ ॥ परी हें बोलणेंचि वाया । गंगेचा व्यक्त संबंध पाया । आणि नामाचा अव्यक्तसंबध रूपा या । अव्यक्तापासुनी ॥५५॥ रूप तें तरी व्यक्त । नाम व्यापक अव्यक्त । यास्तव संबंध अखंडित । नामरूपाचा ॥ ५६ ॥ नामें तारिली अयोध्या एक । नामें तारिले तिन्ही लोक । यास्तव हरीहून अधिक । हरिनाम तें ॥ ५७ ॥ अहो अग्निशद्ब उच्चारितां । जरी असती अग्निऐक्यता । तरी मुखाचा दाह होता । उच्चारमात्रें ॥ ५८ ॥ तैसें शद्बरूप जें नाम । हरिरूप तदैक्य परम । मानणें हा भ्रम । स्पष्ट दिसे ॥ ५९ ॥ परी ऐसें ही न ह्मणावें । भौतिक सृष्टींत हें ओळखावे । अलौकिक सृष्टींत जाणावे । दोन्ही एक ॥ २६० ॥ ज्या चिद्वृत्ति रूप सगुण । त्याचि चिद्वृत्ति नाम आपण । ह्मणोनि ऐक्य सुघटमान । नामरूपाचें ॥ ६१ ॥ ऐसी जी मुख्य नामें असती । ती स्मरतां भलत्या रीती । भाव असो वा नसो चित्तीं । परी जळती पातकें ॥ ६२ ॥ आणीक एक समाधान । गंगाहरिसंबंध शास्त्रवचन । आणि नाम व्यापक ह्मणोन । शास्त्रचि सांगे ॥ ६३ ॥ दोन्ही स्थळीं शास्त्र प्रमाणस्थित । परी व्यापकबोधक शास्त्र बळवंत । आणि ऐसेचि सांगत आले संत । येणें गुरुवाक्य प्रमाणार्थ ही फावला ॥ ६४ ॥ यास्तव हा दृढ निश्चय । अनंतजन्मपापक्षय । नामें झाला मग राहिले होय । सुकृत जे कां ॥ ६५ ॥ तें सुकृत कारिता भगवदर्प-

ण । तेणेंचि शुद्ध होय मन । या जन्मीं सुकृत न करतांही जाण । नामधारका चित्तशुद्धी ॥ ६६ ॥ एकवेळ कारितां नामस्मरण । अनादि पापें गेलीं जळोन । मग अनादि पुण्य जें राहिलें जाण । तें करितां कृष्णार्पण चित्तशुद्धी ॥६७॥ **शंका**—अहो अनादि पुण्य संचित । तें तंव असे अज्ञात । भगवदर्पण निश्चित । होईल केवीं ॥६८॥ शं. २ आणि तें जरी होतें अर्पण । तरी प्रारब्धही कारितां येईल समर्पण । मग भक्तशरीरपतन । अर्पणक्षणीं होवावें ॥ ६९ ॥ शं. ३ नानाजन्मीं नानाव्यक्ती । कर्म करणार झाल्या असती । तितुक्या जन्मींची कर्मसंपत्ती । एक व्यक्ती अर्पे केवीं ॥ २७० ॥ **समाधानः**— हेंही बोलणें वृथा । एकवेळ नाम स्मरतां । अज्ञात पातकें जळती तत्वतां । अनंत जन्मींची ॥ ७१ ॥ तरी मग प्रेमें अर्पिलें सुकृत । ते जरी असेल अज्ञात । तरी अर्पण नोहे एवमुक्त । संघटे के? ॥ ७२ ॥ आत्मप्रीतीनें पाहतां । नामा एवढाचि प्रेम तत्वतां । किंबहुना शास्त्रीं प्रेम ऐक्यता । आत्मभगवंता बोलिली ॥ ७३ ॥ ह्मणूनि प्रेम सर्वव्यापक । तो वृत्तिरूपें होता देख । परी प्रेमवृत्तिज्ञाता जगन्नायक । प्रेमरूप सर्व जाणे ॥७४॥ **यः सर्वज्ञ स सर्वविदिति । यस्य ज्ञानमयं तपः** ही श्रुती । प्रमाण ह्मणुनी परेशाप्रती । अशक्य काय ॥ ७५ ॥ प्रेमवृत्तिज्ञ ह्मणोनि त्यासी । प्रेमें जें जें अर्पणासी । आणिलें तें तें प्रेमेसीं । अर्पिल्या घेतो ॥ ७६ ॥ फुलें अर्पितां मुखीं घालीं । एवढी प्रेमळ कौतुकी माउली । तरी नानाभवपुण्यसंपत्ति अर्पिलीं । प्रेमें ती कां न घेईल ॥७७॥ स. २ परी कर्मेचि होय भगवदर्पण । फळ तें लागे भोगण । ह्मणोनि पुण्य प्रारब्धभिन्न । संचित अर्पण भगवंतीं ॥ ७८ ॥ फलोन्मुख झालें नाहीं तोंवरी । समर्पावें हरिपदावरी । फलोन्मुखी तें निर्धारी । भोगणें पडे ॥ ७९ ॥ फलोन्मुख सोडोनि सुकृत । जेवढे असेल संचित । तेवढेंचि अर्पण निश्चित । अर्पिल्या होय ॥ २८० ॥ परी किंचित् कर्मही कृष्णार्पण । केलिया होय कोटिगुण । तरी अनंत जन्मींचें केलिया अर्पण । चित्तशुद्धी नव्हे कैसी ॥ ८१ ॥ परी ऐसें नाम घेतां । चित्तशुद्धी सकळाचे हाता । परी दुर्वासना तत्वता । नाणावी पुन्हा ॥ ८२ ॥ नामाचे अपराध दहा । ते न करूनि पहा । नाम घेत रहा । जैसे तैसे ॥ ८३ ॥ नामविश्वासें निंदणें संता । दुर्जना नामवैभवकथा । रमाकांता आणि उमाकांता । भेदबुद्धी पाहणें ॥ ८४ ॥

श्रुती स्मृती सद्गुरुवचन । येथ न विश्वासे मन । आणि नामें पातकें ज-
ळती संपूर्ण । हें स्तावक ह्मणणें भ्रांतीस्तव ॥ ८३ ॥ नाम आहे आह्मां
पाशीं । ह्मणोनि निषिद्ध आचरणासी । प्रवृत्ति लागली विशेषीं । जया-
चें होय ॥ ८६ ॥ जवळी नामस्मरण चांग । मानुनी करी विहितत्याग ।
अन्यदेवता आणि श्रीरंग । यांचीं नामें समाचि ह्मणे ॥ ८७ ॥ एवं
हरिहरमंत्र जपतां । हे अपराधदशक सर्वथा । येवों न द्यावे माथां ।
प्राण गेलिया ही ॥ ८८ ॥ अपराध चुकवूनि करणें स्मरण । तरीच
नामें उजळे मन । पातकेंही जळती संपूर्ण । फळ श्रीकृष्ण सांपडे
॥८९॥ मग नाम घेतां घेतां । चिंतित असावे भगवंता । अनंत जन्मीं-
चिया सुकृतां । अर्पावे पायीं ॥ ९० ॥ नानाजन्मीं कर्म करतां । एकचि
लिंगशरीरी तत्वतां । स्थूलशरीरभिन्नता जन्मजन्म ये ॥९१॥ स. ३ नाना-
जन्मीं नानाकर्तृता । तरी कर्मफलयोग होईल वृथा । अन्यकर्मभोग अ-
न्याच्या माथां । न घडे कहीं ॥ ९२ ॥ देवदत्तें करितां भोजन । वि-
ष्णुदत्त तृप्तिसंपन्न । हें जगीं कवण । देखिलें नाहीं ॥ ९३ ॥ ह्मणोनि
जो कर्मकर्ता । तोचि तत्फलभोक्ता । यास्तव नानाजन्मीं कर्ता । एकचि
कीं ॥ ९४ ॥ कर्मकर्त्याचा नाश होत । पुन्हा भोगावया उपजत । तरी
तो नाश नव्हे निश्चित । लीनावस्था ॥ ९५ ॥ पुनरुत्पत्ती जयासी ।
न्याय प्रेत्यभाव ह्मणे तयासी । ह्मणोनि येथ नाश ऐसी । उक्ती न साहे
॥ ९६ ॥ स्थूलशरीरावांचून । लिंग व्यक्त नव्हे जाण । कां जे स्थूल-
शरीरी आपण । लिंग नेणते ह्मणोनिया ॥ ९७ ॥ नाश होवूनि पुनरु-
त्पत्ति । मानणें हे गौरवस्थिती । अव्यक्त हें लिंगशरीरसंपत्ति । लाघवें
सयुक्ती मानणें ॥९८॥ आणि आत्मा नाहींसा होत । हा अस्तित्वकालीं
बांधला सिद्धान्त । आत्माभावकालीं तत्प्रतीत । होतसे केवीं ॥ ९९ ॥
ह्मणाल कीं अस्तित्वकालीं आहेपणाचा । तुह्मी सिद्धान्त बांधला साचा ।
जीवंतपणीं ह्मणोनि त्याचा । मेलियावरी प्रत्ययो कें ॥ ३०० ॥
तरी जीवंतपणीं शरीराहून । ममत्वगुणें आत्मा भिन्न । षष्ठीव्यपदेशें-
करून । कळे साच ॥ १ ॥ जागृतींत ममत्व या देहीं । स्वप्नीं ममत्व
दुसऱ्याठायीं । ते आभास असो परी । ममत्व लवलाही भिन्न हो शके
॥ २ ॥ ममत्वभिन्न अहंता । एवं जीवंतपणीं तत्वतां । शरीराहूनि आ-
त्मभिन्नता । सिद्धचि आहे ॥ ३ ॥ तोचि प्रत्यय मेलियावरी । राहे ही

अनुमिती खरी । ममत्वसंबंध होता शरीरी । तो मात्र सुटे ॥ ४ ॥ ते ममत्व होवूनि वासना । अहंतारूपें जीव जाणा । ऐसी लिंगशरीरघटना । न मोडे कदा ॥ ५ ॥ ज्ञानें जरी लिंगशरीर मोडत । तरी वासनाचि एक नाशत । अहं ब्रह्म ऐक्य होत । सहजाचि जीव ॥ ६ ॥ अनादि आरोपें वासनेसहित । अविवेक होता मानित । तो विवेकें वासना निवृत्त । करोनि स्वस्थ ब्रह्म होय ॥ ७ ॥ परी हो कां ज्ञानी अज्ञानी । आत्मनाश नये प्रमाणीं । लिंगशरीरासह अज्ञानी । ज्ञानी तद्रहित ॥ ८ ॥ ज्ञानी लिंगशरीरभिन्न । हे तंव अनुभवाची खूण । परी मेलिया जीव असतो आपण । येथ अनुमान प्रवर्ते ॥ ९ ॥ मेलिया असतो हें साच होय । परी आपण तेथ करतो काय । इत्यादि विषयीं प्रमाण होय । श्रुतीचि मात्र ॥ १० ॥ आणि जे अनुमान । ते भावपदार्थाविषयीं प्रमाण । अभाव तंव प्रत्यक्ष जाण । असावा लागतो ॥ ११ ॥ भविष्यद्भावकल्पना । तेही सर्वथा नव्हे जाणा । रूपांतरगत परमाणुपणा । भावना आणी ॥ १२ ॥ अथवा अभावांश घेऊन । किंवा नाशक पदार्थ पाहून । भविष्यद्भावकल्पना मन । उपाधीस्तव करी ॥ १३ ॥ तेंवि येथ आत्मनाशक । पदार्थ न दिसे कोणी एक । जो पदार्थ शरीरनाशक । तो आत्मनाशक घडेना ॥ १४ ॥ जीवंतपणीं आत्मा भिन्न । हें सिद्धचि सिद्ध जालें ह्मणून । भविष्यत् आत्माभावकल्पन । न करवे कीरू ॥ १५ ॥ आणि उपाधीवांचून अभावें । प्रत्यक्ष लागेल होवावें । कारण विशेषणताज्ञानें संभवे । अभावज्ञान यास्तव ॥ १६ ॥ एवं आत्माभावासी अनुमान । काहीं न मिळे ह्मणून । अस्तित्वकाळीं नास्तिक्य कल्पोन । ते अघटमान नास्तित्वकाळीं ॥१७॥ ह्मणोनि मेलियावरी आत्माभाव । हें सिद्ध करणेंचि झालें वाव । आणि अभावांतुनी आला सावेव । तरी पुन्हा नये येथ प्रमाण कीं ॥ १८ ॥ संयोगाचें फळ ह्मणतां । संयोग असे परार्थ । संयोगघटकावयवीं संयोगभोक्तृत्व । असंभूत ॥ १९ ॥ संयोग भोग्य संयोग भोक्ता । तरी एक झाली भोक्तृभोग्यता । तांबूल आणि तांबूलभाक्षिता । एक न दिसे ॥ २० ॥ वेदांती जरी चैतन्यैक्यता । उपाधींमुळें भोक्तृभोग्यव्यवस्था । यास्तव संशय वृथा । आणिता गेला ॥ २१ ॥ आणि संयोगाचे फळ मानिलें । तरी संयोग द्रव्यांत पाहिजे पहिले । न तरी सर्वांपासूनि जा-

हले । पाहिजे सर्व ॥ २२ ॥ कार्यघटन संयोगयोग्यता । तैंचि संयोगें कार्य तत्वतां । आणि संयोग द्रव्यांत मानितां । प्रश्न उठे ॥ २३ ॥ दोन द्रव्यांत एक आत्मा। राहे याची न घडे प्रमा । संभूति अथवा अनुमा । कांहींचि नव्हे ॥ २४ ॥ अर्धा आत्मा शोणितांत । अर्धा आत्मा आश्रयी रेत । तरी अर्ध अर्ध अहं प्रतीत । न दिसे कांहीं ॥ २५ ॥ दोन अहंता मिळोन । उपजे एक अहंपण । एथ कोणतेंही प्रमाण । प्रवर्तेना ॥ २६ ॥ मायबापाचे अहं मिळून । होय पुत्राचें अहंपण । तरी मायबापांतील अहं न्यून । कां न दिसे ॥ २७ ॥ प्रमाण सिद्ध नाहीं । आणि कल्पिजे जरी काहीं । **कल्पितानामवस्तुत्वात्** (शां. भा. २ अ. २ सू. १२, १३.) या भाष्यें तेही । निवारिले ॥ २८ ॥ प्रमाणाचिया मापा । न सांपडेचि जे बापा । तया आणि खपुष्पा । विशेषू कायी ॥२९॥ ऐसेंचि श्रीतातवचन । आणि युक्तीनें हेंचि सांगे मन । यास्तव झालें अप्रमाण । नास्तिक्य ॥ ३० ॥ वीर्यरक्तादिस्थ जंतूंचें । अहंपण मिळोनि साचे । अहंपण होय पुरुषाचे । तरी हा प्रश्न ॥ ३१ ॥ जंतूंच्या शरीरीं राहून । एक होय अहंपण । किंवा जंतु शरीरभिन्न होवून । अहंपण एक होय ॥ ३२ ॥ किंवा जंतूंची अहंता । थोडी थोडी तुटोनि तत्वतां । होय एक पुरुषाची अहंता । पक्षत्रय हे ॥ ३३ ॥ यांतील आद्य स्वीकारितां । तरी जंतुशरीरीं न्यून दिसावी अहंता । परी येथ प्रमाणता । नसे कांहीं ॥३४॥ द्वितीयपक्षस्वीकार । केला तंव अहं जैं सोडी शरीर । त्याक्षणीं शरीरभिन्न साचार । अहं कैंचा ॥ ३५ ॥ क्षण एक शरीरभिन्न अहंता । जरी येत स्वीकारिता । तरी मेलियावरी राहे अहंता । हे स्वीकारितां कां नये ॥ ३६ ॥ आणि स्वीकारितां तृतीयासी । तरी माझ्यातुनी थोडा अहं गेला ऐसी । प्रतीती होय काय जंतूसी । हे तरी सांगा ॥३७॥ हें न कळे जरी । स्वीकारावी कैसी तरी । अज्ञेयस्वीकार करणे जरी । अनुमान ज्ञेय तरी कां न घ्यावे ॥ ३८ ॥ जंतूसी कळे ही कल्पना । येईल कोण्या प्रमाणा । आपणा तंव कळेना । हें सिद्धचि आहे ॥ ३९ ॥ एवं पक्षत्रय गेले । पुन्हा संयोगें जरी चैतन्य झाले । परी संयोग तोंवरी देखिले । तदीय गुणा ॥४०॥ येथही संयोगघटित शरीर । तयाचा गुण चैतन्य जर । तरी नष्ट न होतां शरीर । चैतन्य गुण कां जाय ॥४१॥ आणि

किंचित राहे गुण । तरी जो जाय निघोन । तो द्रव्यपरमाणुवांचून । राहे कोठें ॥ ४२ ॥ आणि द्रव्यपरमाणुसहित । जातो हें केलें स्वीकृत । तरी परमाणूचे विभाग होती निश्चित । नाश कल्पितां नये ॥ ४३ ॥ येणें ही आत्मनाश असंभव । प्रत्येक परमाणुगत चिद्भाव । तरी जंतुता येईल स्वयमेव । तयांनां कीं ॥ ४४ ॥ थोडे थोडे अहंपण । हें स्वी-कारणें अप्रमाण । प्रत्येकाशी पूर्ण अहंपण । तरी मग समष्टि अहंपण कोठें जाय ॥ ४५ ॥ कांहीं अहं मिळोन । जरी एक होय अहंपण । तरी ते परिणाम ह्मणोन । एक एक निघोन जावूं न शके ॥ ४६ ॥ आणि एक एक निघोनि जातां । तरी प्रत्येकासी भिन्न अहंता । येणेंही एका अहंचा तत्वतां । शोध न लगे ॥ ४७ ॥ परिणाम तरी स्थूळ झा-ले । ते जातेवेळीं पाहिजे दिसले । अदृश्य स्थूळ जरी घेतले । तरी नाश तो कैसा ॥ ४८ ॥ आणि द्रव्य सोडोनि गुण देशांतरीं जाये । हे पुष्पावरोनि स्थूल कल्पना ये । परी द्रव्य असतां गुणनाश होय । हे कल्पिताही नये कल्पांतीं ॥ ४९ ॥ तैसें शरीद्रव्यापासून । आत्मा जाऊं शकेल निघोन । परी नाश पावेल हें बोलण । मानलियाही संयोग गुण न संभवे ॥ ५० ॥ आणि अहंता भिन्न जोंवरी । पूर्ण संयोग न घडे तोंवरी । जैसा पक्षिसमुदाय निर्धारी । तरी प्रत्येक भिन्न होवूं शके ॥ ५१ ॥ जंतूंचाही समुदाय । तैसाचि अर्धसम होय । स्त्रीपुरुषाचा संयोग होय । अर्धसमचि ॥ ५२ ॥ अहंतावत् संयोगिता । तैं प्रत्येक अहंते इच्छाभिन्नता । ते पाहिजे तेव्हां तत्वतां । मोकळी होईल ॥५३॥ तैसाहि न दिसे शरीरी । कल्पावें कीं अहं परतंत्रीं । वर्तती होवूनि ए-काकारी । तैं सत्ता चालविणारी कोण शक्ती ॥ ५४ ॥ ते अहंहून जड अज्ञानी असणें । हें सर्वथा न घडे घेणें । आणि अहंहून ज्ञानी मानणें । तरी तें ज्ञान स्वतंत्र कैसें ॥ ५५ ॥ त्या ज्ञानासीही संयोगजन्यता । त-री दोष पावला अनवस्था । एवं आत्मनाश तत्वतां । वदावा केवीं ॥५६॥ अभावांश घेऊन । कीजेल भविष्यदभावकल्पन । तरी अभावां-श प्रत्यक्षपण । दिसावे जिता ॥ ५७ ॥ थोडा थोडा मी मेलों । ह्मणजे नाहींसा थोडा थोडा झालों । आतां कांहींसा राहिलो । ऐसें कोणा न वाटे ॥ ५८ ॥ केवळ न दिसे ह्मणोन । जरी नाश येईल बोलण । तरी बाहेर गेला तो न दिसे ह्मणून । मेला कां न ह्मणावा ॥ ५९ ॥ दृष्टि-

सृष्टिवादें तत्वतां । बाहेर गेलिया संभवे मरणता । तयाचा अभिप्राय अज्ञात सत्ता । नाहीं ऐसा ॥ ६० ॥ आपुली आपणा सर्वथा । न सांपडे अज्ञात सत्ता । येणेंही आत्मनाशरूपता । कल्पितां नये ॥६१॥ सुषुप्ती-तूंनी उठविता । उठे, सुषुप्तीच इच्छी पुढतां । सुखावांचोनि इच्छा तत्वतां । न दिसे कोठें ॥ ६२ ॥ आपल्या अभावी सुखभोग । ऐसा नाहीं अनुभव प्रसंग । अनुमानाचाही योग । दावावा कोणी ॥ ६३ ॥ ह्मणून सुषुप्तींत अज्ञातसत्ता । न घडे न घडे सर्वथा । येणेंही आत्माभाव कल्पितां । नये आह्मा ॥ ६४ ॥ अहो जो बाहेर गेला त्यातें । मी आहे ऐसें कळतें । परी तो मेला दुजियातें । दृष्टिसृष्टिवाद ॥ ६५ ॥ तरी हाही दृष्टांत । सहजचि असंभूत । आत्माभाव कल्पितां निश्चित । आपला अभाव कल्पणें लागे ॥ ६६ ॥ कोणी पुसतां ऐसें । मेल्यावरी तुह्मी रहाल कैसे । तरी मी नाहींसा होईल ऐसें । हें अपैसें पडेल सांगणें ॥ ६७ ॥ आपुला अभाव साधून । दृष्टिसृष्टिवादें हें अघटमान । अन्य वादाचें निराकरण । झालेंचि आहे ॥ ६८ ॥ आपुली जे कां उणखुण । तेथ अन्याची क्रिया काय प्रमाण । जैसा विष्णुदत्त करितां भोजन । तेणें माझी तृप्ती नव्हे ॥ ६९ ॥ एवं प्रमाण सिद्ध आत्मसद्भाव । आणि खपुष्पसमही कल्पितां नये अभाव । तरी मग वायफळ सर्व । नास्तिक्यबोल ॥७०॥ शास्त्रीय अनुमानही यासी । न घेतां आत्मनित्यतेसी । अकृताभ्यागम कृतप्रणाशासी । प्रसंग येतो ॥ ७१ ॥ मग भोजन न करितां । तृप्ती होवावी तत्वतां । कीं मैथुन न करितां । होवावा सुत ॥ ७२ ॥ प्यालियाही जीवन । न भागावी तहान । केलियाही मैथुन । सुख न व्हावे ॥ ७३ ॥ जगांतील सुखदुःखाचा । ठावो न पडे साचा । पूर्वोक्त दोषद्वयाचा । स्वीकार केलिया ॥ ७४ ॥ कारण तंव मानणें । परी काहीं ह्मणणें । शास्त्रीय आणि प्रमाणसिद्ध टाकणें । दूरी कां मग ? ॥ ७५ ॥ आणि आग्रहचि पुन्हा । तरी शुद्ध मूर्खपणा । मरणीं तरी वायफळपणा । सुटेल हा ॥ ७६ ॥ असो नानातर्कता । सुयोगें सिद्ध झालें आतां । नानाजन्मीं कर्मकर्ता । एक लिंगशरीरी ॥ ७७ ॥ अहो कर्मकर्ता एक स्थित । परी पुण्यकर्म जे संचित । तें अदृष्टत्वें देवतास्मृतिगत । नाहीं तंत्रांत कर्त्याच्या ॥ ७८ ॥ तें केवीं करितां येईल अर्पण । हाही न घडे परिप्रश्न । देवता संचिताची ठेविती आठवण । परी तदहंपण

फल्यासीचि ॥ ७९ ॥ आणि सकलदेवतांचा ईश । स्वामी एक परेश । तोचि जाणे निःशेष । कर्मसमुदाय ॥ २८० ॥ ह्मणोनि कर्ता अर्पी हरीसी । तो स्वीकारी तयासी । तेथें मग देवतासी । ना न ह्मणवे ॥ ८१ ॥ एवं भगवन्नाम घेतां । पापें नाशिती सर्वथा । आणि सर्व-जन्मपुण्य समर्पितां । चित्तशुद्धी होय ॥ ८२ ॥ कांहीं रहस्यास्तव जाण । केलें ऐसें निरूपण । एऱ्हवीं पाहतां क्रियमाण । भगवत्समर्पण सर्व कारिती ॥ ८३ ॥ येणेंचि होय चित्तशुद्धी । ध्यानें चित्तैकाग्रता-सिद्धी । नामें पापनाश प्रसिद्धी । सहज होय ॥ ८३ ॥ परी पश्चात्तापें करावे स्मरण । ऐसेंचि वदे विष्णुपुराण । नाम घेतलियावरी जाण । प्रवर्तों नये पापार्थ ॥ ८५ ॥ पापें करीलही नाम घेतां । तया पद्मपत्रा-सम अलिप्तता । हे नामस्मरणीं देहविस्मृता । इतरा नव्हे ॥ ८६ ॥

## अभंगः– एकनाथगाथा. [ सदुक्तिजोड–चूर्णिकाभेद. ]

" नाम स्मरता ह्मणुनी आचराल दोष । तरी श्रवण मनन भक्ती पडली ओस । " एकनाथवाक्य हें प्रमाण मानिलें । ज्ञानेश्वरकरुणे हितार्थी आणिलें ॥८७॥ ओंवी–नाममाहात्म्य स्तवितां जाण । नाहीं स्तविले विषयिजन । असो एवं भगवद्भजन । करितां मन शुद्ध आणि एकाग्र होय ॥ ८८ ॥ वृद्धी पावे जें एकाग्रता । तें विषयावांचोनि आनंद त-त्वतां । वाटे तेणें विवेकयोग्यता । पावे चित्त ॥ ८९ ॥ विषयीं सुख नाहीं । विषय नसतांही आनंद राही । सुषुप्ती विषय नसतांही । आनंद आहे ॥ ३९० ॥ जागृत्प्रपंच नाहीं स्वप्नांत । जागरी स्वप्नप्रपंच नसत । दोन्ही प्रपंच सुषुप्तींत । नसती कीरू ॥ ९१ ॥ ह्मणावा कीं होतां लीन । तरी नवा नवा होय उत्पन्न । आत्मैकत्वें एकपण । भ्रांतीनें याचें ॥ ९२ ॥ आणि अवस्थात्रयीं पाहतां । सच्चिदानंद आत्मनित्यता । अ-भिन्न ह्मणोनि मेलिया जिता । आत्माचि नित्य ॥ ९३ ॥ तो आत्मा परब्रह्म अखंड । इतर प्रपंच अनित्य थोंड । ऐसा नित्यानित्यविवेक प्र-चंड । उपजे जेव्हां ॥ ९४ ॥ मग अनित्य विषयांच्या ठायीं । दोष पाहतां पाहतां पाहीं । दोषसाक्षात्कारबळें होई । रागाभाव जो ॥ ९५ ॥ मग विषय हा भोगिजे । ऐसा राग नुपजे । कीं हा सर्वथा त्यागिजे । द्वेषही नुपजे हा ॥ ९६ ॥ ऐसी ही असतां स्थिती ।

परी विषयावीण आनंदवृत्ती । या नांव ह्मणती । वशीकार वैराग्य ॥ ९७ ॥ रक्षणचिंतादि दु:खेंकरून । व्याप्त आहे सदा धन । कामादि विकारें करून । कामिनी जैसी ॥ ९८ ॥ बाल्य चिंतादि दु:खयोगें । दु:खमयत्व पुत्रांगें । एवं ऐहिक विषयीं चांग । दोषदर्शन ॥ ९९ ॥ यज्ञांत राहूनि ब्रह्मचारी । स्वर्गी रंभादिवेश्या नारी । भोगणें घडे हें फळ निर्धारी । ब्रह्मचर्यपुण्याचें नव्हे ॥ ४०० ॥ पंचभूतत्वें पहातां । ब्रह्मलोकींही समानता । संयोग वियोग प्रियाप्रियता । कलहादि साम्यता तैसीच ॥ १ ॥ कोणत्याही लोकींचें स्थूळशरीर । न घेऊनिया साचार । लिंगशरीरें तन्मात्र । भोग जो होय ॥ २ ॥ या नांव वैदेहप्राप्ती । निरावरण होऊनि निश्चिती । तेथ जे लिंगशरीरें भोग भोगिती । प्रकृतिलय ह्मणती या नांव ॥ ३ ॥ एथ आवरणशब्देंकरून । पौराणिक सप्तावरणग्रहण । अविद्यावरणनिरूपण । नाहीं केलें ॥ ४ ॥ या आवरणसप्तकापर । प्रकृतिलयगत नर । प्रकृतिलयशब्दार्थसार । प्रलय न ह्मणावा ॥ ५ ॥ सावरण ब्रह्माण्डांत । लिंगशरीरें भोग भोगित । परी ते मलिन विषयप्राप्त । विदेह ह्मणावे ॥ ६ ॥ आवरण भेदूनि सप्त । निरावरण स्थित । लिंगशरीरें समस्त । भोगिती भोग ॥ ७ ॥ तेंथ स्वसंकल्पानुसारें विशेषें । निर्मिले कारणोपहितें परेशें । ते शुद्धभोग निःशेषें । भोगिती जे ॥ ८ ॥ ईश्वरकोटी ह्मणिजे तया । ऐसियाही प्रकृतिलया । जन्म घडे जावोनि प्रलया । कालान्तरीं ॥ ९ ॥ तरी मग विदेहादिकें । ग्रासिलीं असती दु:खें । हें ह्मणावया विशेखें । कायसें आलें ॥ ४१० ॥ ह्मणोनि दृष्ट येथिचे । स्वर्गादिप्रकृतिलयान्त साचे । आनुश्रविक या दोहीं विषयांचें । दोषदर्शनें वैराग्य ॥ ११ ॥ विषयदोषदर्शनीं यतन । ही वैराग्यभूमी यतमान । इतुकीं इंद्रियें जिंकिलीं जाण । जिंकणें आहे इतुकीं ॥ १२ ॥ या नांव वैराग्य व्यतिरेक । बाह्येंद्रियें जिंकिलीं देख । यातें एकेंद्रियसंज्ञक । वैराग्य ह्मणिजे ॥ १३ ॥ झालिया दोषसाक्षात्कृति । हेयोपादेयशून्या वृत्ति । या नांव वशीकार विरक्ती । दृष्टानुश्रविकविषयवितृष्णा ॥ १४ ॥ हेयोपादेयशून्या वृत्ति । रक्षावी ह्मणोनि शमादिसंपत्ति । संन्यासनिष्ठा यथास्थिती । श्रुती सांगे ॥ १५ ॥ ऐसा सर्वत्यागी होता । साधे मोक्षेच्छादृढता । जन्ममृत्युजरादिदु:खता । निपटेल कर्धी यापरी ॥ १६ ॥ नंतर सद्गुरुसमीपगम-

न । सप्रेमें सेवितां तच्चरण । सद्भावें वारंवार नमन । कारित मन तन्मय होय ॥ १७ ॥ मग सद्गुरु संतुष्ट जेव्हां । माग ह्मणती तेव्हां । परिप्रश्न करावा । अतितर विनयें ॥ १८ ॥ तदा महावाक्योपदेश । सद्गुरु कारिती सावकाश । तोचि दृढ व्हावयास । वेदान्तश्रवणादि कीजे ॥ १९ ॥ तेथ श्रुतिसमन्वयरूप श्रवण । शारीरक प्रथमाध्यायेंकरून । साधक बाधक युक्त्या मनन । द्वितीयाध्याये संभवे ॥ २० ॥ ब्रह्माकारवृत्तिकरण । हे तृतीयाध्यायें निदिध्यासन । साक्षात्कार निरूपण । चतुर्थाध्यायें ॥ २१ ॥ हें सांप्रदायिक मत । दुसरें ही एक दिसत । अध्यायचतुष्टय वेदांत । श्रवणार्थ घेइजे ॥ २२ ॥ प्रकृतिसत्यता पुरुषबहुता । हे सांख्यांतील सांडोनि तत्वतां । अवशिष्ट सांख्य तत्वतां । उपयोग मननीं ॥ २३ ॥ न्यायांतील पदार्थ वेगळे करुनी । अनुकूलयुक्ती घेइजे मननीं । श्रुतिविरुद्ध भाग सांडुनी । निदिध्यासनीं योग घ्यावा ॥ २४ ॥ जगत्सत्यता आत्मभिन्नता । आणि विश्वाहूनि ईश्वरान्यता । हे त्रय सांख्ययोगीं सोडितां । वेदांतैक्यता पावती ॥ २५ ॥ श्रुत्यनुकूल युक्त्या मनन । श्रुत्यनुकूल योगें निदिध्यासन । तदा चित्तदोष क्षीण । सकळ होती ॥ २६ ॥ मग मी ब्रह्म आहे ऐसी । भूमी उपजे आपैसी । समाधि प्रज्ञा ह्मणती जियेसी । ती महावाक्येंकरूनि उपजे ॥ २७ ॥ ऐसा ब्रह्मसाक्षात्कार । शब्देंचि उपजे साचार । असंभावनादि निवृत्तिकर । बोधदार्ढ्या मात्र मननादि ॥ २८ ॥ द्वैताचें अग्रहण । सुषुप्ती समाधींत समान । परी निद्रेंत बीज अज्ञान । ते समाधींत संपूर्ण क्षीण होय ॥ २९ ॥ गुणाविषयीं वृत्ती । हेयोपादेयशून्यास्थिती । या नांव बोलिजे पराविरक्ती । परपुरुषख्याती हेतुगत ॥ ४३० ॥ येणें समाधि संपूर्ण । उदय पावे तत्वज्ञान । अविद्यानिवृत्ती ही जाण । तेव्हांचि होय ॥ ३१ ॥ इचे नांव ब्राह्मी स्थिति । येथ अविस्मरण अविद्यानिवृत्ति । द्वैताग्रहण समाधिसंपत्ति । तत्वसंविति ब्रह्माहमास्मि ॥ ३२ ॥ तेव्हांचि आवरणनिवृत्ति । आणि जगत्सत्यत्वभ्रमानिवृत्ति । मोक्षविषयकसंशयस्थिती । तेव्हांचि नाशे ॥ ३३ ॥ फलोन्मुख नाहीं झालें । ऐसें संचित ज्ञानें नाशिलें । अकर्तृत्वपणें निवटिलें । क्रियमाण तें ॥ ३४ ॥ प्रारब्ध आहे तोंवरी भोग । बाधितानुवृत्या भासे जग । योगी ह्मणती हा प्रारब्ध भोग । एक्याचि जन्में सांग भोगितां ये

॥ ३५ ॥ प्रारब्ध बहुजन्मसमुचित । ऐसें जयांचें मत । त्यासीचि हा अपेक्षित । कायव्यूह ॥ ३६ ॥ दुसरे योगी ह्मणती । एकचि जन्मापुरती । प्रारब्धता सांगे श्रुती । चरमजन्मीं प्राप्ति ज्ञानाची ॥ ३७ ॥ यास्तव प्रारब्धें दुःख येती । ते साहणें अचलस्थिती । हेंचि योगकार्थ निश्चिती । शिवसंहितोक्ती एवं असे ॥ ३८ ॥ वैराग्य उपरतीविण । केवळ जया ज्ञान । तया मोक्ष निश्चयें करून । परी दृष्टदुःख न नासे ॥ ३९ ॥ जया ज्ञानावीण विरक्त्युपरती । तया पुण्यलोकगती । नाहीं नाहीं मोक्षप्राप्ती । कल्पांतीं ज्ञानावांचूनी ॥ ४४० ॥ यासाठीं विरक्ती उपरती ज्ञान । हे जवळी असावे तीन । जीवन्मुक्तिसुख संपूर्ण । तेव्हां चि मिळे ॥ ४१ ॥ मनोनाश वासनाक्षय । आणि तत्वज्ञान मितित्रय । एकत्र अभ्यासितां होय । जीवन्मुक्ती हें वसिष्ठमत ॥४२॥ ज्ञान जाहलियावरी निश्चिती । प्रेमें करितां भगवद्भक्ती । दृष्टदुःखसहनशक्ती । सुखार्पण भगवंतीं तेंही घडे ॥ ४३ ॥ अथवा मुमुक्षुदशाभ्यासें । प्राप्त सद्गुण संस्कारवशें । निर्दंभादि जैसे । ज्ञानिया आंगीं ॥ ४४ ॥ तैसी भक्तिही नांदे । परी कृत्रिमता न बाधे । हें बोलिलें विनोदें । मम हृद्रमणें ॥ ४५॥ आणि शुकाचार्यमत प्रमाण । एवंविध हरीचे गुण । जे जीवन्मुक्तांचेही कर्षिती मन । यास्तव अहैतुक जाण भक्ती घडे ॥ ४६ ॥ भक्ति हा पंचम पुरुषार्थ । एवं वासनासिद्धांत । भक्तितरूचें फळ भक्तिचि होत । ब्रह्मतनयमत एवंविध ॥ ४७ ॥ संयोगीं वियोगोपलालन । भक्ती हें शांडिल्यमत जाण । येणेंही प्रेमाचें लक्षण । होतसे कीलू ॥ ४८ ॥ द्रवीभूतचित्ताची । तैलवदविच्छिन्न साची । भगवंतीं भगवद्धर्मप्रेमाची । धारावाहिकता ॥ ४९ ॥ यानांव भगवद्भक्ती । श्रीमधुसूदन ह्मणती । भेद गेलियाही नाथतवाऽहं वृत्ती । शांकरमतीं भक्ति ऐसी ॥ ४५० ॥ जीवन्मुक्त जाहलिया जाण । भगवद्भक्तिनिष्ठा उत्पन्न । ते मृदुमध्यतीव्रतेंकरून । त्रैविध्य पावे ॥ ५१ ॥ तस्यैवाऽहं ही मृदुअवस्था । ममैवाऽसौ ही मध्य अवस्था । सएवाऽहं ही तीव्रावस्था । गोपिका प्राप्ता जिये भूमीं ॥ ५२ ॥ जीवन्मुक्त ज्ञानी भक्त । ममात्मा ह्मणे भगवंत । प्रेमळा गोपिका ऐसें मत । ज्ञानेश्वर प्रभूचेंही ॥ ५३ ॥ अद्वैतीं अनिर्वाच्य भक्ती । ऐसी श्रीतातचरणोक्ती । जीवन्मुक्ता जेंवि आत्मप्रीती । तेंवि सहज भगवत्प्रीति भक्तिसंज्ञा ॥ ५४ ॥ प्रारब्धकर्म विक्षिप्त

वासना । सर्वथा बलवती जाणा । संयमे ये नाशपणा । अनुत्थाना शनैः शनैः ॥ ५५ ॥ धारणा ध्यान समाधी तीन्ही । अभ्यासितां एकस्थानी । संयम सिद्धि पावती मुनी । यमादिपंचकांनीं युक्त जे ॥ ५६ ॥ किंवा ईश्वरप्रणिधानबळें । अतितर त्वरित समाधी मिळे । एथ भक्तिपर्याय-त्वामुळें । बोलिलें ईश्वरप्रणिधान ॥ ५७ ॥ येणें प्रणिधानें मनोनाश होय । आणि फावे वासनाक्षय । जीवन्मुक्ति दृढ होय । तत्वज्ञानें द्वया-सह ॥ ५८ ॥ हेचि व्हावया प्राप्ती । विद्वत्सन्यास सांगे श्रुती । जें पूर्वी प्राप्त तद्दृढार्थी । प्रयत्न कीजे ॥ ५९ ॥ एवं सहजचित्तनिरोधी । साधे सविकल्पसमाधी । पुढें असंप्रज्ञातसमाधी । त्रिभूमिक साधे ॥४६०॥ स्वतःसमाधींतून । प्रथमेंत पावे व्युत्थान । द्वितीयेंत दुसऱ्याकडोन । व्युत्थान पावे ॥ ६१ ॥ तृतीयभूमी व्युत्थानरहित । तथापि शिखिध्व-जराजवत । नियत्या कदाचित् व्युत्थान होत । तरी न मोडत समाधी ॥ ६२ ॥ आधिकारिक जे कोणी । कल्पारंभ व्युत्थानीं । परी ते जीव-न्मुक्तपणीं । सुखसमाधिस्थ ॥ ६३ ॥ येथ समाधि शद्बार्थ । ध्यातृध्ये-यैक्यपरमार्थ । कीं जीवेश्वरभेद समाप्त । व्युत्थानीही जयाचा ॥ ६४ ॥ ऐसे आधिकारिक । ज्ञानी भगवदुपासक । भक्तीवांचूनि दृष्टदुःख । ज्ञा-नीही भोगिती ॥ ६५ ॥ असो एवढा समाधी प्रचंड । भगवद्भक्तीनें लाभे अखंड । एवं वदले घेरंड । योगाचार्य मुनी ॥ ६६ ॥ ऐसिया पुरुषा श्रुती । भगवद्भक्त ह्मणती । अतिवर्णाश्रमी ख्याती । याचिया नांवें ॥ ३७ ॥ हाचि एक ब्रह्मनिष्ठ । हाचि ब्रह्मविद्वारिष्ट । जीवन्मुक्त-ही हाचि वसिष्ठ । बोलिले कीरू ॥ ६८ ॥ हा कृतकृत्य ह्मणोन । शा-स्त्राचें नाहीं या प्रयोजन । पूर्वोक्तसाधनेंकरून । सिद्ध जो झाला ॥ ६९ ॥ श्लोक अथवा श्लोकार्धानें । जया ब्रह्मज्ञान होणें । तो तृप्त शास्त्रप्रयोजनें । मोक्षधर्मवचन यापरी ॥ ४७० ॥ ऐसा क्षीणशास्त्रप्रयो-जन । जरी जाहला संपन्न । तरी भगवद्भक्ती प्रमाण । आहेचि तया ॥ ७१ ॥ जीवन्मुक्तासी भेदभक्ती । नाहीं ही अद्वैतसिध्युक्ती । एरव्हीं अभेदभगवद्भक्ती । मुक्तांगीं राहे ॥ ७२ ॥

श्लोकः— **यस्य देवे परा भक्तिर्यथा देवे तथा गुरौ ॥**
**तस्यैते कथिताह्यर्थाः प्रकाशयन्ते महात्मनः ॥ १ ॥**

या श्रुतिवाक्येंकरून । सर्वावस्थांत भगवद्भजन । अखंड असावें उपपन्न । सिद्धान्तभूत ॥ ७३ ॥ पूर्वपूर्वभूमिगत भक्ती । आणावी उत्तरोत्तर भूमीवरुती । अन्यथा दुर्लभ जीवन्मुक्ती । बहुविघ्नप्राप्ती दृष्टदुःखें ॥७४॥ एवं काया वाचा मनें । भगवत्प्रियपात्र होणें । पूर्वाभ्यासें पावणें । भक्तीचि फळ ॥ ७५ ॥ मातें भजतां प्रेमें करून । मी बुद्धियोग दे त्यां-कारण । जेणें ते मज पावोन । मातेंचि भजती ॥ ७६ ॥ अनेकजन्म-संसिद्ध । यत्न न करितां प्रसिद्ध । पूर्वाभ्यासें हरिभक्तिशुद्ध । पावे हे विशद प्रभु वदले ॥ ७७ ॥ जरी पूर्वजन्म संस्कारें । अथवा कोणी अ-चिंत्यप्रकारें । स्वयें जो सिद्धत्व पावला बारे । तदर्थ शास्त्रारंभ नाहीं ॥ ७८ ॥ आकाशांतोनि फळ पडे । ते जेंवि करीं सांपडे । तैसी जया सिद्धता घडे । अचिंत्यहेतु ॥ ७९ ॥ तयाही परम सम्यक । भक्ति करणें अहैतुक । जो प्रभू गुरुत्वें ज्ञानदायक । चित्ता-कर्षक कृष्णत्वें ॥ ४८० ॥ साधनें करितां भक्तीविण । भगवत्कृपा अतिकाठिण । यास्तव मुमुक्षू आपण । भक्तीचि करिती ॥ ८१ ॥ पूर्व-भूमी सिद्धभक्ती । व्हावया उत्तरभूमिप्राप्ती । अखंड साधावी भगवद्भक्ती । अन्यथा, स्थिती न बाणे ॥ ८२ ॥ न साधेचि भगवत्कृपा । न होय भूमिभाव सोपा । जंव भगवत्प्रणय अमूपा । पावले नाहीं ॥ ८३ ॥ जीवन्मुक्ताप्रति जाणा । भक्तिफळाची नसे कल्पना । स्वभावसिद्ध स-माधाना । संप्राप्तचि तो ॥८४॥ अद्वेष्टृत्वादि जैसे । सद्गुण असती आ-पैसे । भगवद्भक्ती ही असे । मुक्ताआंगीं तेंवि ॥ ८५ ॥ हे सातवी भू-मी तुर्यगा । ब्रह्मविद्वरिष्ठ ब्रह्मरंगा । मुकोनि संयोगवियोगा । संप्राप्त जेथ ॥ ८६ ॥ आत्माराम जे मुनी । हरिगुणप्रेमेंकरूनी । अहैतुक प्रेमपणीं । डुल्लती सदा ॥८७॥ तो ज्ञानी तो जीवन्मुक्त । तो अंतर्निष्ठ तो भक्त । तो माझा आत्मा प्रेमभक्त । एवं भगवंत बोलिलें ॥ ८८ ॥ ऐसी अकृत्रिम भक्ती । नानास्थळीं यथामती । बोधिली शिष्टसंमती । तुष्टावे श्रीपती यास्तव ॥८९॥ राधिका भगवती श्रीकृष्ण कांत । गोपि-का सत्संगहृदयैकांत नेथ भक्तितत्व अनंत । ज्ञानेश्वरकृपें वसो ॥४९०॥ कोणी एक अकृत्रिम भक्तीचें हें वर्म । योगज्ञानादिविश्राम । भूमिका हे ॥ ९१ ॥ जाला वाचि भक्तू । ठावचि झाला पंथू । होऊनि ठेला एकांतू विश्वचि हे । ९२ ॥ ऐशाही स्वामिभृत्यसंबंधा । लागी उठती

श्रद्धा । तरी देवोचि नुसुधा । कामबीजे ॥ ९३ ॥ देव देऊळ परिवारू । कीजे कोरूनि डोंगरु । तैसा भक्तीचा व्यवहारू । कां न व्हावा ॥९४॥ इत्यादि अनुभवामृत—। वचनें सिद्धांतभूत । श्रीगुरू ज्ञानेश्वरतात । स्वानंदगत बोलिले ॥९५॥ 'पैं जे वानी श्यातुका । तेचि वेगळिये वाला एका । तैसा एकदेशिया व्यापका । सारिसा पाडू ' ॥ ९६ ॥ 'अमृताचिया सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी । तेचि दे अमृतलहरी । चुळी घेतलिया ' ॥ ९७ ॥ एवं गीताशास्त्रीचें कोड । प्रेमज्ञानरहस्यामृत सुगड । श्रीज्ञानेश्वरमाऊली उघड । करूनि पाजी ॥ ९८ ॥ ती प्रेमामृतोच्छिष्ट पुष्टी । होतां आत्मब्रह्मीं समतुष्टी । गुरुभक्तीवांचूनि गोष्टी । दुजी नाहीं ॥ ९९ ॥ नातरी माध्यान्हकाळीं । छाया न दिसे वेगळीं । असे पायातळीं । रिगोनिया ॥ ५०० ॥ तैसें ग्रासूनि दुसरें । स्वरूपीं स्वरूपाकारें । आपुलिथेपणें उरे । बोधू जो कां ॥ १ ॥ ते ऋण शेष वाचा इया । न फेडवेचि मरूनिया । ते पायां पडूनि मियां । सोडविले ॥ २ ॥ एवं तातोक्ती किती तरी । भक्तिसुखपंकजपरागसुंदरी । कृष्णरस रसत्वीं सुकरी । सुधा करी ज्या ॥ ३ ॥ श्रीएकनाथगोठी । आत्मसिद्धी देवोनि भेटी । तिये आत्मसिद्धिवरी उठी । सद्गुरूभजन ॥४॥ सत् तेंचि चिद् । चित् तेंचि आनंद । वस्तु नोहे त्रिविध । एकपद निजांगें ॥ ५ ॥ मजमध्यें रंगली चित्तवृत्ती । यालागीं विसरला गृहासक्ती । त्यासी गृहस्थाश्रमींच माझी प्राप्ती । निश्चयें जाण उद्धवा ॥ ६ ॥ पावावया भक्तिसुख । परब्रह्मीं प्रस्थान देख । ऐसें अभंगीं सम्यक । तुकाराम बोलिले ॥ ७ ॥ एवं श्रुती संताभिप्राय । हें गीतागत तत्व होय । परी लाभे श्रीज्ञानेश्वरगुरूमाय । स्मरतां प्रेमें ॥ ८ ॥ शोकमोहादि असुर । जे दुःखदाते अतिक्रूर । ज्ञानभक्तीकरानि समग्र । निवटिजे ते ॥ ९ ॥ येणें दुःखात्यंतनिवृत्ति । आणि अखंडानंदप्राप्ती । भक्तीसह जीवन्मुक्ती । उपदेशिली ॥ १० ॥ तीही माउली गीता । प्रेमपान्हा पाजी स्वसुता । ज्ञानेश्वरकृपात्वें आतां । मातेही फळली ॥ ११ ॥ जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे । अनवरत आनंदें । वर्षतिये ॥ १२ ॥ ही गीतासंगती फुलें । प्रेमसूत्रीं गुंफिलें । पादुका करुनी वाहिले । ज्ञानेश्वरचरणीं ॥ १३ ॥ आतां विशेष प्रत्यध्यायीं । जे जे असेल कांहीं । ते निरूपिजेल सर्वेही । गीतापदावतरणग्रंथीं ॥ १४ ॥ सखे ज्ञानेश्वर

मायमाउली । प्रेमें वंदिते पाऊलीं । करूनि करुणासाउली । जन्मजन्म निजपाउलीं ठेवी ॥ ५१५ ॥

हरिः ॐ तत्सत्श्रीसद्गुरूज्ञानेश्वरकृपाप्रसादेन ओवीछंदबद्धा यथाबुध्या यथाज्ञानेन सन्निर्मितेयं गोपीप्रिय भगवद्गीतासंगतिः श्रीमत्सद्गुरू-आदिनाथादिमुक्तांतसत्समन्वयरूपश्रीमन्मातृपितृश्रीगुरुदेवश्रीज्ञानेश्वरमाउलीचरणयोस्समर्पणमस्तु ।

॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु ॥

समाप्तेयं श्रीमद्भगवद्गीतासंगतिः





॥ श्रीमत्सद्गुरु सर्वत्र यशस्वी ज्ञानेश्वर साउली समर्थ. ॥

॥ श्री गुलाबरावमहाराजकृत. ॥

# ॥ अथ निदिध्यासनप्रकाशः ॥

॥ समास १ ला. ॥

दोहा.




ज्ञानेश्वरगुरुसुपद नमु संसारकुठार ॥
जें ध्यातां सप्रेम मानिं षडरिसमूहकुठार ॥१॥

चौपाइ.

तो परमार्थपटा अधिकारी । इहपरयुवतीविर्त्तिं अधिकारी ॥
जो हरिभक्त विरक्तोपरत । फिरला संकल्पाहुनि परत ॥ २ ॥
शमदमसमाधानभूतदय । श्रद्दधान गुरुविज्ञानोदय ॥
ऐसा प्रेमपूर्णशशिशिष्य । यद्हृदयीं करिती हरि लास्य ॥३॥
त्यातें बोधिति सद्गुरुवाणी । ठेवुनि शिरिं करुणामय पाणी ॥
झाले जरि भुवनत्रयिं मोठे । तरि सद्गुरुकरुणेविण खोटे ॥ ४ ॥

दोहा.

समन्वयें श्रवण करि मनन युक्तिअनुकूल ॥
निदिध्यासनहेतु गुरु वदति निरोधनमूल ॥ ५ ॥

## चौपाइ.

जे निगमकथित अज अविनाशी । यद्ज्ञानें जग कळत विनाशी ॥
ते गुरुनाथ हात सुतमाथां । धरुनि वदति जें अमृत अनाथा ॥६॥

## दोहा.

तदर्थ नानाप्रक्रिया सांगति श्रीगुरुराव ॥
ज्यांचें चिंतन सुघटवी शिष्यमनीं चिद्भाव ॥ ७ ॥

## चौपाइ.

श्वेताश्वतरोपनिषद्वाणी । नाडिभेद करुनी जो प्राणी ॥
जाय ऊर्ध्व अर्चिरादिमार्गीं । तो दृढब्रह्मविलोकविभागी ॥ ८ ॥
सकलसुजनमनशांति कराया । एक पुरे मांडूक्यचि राया ॥
पादचतुष्टयब्रह्मकथन तें । निवटित दुःख त्रिविध व्यथन तें ॥ ९ ॥
वाचक प्रणव वाच्य परमात्मा । जाणुनि तेंचि होय कर्मात्मा ॥
वाचकभावभावना चित्ता । वाच्य ब्रह्मसुख मिळत अवित्ता ॥१०॥
एक सौख्य चिन्मयपर आधी । व्यष्टिसमष्टिविभाग उपाधी ॥
तीहि अनादि भ्रांति अविनाशी । परि श्रुतिगत बोधकृत विनाशी ॥११॥

## दोहा.

अज्ञजनांप्रति भोग जशी ज्ञानिजना अपवर्ग ॥
मायारूप उपाधि ही जडचेतनसंवर्ग ॥ १२ ॥

## चौपाइ.

जीवन जेंवि अतरणा बुडवी । तरणा तीरपार परि उडवी ॥
तेंवि उपाधिहि अकद अबोधा । देत मुक्ति अक्षय सुबिबोधा ॥१३॥

## दोहा.

अज्ञ उपाधिमध्यगत राहति गुंतुनि फार ॥
करुनि ब्रह्मव्यतिरेक बुध जाणुनि तरति सुसार ॥ १४ ॥

## चौपाइ.

तरिपरतीरपार जरि कीजे । तरि उदरासि जलाश्रय दीजे ॥
तेंवि करण यदि ब्रह्मसमाधी । आश्रयिजे तरि प्रथम उपाधी ॥१५॥
नामरूप मायाकृत जाणें । घेउनि ब्रह्म उपासक होणें ॥
नाम वाच्य तें ब्रह्म ह्मणावें । वाचक नांव प्रणव गुणिं गावें ॥१६॥

### दोहा.

शुद्ध ब्रह्म उपाधिवशें व्यष्टिसमष्टी भेद ॥
पावुनि येत उपास्यपणा यापरि बोलत वेद ॥ १७ ॥
प्रथम इदंताभावबळें ब्रह्म उपासन होय ॥
पुढें 'अहं' ग्रह ब्रह्म असे ज्ञानपूर्ण सुखसोय ॥ १८ ॥

### ओंवी.

छांदोग्यगत सगुणोपासना । तेथ इदंता ममोपासना । तेची अहंग्रहरूप वासना । निर्गुणोपासनामय ॥ १९ ॥ यास्तव वाच्यवाचकसहित । चैतन्य चिंतणें उपाधिगत । मग उपाधित्यागें गुणरहित । स्थूलारुंधतीदृष्टांत येविषयीं ॥ २० ॥

### चौपाइ.

जे महावाक्यलक्ष्यपद पावति । ज्यांच्या हृदिं हरि निर्गुण भावति ॥
त्यां नलगे किमपीहि उपासन । जेंवि ज्ञानबळें निर्वासन ॥ २१ ॥
परि जे ऐकुनिही महावाक्य । जाणुं न शकती जीवपरऐक्य ॥
सोडु न शकति अनात्म उपाधी । त्यांस उपास्तिमुळेंचि समाधि ॥२२॥
यापरि वदति श्रुति मुनि नाना । अगुणोपासन हित सुजनानां ॥
ब्राह्मण तें प्रणवानें करिती । अन्य सुजन हरिनामें वरिती ॥ २३ ॥

### दोहा.

रामकृष्ण गोविंद हरि नाम आणि ॐकार ॥
एकरूप मुनि पाहुनि पावति सोहंकार ॥ २४ ॥
व्यष्टिसमष्टिवाचक शब्दमूल ॐकार ॥
त्यांत पदें हीं तीन परी अकार उकार मकार ॥ २५ ॥

### चौपाइ.

स्थूलरूप धरितां जें व्यष्टी । चित्तरूप गुणिं तेंचि समष्टी ॥
अथवा व्यक्तिजातिदृष्टांतीं । जाणुनि पाव परात्परशांती ॥ २६ ॥

### अभंग.

घनवस्तूचिया अंतरीं आकाश । मन आकाशास अंतर्बाह्य ॥ १ ॥
देहासी आकाश समष्टिस्वभाव । आकाशा सावेव चित्त तैसें ॥२॥
चित्तासी चैतन्य पाठींपोटीं आहे । प्रक्रियाही पाहे उत्तम कीं ॥३॥
ज्ञानेश्वर मायबाप कृपावंत । होतां भगवत निजरूपें ॥ २७ ॥

## ओवी.

नामरूप वाच्यपक्ष । नामें घेऊनि शब्दलक्ष्य । रूपीं पाहोनि अर्थलक्ष्य । वाच्यपक्ष सांडावा ॥ २८ ॥ ऐसें करितां नामस्मरण । स्मारका फावे ब्रह्मपण । आतां प्रक्रिया नवीन । दुसरी बोलेन ते ऐकें ॥ २९ ॥

## चौपाइ.

रामकृष्ण हरि सद्गद वाणी । आधिं वदें जोडुनि द्वयपाणी ॥
रामकृष्ण गोविंद जिभेंसी । जडतां ऐक्य सुचित्तविभेसी ॥ ३० ॥

## दोहा.

रामकृष्ण गोविंद हरि वैखरि आधीं होय ॥
श्रवण सतत सुधारणे तैलधारसम सोय ॥ ३१ ॥

## चौपाइ.

वैखरि श्रवण स्नेहसमधारा । पवनमध्यगत वाह सुधारा ॥
वैखरि नाम अखंडित चाले । नाम वदत पवनहि मग हाले ॥३२॥
पवननाम सोहं जधिं बोले । श्रवण मनचि तैं होउनि डोले ॥
पुढति नाम मन घेउनि राही । मनचि दृष्टिसाक्षिमत पाहीं ॥३३॥
पुनर्नाम केवळ निजसत्ता । तेंचि मिळविं परब्राह्मिं अवित्ता ॥
नाम स्पष्ट वैखरि मनिं आणा । पवननाम मध्यमा सुजाणा ॥३४॥
नाम मनोमय ते पश्यंती । शेष परा दायक निजशांती ॥
एवं वाणिचतुष्कें नाम । जपतां मिळतो आत्माराम ॥ ३५ ॥

## दोहा.

नाम वाच्यगत सांडुनी सत्तालक्ष्य सुजाण ॥
ब्रह्मरूप साधक सदा सोडुनि तनुअभिमान ॥ ३६ ॥

## चौपाइ.

यापरि नाम सकळ अधिकारी । परि व्हावा संसृतिअधिकारी ॥
पाहुनि एवंविध व्यतिरेका । अन्वय चिंतन सगुण हरी कां ॥ ३७ ॥
कनक त्यजुनि कटकाप्रति कोणी । बोलु न शकाते कदापिहि वाणी ॥
तेंविचि जाणुनि सुख चैतन्य । अन्वय पाहुनि विश्व अनन्य ॥३८॥
सगुणरूप अति प्रीति भजावें । अन्वय चिदानंद उमजावें ॥
यावरही जरि कोणि सशंक । तो मजहुनि अति जडमति रंक ॥३९॥

## दोहा.

एवंविध हरिनामगत ब्रह्मभाव सुखसार ॥
सांगुनि श्रुतिगत सांगु पुढें ब्रह्मरूप ॐकार ॥ ४० ॥
ज्ञानेश्वर गुरु माउली चरणप्रेम अविनाश ॥
ज्ञानेश्वरजपवन्हिबळें सहज जळे भवपाश ॥ ४१ ॥

हरिः ॐ 'तत्सत' इति श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे निदिध्यासनंप्रकाशे नानाछंदबद्धे हरिनामप्रक्रिययैव ब्रह्मभावनिरूपणं प्रथमः समासः ॥

॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥

---

॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

## समास २ रा.

## दोहा.

श्रीज्ञानेश्वर सद्गुरु चिदानंद निजरूप ॥
जें अन्वय व्यतिरेक तया पाहाति श्रुतिविद भूप ॥१॥

## चौपाइ.

तें निजहृदयिं आठवुनि आतां । पुढत पुढति ठेवुनि पदिं माथा॥
पूर्वाध्यायांतर्थविवेका । जाणुनि ब्रह्म पावले जे कां ॥ २ ॥
ते अतिधन्य विधिजनक भक्त । आत्मप्रीतिमय हरि अनुरक्त ॥
अन्य तथाविध प्रणवोपासक । लक्ष्यपक्षिं सच्चित्सुखवासक ॥ ३ ॥
प्रणवाक्षर संमति व्यतिरेका । करिति तीहि वदुं रीति सुरेखा ॥
शद्ब अर्थ संबंधि सदाचे । भिन्न अभिन्न भासति ही साचे ॥ ४ ॥
विषय वृत्ति भासति परि भिन्न । पराचिंतन करितां चिदभिन्न ॥
परि तो भेद उपाधिक जाणे । दृष्टिसृष्टिनें वदति शहाणे ॥ ५ ॥

## अभंग.

वन्हिशद्ब आणि वन्हीचा अभेद । व्यर्थ ऐसा वाद बोलणें कीं ॥१॥

शद्ब उच्चारितां जळावें तें तोंड । एवंविध भांड बोलताती ॥ २ ॥
पारि ज्ञानवृत्तीं दिसतो अभेद । दोहोंचाही बोध चिद्रूपत्वें ॥ ३ ॥
वन्हीचें ही ज्ञान वन्हिशद्बज्ञान । ज्ञानज्ञेयपण शद्बअर्थी ॥ ४ ॥
विशेष पाहिजे समाधान चित्तीं । श्रीगीतासंगति पहा तरी ॥ ५ ॥
अनुभवें जरी पाहिजेल तृप्ती । ज्ञानेश्वर चित्तीं आठवा हो ॥ ६ ॥

चौपाइ.

यास्तव चिंतनिं वाच्यवाचकां । एक करुनि कारि परव्यतिरेका ॥
ज्ञेयरूप जड त्यजुनि उपाधी । अनुच्चार्य अर्थी सुसमाधी ॥ ७ ॥
शद्बअर्थजोडी अनुवृत्ती । या तिहिंची परमार्थि निवृत्ती ॥
घेउनि कवणविधी समुपाधी । केंवि चिंतिजे निजअनुपाधी ॥ ८ ॥
उत्तर श्रवण करीं तनुजा तें । बोलति मांसमयी तनु जातें ॥
तें अर्पुनि जडजीत कलेवर । यदपेक्षें युवतीपातिदेवर ॥ ९ ॥
भौतिक सुकृत विकृतजनि रेतज । योनिज निजभ्रमरूप अरे त्यज ॥
स्थूलशरीर जाण हें व्यष्टी । तन्मय श्रेष्ट विराट समष्टी ॥ १० ॥
शिर कर नयन सहस्र जयाचे । सहस्र पद सांगति श्रुति ज्याचे ॥
स्थूल विश्व अभिमानि यथा कीं । वैश्वानर वैराज तथा कीं ॥ ११ ॥
ऐक्य करुनियां व्यष्टिसमष्टी । वृत्ति अकार मातृका पुष्टी ॥
ध्यान धरुनि चैतन्य तयाचे । सोडि सर्व भवभाव भयाचे ॥१२॥
पुढति उकार मातृका बरवी । ध्यानें स्थूल तींत हें मुरवी ॥
विश्व व्यष्टि अभिमान प्रतापी । तोहि शीघ्र तैजसी प्रविलापी ॥१३॥

ओंवी.

स्थूलभुक् विश्व वैश्वानर । अकारें दोन्ही अहंकार । सृष्टिसहित चिद्राकार । करुनि तैजसी प्रविलापी ॥ १४ ॥

दोहा.

लिंगशरीर व्यष्टि मन कांचनगर्भ समष्टी ॥
भोक्ता तैजस भोगही सुप्रविविक्त वितुष्टी ॥ १५ ॥
वर्ण उकार मातृका चिंतुनि सहित अभेद ॥
होय मकारीं विलापनें सहज लिंगतनुभेद ॥ १६ ॥

चौपाइ.

व्यष्टिदेह कारण अभिमानी । प्राज्ञ समष्टि ईश अभिमानी ॥

भोक्ता प्राज्ञ भोग आनद । परि व्यष्टि अज्ञान प्रमंद ॥
जगद्योनि सर्वांतर्यामी । हा चिन्मय सर्वज्ञहि स्वामी ॥ १७ ॥
ईश्वर तृप्त सर्वसुखघन कीं । व्याप्तिस्तव संसृतिसंघन कीं ॥ १८॥
यास्तव ईश प्राज्ञ या दोहीं । एक करुनि परमामृत दोहीं ॥
तूर्यपाद अक्षय ब्रह्माचा । तेथ प्रलाप करि सकलांचा ॥ १९ ॥
होउनि साक्षिस्वरूप रहावें । अन्वय मग ॐकारिं पहावें ॥
सांडुनि वाच्यपक्ष मग शेखीं । एकचि चिद्घन पाहिं अनेकीं ॥२०॥
व्यतिरेकें त्यजिलें जें कांहीं । ज्ञान पुढति ब्रह्मीं तें नाहीं ॥
व्यतिरेकें कारण निर्धारीं । तोंचि कार्यरूपहि अविकारी ॥ २१ ॥
याविधि अन्वयिं ब्रह्मनित्यता । जांगुनि वारिं विभोगचैत्यता ॥
द्वैताद्वैतभाव मग सोडीं । मांडूक्योपनिषद्व्रत गोडी ॥ २२ ॥
एवंविध जाणुनि सन्नंदन । करि मायामयभाव निकंदन ॥
तो अनुभव एवंविध आहे । स्थूल देह मनमय लवलाहे ॥ २३ ॥
कांचनगर्भस्वरूप विराट्ट । एवंविध श्रुतिसम्मति पाट्ट ॥
परि तो समष्टि म्हणुनि उपास्य । मुनि वाणी एवं करि लास्य ॥२४॥

## दोहा.

शून्यरूप मन पाहुनी शून्यज्ञानस्वरुप ॥
जाणुनि जीव ईश करिं एकभाव चिद्रूप ॥ २५ ॥
स्थूल न्यून अतिव्यष्टि असे तदीय समष्टि विराज ॥
दोन्हिहि व्यापी व्यष्टि मन ध्येय ध्यानगुणि साज ॥२६॥

## ओंवी.

कांचनगर्भ चित्तसमष्टी । या दोहींस व्यापी प्राज्ञ व्यष्टी । परी उपास्योपासक पुष्टी । वृत्ती तोंवरी विलसतु ॥ २७ ॥ एकचि आनंद सकळां । येथ उत्थानानुमिति सुषुप्तिकळा । ज्ञान तरी ती लीळा । परेशाची ॥ २८ ॥ येथ उपास्यता ह्मणोनि सत्वगुण । शून्य नोहे हिरण्यगर्भ आपण । उपासकतागुण भिन्न । यालागीं शून्य मन हों शके ॥ २९ ॥ स्थूलदेह मनोमय । तो कवणिया गुणें होय । विराटदेहही मनोमय । परि उपास्य तया होय सत्वस्थिती ॥ ३० ॥ मन लिंगतनु शून्यमय । परि शून्य जडतमरूप होय । कनकगर्भी नाहीं तम सोय । यालागीं सत्वोदय शांतिरूप ॥ ३१ ॥ शून्य नाहीं जडशून्य । शून्यासि

व्यापिलें चैतन्य । येणें अखंड धन्य । परमेश्वरू ॥३२॥ जीवाची सांपडली लक्ष्यता । वृत्त्या ईश वाच्यपक्षता । गेली यास्तव साक्षिदक्षता । अपरोक्षता संचिली ॥ ३३ ॥ हें मांडूक्योपनिषद्ज्ञान । श्रीगौडपादाचार्य आपण । कारिकागणीं विस्तरण । बोलिले स्वयें ॥ ३४ ॥ त्यांतील निदिध्यासोपयोगी । जियेचा आश्रय करिती योगी । तीच प्रक्रिया बोधप्रसंगीं । ध्यानालागीं बोलिली ॥ ३५ ॥ इदंता सहज उपेक्ष्य । 'अहं'वृत्तीचा वाच्यपक्ष । त्यागोनि जाणिजे चिल्लक्ष्य । येणेंहि अपरोक्ष फावे ॥ ३६ ॥

दोहा.

हीहि प्रक्रिया पुढति करूं निरूपण निजकृति साज ॥
द्याया अति अवधान असो सावध श्रोतृसमाज ॥३७॥
ज्ञानेश्वरगुरुपाउलें पावन परम अखंड ॥
जन्मजन्म ते हृदयिं धरूं मोडुनि षड्रिपुभंड ॥ ३८ ॥

'हरिः ॐ तत्सत्' इति श्रीनिदिध्यासनप्रकाशे, श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे, नानाछंदबद्धे, प्रणवोपासनाप्रक्रियाभेदनिरूपणंनाम द्वितीयः समासः ॥

॥ श्री सद्गुरुज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥

---

॥ श्री ज्ञानेश्वरमाउली समर्थ. ॥

## समास ३ रा.

दोहा.

श्रीज्ञानेश्वरचरणरजीं प्रेमसदव्यभिचार ॥
तेणें निवटत सहज मग मायाकृत अभिचार ॥ १ ॥

चौपाइ

ते अधुना कथनार्ह समाजीं । यन्मय सुरमुनिमन महिमा जी ॥
अधिगतनिगमरहस्यविचारी । साधनकृत संप्राप्तहि चारी ॥ २ ॥

सद्विवेक संसृतिभयहंता । आधि उपेक्षुनि भास्य इदंता ॥
वारुनि मग विपरीत अहंता । ऐक्य करी निजगत भगवंता ॥ ३ ॥
जो श्रुतिकथितोत्तम अधिकारी । व्यतिरेकान्वयब्रह्मविचारी ॥
त्याप्रति न लगति फार उपाधी । उण जितुके तितुक्यांत समाधी ॥४॥
प्रथम रज्जुफणिपुच्छनिराकृति । नंतर जाइल सकलहि आकृति ॥
एवंविधविधि न भ्रमनाशा । रज्जुबोध कारण फणिनाशा ॥ ५ ॥
यापरि न बहु उपाधिअपेक्षा । एक पुरे परसंविति शिक्षा ॥
अधिष्ठानचैतन्यनिरीक्षण । गुरुहरिभक्ति करूनि करि रक्षण ॥६॥

दोहा.

ब्रह्म सत्य परमार्थतः जग सद्व्यवहृतिभास ॥
स्वप्नरज्जुफणिशुक्तिरजतमृगजल हा प्रतिभास ॥ ६ ॥

चौपाइ.

जे इतिविध सत्तात्रयवादी । ते स्वीकारिति बहुत उपाधी ॥
ब्रह्मज्ञाननाश्य व्यवहारू । ज्ञानविना प्रतिभापरिहारू ॥ ७ ॥

दोहा.

व्यावहारिकनिवृत्तये चितिवैशेष्यज्ञान ॥
प्रतिभास निवृत्त करि सामान्याधिष्ठान ॥ ८ ॥

चौपाइ.

ब्रह्मनाश कालत्रयिं नाहीं । एवं तत्र अभेदचि पाहीं ॥
परि जें दृष्टिसृष्टि सिद्धांती । तें उत्तम परमार्थप्रांती ॥ ९ ॥
तन्मयसत्ता दोन अनादि । ब्रह्म नित्य प्रतिभास उपाधी ॥
ज्या बहुविध वादिकृत शंका । स्वप्न दृश्य हरि तादियकलंका ॥१०॥

ओंवी.

अज्ञानसत्ता जगाची । कल्पांतीं न घडे साची । अनुमित सत्ता चेतनाची । निद्रेंतही ज्ञात कीं ॥ ११ ॥ जाग्रत्स्वप्न परस्पर । प्रहारेंचि हानिकर । नूतन प्रपंच निर्धार । नित्य उपजे ॥ १२ ॥

अभंग.

काल ती गर्भिणी आज स्त्रिये बाळ । पाहतों तत्काळ उठोनिया ॥१॥
बालत्वीं तारुण्यीं वृद्धपणीं तनू । भिन्न भिन्न भानू पावे सदा ॥ २॥
निद्रेंत हा खेळ तैसाचि मरणीं । बोलले तरणी कृष्णदेव ॥ ३ ॥

ज्ञानेश्वरकृपें कळला तदर्थ । पूर्ण परमार्थ कान्तवाक्य ॥ १३ ॥

श्लोक.

देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा ॥
तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १४ ॥

अभंग.

स्थूल तो दृष्टांत लिंग तो सिद्धांत । दृष्टिसृष्टीं कांत बोलिले ती ॥१॥
कौमार यौवन जरा याचि देहीं । दिसताति पाही जयापरी ॥२॥
तैसे लिंगदेहा देहान्तर प्राप्ती । मोह न पावती ज्ञानी येथें ॥ ३ ॥
अथवा स्थूळींच देहांतर भाव । होतसे संभव भूमिभेदें ॥ ४ ॥
बीजजागृदादि अज्ञानभूमिका । बोलिल्या सुरेखा वासिष्टांत ॥ ५ ॥
त्यांतीलचि भेद पुनर्जन्म आहे । विरुद्ध ते नोहे स्थूळतया ॥ ६ ॥
पारि ज्ञानियाही चित्ताचीच सृष्टी । मोक्षधर्मीं गोष्टी ऐसी केली ॥६॥
ज्ञानेश्वरतात अमृतानुभवीं । सांगती बरवी हेचि गोठी ॥ १५ ॥

ओंवी.

कां दाटला डोळा डोळिया । डोळाचि तारा होवूनिया । स्फुरे चोख ह्मणोनिया । विस्मो नाहीं ॥ १६ ॥ तैसा जाणणियाचा व्यवहारू । जेथें माखला सुमरू । तेथें आणिजे पुरू । अज्ञानाचा ॥ १७ ॥ यया नांव अज्ञान ऐसें । तरी ज्ञान होवावे तें कैसें । एवं अमृतानुभवमिषें । बोलिले तात ॥ १८ ॥

दोहा.

परी दृष्टिशद्वार्थ असे वृत्युपहित संवित् ॥
दृष्टिसृष्टिव्यतिरिक्त स्वयें निगमगम्य परचित् ॥ १९ ॥

ओवी.

आणि अविद्येचे आडवे । भुंजीत जीवपणाचे भवे । तया चैतन्याच्या या पदें स्वभावे । तातोक्ति जाणावे याचि परी ॥ २० ॥

दोहा.

जीव ईश शुचिचेतन जीवेश्वरगतभेद ॥
अविद्या चितियोग हे षट्क अनादि सुवेद ॥ २१ ॥

चौपाइ.

या पारि बोलति मुनि शुचिबुद्धी । दृष्टिसृष्टिवचनास विरोधि ॥

येइल या परि न करी संशय । स्थायिरूप हा कारणसंचय ॥ २२ ॥
कार्यसृष्टि पळपळ नूतन कीं । चितिसत्ते स्थायी कारण कीं ॥
ह्मणुनि बौद्धमतसाम्य न कांहीं । क्षणिक विश्व परि ब्रह्म सदाही ॥ २३ ॥

## दोहा.

बौद्धमतीं जग क्षणिकभ्रम आणिक शून्यस्वभाव ॥
अधिष्ठानविन श्रौतमतीं नाहिं तथाविध भाव ॥ २४ ॥

## ओंवी.

अन्वय या शब्देंकरून । श्रीकृष्ण स्थायी सांगती कारण । अश्वत्थ या शब्देंकरून । कार्य सृष्टिपण अनित्यता ॥ २५ ॥ ध्रुवा द्यौरित्यादि श्रुती । जगत्बुद्धी बोधकृती । स्वप्नकालवरी स्वप्नप्राप्ती । जगद्वाप्ती तैसीच ॥ २६ ॥ भोक्तृभोग्यादिभेद । गुरुशिष्यादि प्रसिद्ध । स्वप्नवत् उपपत्ति शुद्ध । सांपडे कीरू ॥ २७ ॥ परी वेदवाक्यमीमांसा । ते सम स्वप्नवाक्यमीमांसा । या शंकेचा वळसा । न घडे कदा ॥ २८ ॥ स्वप्नवाक्यें स्वप्नप्राप्ती । तेणें कदा नोहे जागृती । वेदवाक्यें ब्रह्मप्राप्ती । यास्तव दोषापत्ती नसे ॥ २९ ॥ स्वप्नमार्जी ओसणतां । जागृतीतूंनि हांक मारितां । जागा होय तेंवि तत्वतां । श्रुतिवाक्यता ब्रह्म बोधी ॥ ३० ॥ अथवा स्वप्नवाक्येंकरून । वृत्तींत उमटे जागृतज्ञान । मी स्वप्नांत आहे कीं या संशयेंकरून । जागा होय तंव जागृती ॥ ३१ ॥ तेंवि महावाक्यश्रुती । तेणें उमटे चिद्वृत्ति । मिथ्या मानितां अहंकृती । ब्रह्मजागृती स्वयें प्राप्त ॥ ३२ स्वप्नीं राव आराधितां । स्वप्नींचि फळ मिळे तत्वतां । तेंवि कल्पित ईशता । फलदात्री तत्वतां स्वप्नसम ॥ ३३ ॥ स्थायी जरी कां कारण । तरी केंवि निवृत्त करील ज्ञान । परी कालत्रयाबाध्य कारण । ऐसा स्थायित्वार्थ नोहे ॥ ३४ ॥ ज्ञान नसतां अनादि अनंत । अनादि परी ज्ञानें नाशे समस्त । ह्मणूनि स्थायित्वशब्दार्थ । यावत्कालता ॥ ३५ ॥ कारणसहित संसारतरू । असंगशस्त्रें तोडिजे कीरु । या परी करुणाकरू । बोलिले पार्था ॥ ३६ ॥

## श्लोक.

नरूपमस्येह तथोपलभ्यते । नांतो न चादिर्नच संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूल । मसंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३७ ॥

ओंवी.

मृत्तिका वेगळी करितां । घटासी रूप नाहीं सर्वथा । वाचारंभण-विकारता । मात्र उगी ॥ ३८ ॥ तेंवि अज्ञानिया अनादि अनंत । ज्ञानिया न आदि न अंत । आणि न हा संप्रतिष्ठित । संसारतरू ॥ ३९ ॥ अश्वत्थ ह्मणजे कार्यतया अनित्य । सूविरूढमूल ह्मणजे यावत्कालनित्य । यासी साच मानिती व्रात्य । परि हा सत्यप्रतिभासू ॥ ४० ॥ असंग-पुरुषाचें ज्ञान । तें ह्मणावें असंगज्ञान । असंगोह्ययम् बृहदारण्य । वचनही ऐसे ॥ ४१ ॥ एवं असंगज्ञानशस्त्रेंकरुनी । समूल संसारतरु छेदुनी । पुनरावृत्तिरहित स्थानीं । मिळिजे पार्था ॥ ४२ ॥ अथवा असंगशस्त्र ह्मणजे विरक्ती । ऐसाही कोणी अर्थ करिती । लक्षुनी पुढीलश्लोकोक्ती । परी श्रीपत्यभिप्राय हा नोहे ॥ ४३ ॥ कारणसहित तरू छेदावा । ऐसें बोलणें लागले देवा । आणि विरक्ती तंव उरवी सत्वा । यास्तव कारणभावा ती निवटिना ॥ ४४ ॥ ह्मणवूनि असंग-ज्ञान । येणं कारणसहित तरूच्छेदन । पुढील श्लोकाचें एवं प्रयोजन । तेही संपूर्ण ऐकावें ॥ ४५ ॥ प्रथम मोक्षांश दुःखनिवृत्ती । ती निरूपण प्रस्तुतश्लोकोक्ती । आणि अखंडपरमानंदप्राप्ती । मोक्षद्वितीयांशस्थिती पुढील श्लोकीं ॥ ४६ ॥

श्लोक.

ततःपदं तत्परिमार्गितव्यं । यस्मिन् गता न निवर्तंति भूयः ॥
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये । यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४७ ॥

ओंवी.

ऐसा असंगशस्त्रें छेदिलिया तरू । पुढें धरावा तत्पदाधारू । जेथ पादलिया संसारू । न मिळे पुन्हा ॥ ४८ ॥ जयाचिया सत्ता । ही प्रवृत्ति अनादि प्रसृता । प्रवृत्तीतें प्रकृती ह्मणतां । तरी आदिपुरुष तत्वतां हाचि कीं ॥ ४९ ॥ ऐसी आदिपुरुषप्राप्ती । झालिया नाहीं पुनरावृत्ती । तयाचें ज्ञान तें निश्चिती । होय केंवी ॥ ५० ॥ तरी ममैवांश इत्यादि-श्लोकेंकरून । मन इंद्रिय सह करी शरीरग्रहण । त्यातें ज्ञानी पाहती आपण । न पाहो शकती कृतात्मे ॥ ५१ ॥ ममैवांश येथुनी निर्धारी । पश्यंतिज्ञानचक्षुषा येथवरी । त्वंपदविवेक साचारी । बोलिला यत्नकारी योगिया ॥ ५२ ॥

श्लोक.

सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो । मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनंच ॥
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो । वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ ५३ ॥

ओंवी.

ज्ञान ह्मणजे जागृती । स्मृती ह्मणजे स्वप्न स्थिती । जी भावितस्मर्तव्या योगी ह्मणती । आणि अपोहन सुषुप्ती बोलिजे ॥ ५४ ॥ ऐसे अवस्थात्रय । मी साक्षी ह्मणूनी होय । अथवा अन्य अर्थ सोय । आश्रयिजे ॥ ५५ ॥ अपोहन ह्मणजे तमोगुण । स्मृती ह्मणजे रजोगुण । ज्ञान ह्मणजे सत्वगुण । या त्रिगुणा चालन पैं माझे ॥ ५६ ॥ किंवा अपोहन ह्मणजे अज्ञान । स्मृती ह्मणजे जगद्भान । ज्ञान ह्मणजे ब्रह्मज्ञान । या सर्वां अधिष्टान मी एक ॥ ५७ ॥ अविद्याकाळीं सामान्य चिती । ज्ञानीं विशेषा अधिष्टानप्रतीती । ऐसा मी श्रीपती । सर्वचित्तीं तिष्टतु ॥ ५८ ॥ **सर्वस्यचाहं हृदि संनिविष्टः** येणें । रहस्यें केले बोलणें । कीं तत्पदविवेक करणें । निजहृदयींच ॥ ५९ ॥ त्वंपदविवेक अपरोक्ष । तत्पदविवेक परोक्ष । ऐसें बोलणें वाटे विपक्ष । भगवंतातें ॥ ६० ॥ ह्मणवुनी त्वंपदविवेक हृदयीं कीजे । मी देह इत्यादि जीववाच्य त्यजिजे । तैसा तत्पदविवेक अपरोक्ष कीजे । हृदयीं आपुल्या ॥ ६१ ॥ सुषुप्ती संधींत जे प्रेरण । सर्वांचिया हृदयीं ह्मणून । ईश्वर चैतन्य जाण । सांपडे करीं ॥ ६२ ॥ इदंतावच्छिन्न जगत । जीवा भूता प्रकृती प्रसूत । येणें जगत् जीवकल्पित । दृष्टिसृष्टिसिद्धांत बोलिला ॥ ६३ ॥

श्लोक.

स्वप्न संभ्रम संकल्प स्वानुभूतिपरंपरा ॥
प्रमाणान्यत्र मुख्यानि संबोधाय प्रदीपवत् ॥ ६४ ॥

ओंवी.

स्मृति भ्रान्ति संकल्प स्वप्न । आणि स्वानुभवधारा संपूर्ण । राहती अहंवृत्तीधरून । ही मुख्य प्रमाणें ह्मणून । दृष्टिसृष्टिवादी ॥ ६५ ॥ दीपासारखे प्रकाशक । ज्ञानासी येथूनी आगळीक । एवं वसिष्टमुनी सम्यक । बृहद्वासिष्टीं बोलिले ॥ ६६ ॥ अतो जगत् जीवकल्पित । तयाचाचि हाचि अर्थ । सर्वाहंता जीवगत । आणि ईश्वरगत प्रेरकता ॥ ६७ ॥ अहंतापेक्षेंकरून । सामीप्यसंबंधीं त्वंपण । उद्देशरहितबोधकीं जाण ।

इदंपण स्वभावें ॥ ६८ ॥ तरी ती उपेक्षुनी इदंता । निरसिजे देहादि-अहंता । हा त्वंपदविवेक तत्वतां । सिद्धांतगत ॥ ६९ ॥ आणि वृत्ति-संध्यादि-स्थानीं । उमटे जे प्रेरकपणीं । तेथील प्रेरकत्वादि-वाच्य सांडुनी । साक्षि-ब्रह्म-मिळणी तत्पद विवेकू ॥७०॥ ऐसा त्वंपद तत्पद विवेक । पूर्ण जाहलिया देख । असिपदार्थ दोन्ही एक । **क्षेत्रज्ञं चापि मांविद्धि** हा श्लोक येविषयीं॥ ७१ ॥ चैतन्यासी वाच्यलक्ष्यता । दावूनि सांडिजे वाच्यपक्षता । लक्ष्यग्रहण कीजे यथार्थता । तोही श्लोक आतां उपपादूं ॥ ७२ ॥

**श्लोक.**

**उपद्रष्टानुमंताच भर्ता भोक्ता महेश्वरः ।**
**परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः ॥ ७३॥**

**ओंवी.**

तरी ऐकें गा पार्था । या देहींच तत्वतां । जीव ईश आणि शुद्धता । मिळेल तूतें ॥ ७४ ॥ घटाकाश महाकाश जलाकाश । घटींच मिळती सावकाश । तेंवि देहींच ब्रह्मादि तिहींस । पाहणें कीरू ॥ ७५ ॥ समीपत्वें वृत्तिदृष्टा । हे ब्रह्मसंविति स्पष्टा । साक्षित्वें सुभटा । जाणिजे कीं ॥ ७६ ॥ आणि धरूनि अहंता । जैसा यत्न कीजे पंडुसुता । तैसा संध्यादिस्थ प्रेरक फलदाता । यालागीं अनुमंता बोलिजे ॥ ७७ ॥ भोक्ता ह्मणिजे जीव । भर्ता ह्मणिजे देव । अथवा दुसराही भाव जाणिजे येथ ॥ ७८ ॥ उपद्रष्टा अनुमंता । भर्ता आणि भोक्ता । इत्यादि धर्म तत्वतां । जीवरूपता ब्रह्मासी ॥ ७९ ॥ आणि अपिशब्देंकरून । परमात्माही यासीच बोलणें । **अस्मिन्**शब्दें जाण । याचि देहीं ॥ ८० ॥ कोणत्याही रज्जुखंडज्ञानें । समग्रसर्पाची निवृत्ति होणें । तेंवि स्थूलादितूनी जाणणें । कोणत्याही देहीं अधिष्टान ॥ ८१ ॥ नलगे दूरदेशस्थिती । हीं **अस्मिन्**शब्दार्थानुभूति । किंचित् विशद संविति । दाविजेल ॥८२॥ उपद्रष्टृत्वें ब्रह्म । भोक्ता जीव परम । भर्ता अनुमंता पुरुषोत्तम । महेश्वर परमात्मा ॥ ८३ ॥ तोचि पुरुष पर । ह्मणजे वाच्यधर्म सांडुनी साचार । लक्ष्यरूपें ब्रह्मजीवेश्वर । सामानाधिकरण्यें ॥ ८४ ॥ निर्गुण ह्मणजे ब्रह्मस्थिती । गुणभोक्तृ ह्मणजे जीवेशसंपत्ती । वाच्य गुणभोक्तृता सांडुनी लक्ष्यस्थिती । ज्ञेयनिश्चिती मुख्यतया ॥ ८५ ॥

### श्लोक.

ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ॥
अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ ८६ ॥

जें कार्यरूप नोहे अनित्य। नोहे कारण यावत्कालनित्य। अनादिमत् ह्मणिजे कालत्रयाबाध्य सत्य। परब्रह्मशब्दार्थें ओळखी ॥८७॥ ब्रह्म जे बोलिलें वेदांती । तदन्वय अनादिमत्शब्दार्थी । ह्मणूनि यथार्थ परमार्थी । अर्थ ऐसा ॥ ८८ ॥ ऐसें जाणूनि हृदयगत । सहज होइजे अमृत । पुनरावृत्तिरहित । आनंदरूप ॥ ८९ ॥ एवं तत्वमसि वाक्यार्थ । नानाश्लोकीं गीतेआंत । अर्जुनातें बोलिले कांत । तो ज्ञानेश्वरतातकृपें उघडिला ॥ ९० ॥ तत्वमसि ऐसें वचन । आणि अहंब्रह्मास्मि मिळोन । पुराणादिकांत सोहंवचन । सर्ववर्णाकारण बोलिलें ॥ ९१ ॥ ह्मणोनि 'सोहं'-शब्दार्थ । गीताश्लोकीं अखंडित । सेवावया उचित । सर्ववर्णा ॥ ९२ ॥ एवं अधिष्ठानज्ञानेंकरून । प्रपंचनिवृत्ति संपूर्ण । मग ब्रह्मभूत जाहलिया आपण । भजिजे भगवान् अन्वयें ॥ ९३ ॥

### श्लोक.

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ॥
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ९४ ॥

### ओवी.

ब्रह्मभूत प्रसन्न । यापदें बोलिलें आत्मज्ञान। **न शोचति न कांक्षति** या पदेंकरून । जगाचें नाहींपण व्यतिरेकीं ॥ ९५॥ **समः सर्वेषु भूतेषु** पदीं इहीं । अन्वय सर्वत्र बोलिला पाही । आणि **मद्भक्तिं लभते परां** शब्दीं इहीं । हरिभजनग्वाही बोलिली ॥ ९६ ॥ ईश्वरा जरी जीवकल्पितता । तरी अपेक्षेंकरूनि तत्वतां । ह्मणूनि लक्ष्यसमाधींतूनि वृत्ति उठतां । भजनें तत्वता ती दृढ कीजे ॥ ९७ ॥ एवं दृष्टिसृष्टिवाद भगवद्भक्ती । समाधी परमानुभूती । या अध्यायीं निरूपणरीती । बोलिली आहे ॥ ९८ ॥

### दोहा.

सिद्धसाधकांकारणें संधिसमाधि यथार्थ ॥
पुढिल समासीं प्रक्रिया भावपूर्ण परमार्थ ॥ ९९ ॥
ज्ञानेश्वरकरुणार्णव तत्पदिं प्रेम अगाध ॥

ठेवुनि सुंदर ज्ञानबळें करूं सुस्मृतिभयबाध ॥ १०० ॥

हरि:ॐतत्सत्श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे नानाछंदबद्धे निदिध्यासनप्रकाशे गीतावासिष्टादिप्रमाणे दृष्टिसृष्टिवादपूर्वक शुद्धानुभवरहस्य परमप्रेमलक्षणा भक्तैक्यवर्णनन्नाम तृतीयः समासः ॥

॥ श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥

॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

## समास ४ था.

### दोहा.

ज्ञानेश्वरपद सलिलरुहद्वंद्व अमोद अपार ॥
सेवुनि मनोद्विरेफ तूं हो मायातारिपार ॥ १ ॥

### चौपाइ.

शृणु सुनु वचन मदीय प्रेमें । मुनिगणवृत्ति यथापारि रेमे ॥
सांडुनि जगगत विकल प्रमादि । कारिं परिवृत्ति प्रयोगसमाधी ॥२॥
मेयाधीन मान वेदांतीं । मानीं मेय अन्यसतप्रांतीं ॥
सर्वज्ञात्माचार्यवचन हें । स्वत:प्रमापर युक्तिरचन हें ॥ ३ ॥
उपजे प्रमा मान अधि नाही । मानभिन्न अनुभव कहिं नाहीं ॥
पारि कवण विभु मान प्रकाशी । मानचि किंवा सकल विकाशी ॥४॥
स्वत:प्रकाशमान जारि वदतां । तारि सिद्धांतीं अधिक कुमदता ॥
मानभिन्नता स्वयं प्रकाश । तारि विच्छेदक कैंवि विकाश ॥ ५ ॥
दृष्टाधीना अनुमिति राहे । तेथ कैंवि स्वविकाशन आहे ॥
प्रत्यक्षहि नानाविध भ्रांती । साक्षिप्रमातृविना बहु भ्रांती ॥ ६ ॥
जोंवारि ज्ञान बाधक न कांहीं । तों प्रत्यक्ष सत्यविध पाहीं ॥
चित्संविति मायाकृति बाधी । तदा दृष्ट घे जीत समाधी ॥ ७ ॥
दृष्ट विकाशी विधेय विभेदा । चित्संविति निवटित भवभेदा ॥
दृष्टें सदृशता जहिं सिद्ध । तैं उमटे उपमान प्रसिद्ध ॥ ८ ॥

आप्तदृष्टश्रुत लौकिकवाणी । येत प्रमाणपणास निदानीं ॥
जीव आप्तसंभव भ्रमिं होणें । मिथ्या ह्मणुनि जगद्गत मानें ॥ ९ ॥
वैदिक शब्द तथाविध नाहीं । ईश्वर आप्त भ्रांत कहिं नाहीं ॥
लौकिकशब्द ईशमतिकारी । अनुमानीं तो नास्तिक मारी ॥ १० ॥
दुर्मतिनास्तिकमूढअपेक्षा । उत्तम धार्मिकाप्तकृत शिक्षा ॥
त्यांचिहि परि श्रुत्यनुकूल दीक्षा । अस्ति न वा करिजेचि परीक्षा ॥ ११ ॥
निगमासहि करि ईश प्रकाश । ह्मणुनि मान परकीयप्रकाश ॥
हे जगतीं परकीय न कोणी । यास्तव चितिसंविति मनिं मानी ॥ १२ ॥
ती चितिसंविति मेय ह्मणावी । मानसिद्धि मेय तों गणावी ॥
मानसिद्धि आवश्यक नाहीं । अन्वय कारणकृत परि कांहीं ॥ १३ ॥
मेयशब्द मानज परिचयकर । तूं तव त्यजुनि मान चितिचय कर ॥
विषय त्यजुनि मन ठेविं समाधी । पाहिं जगति चितिमय नरमाधी ॥ १४ ॥

## दोहा.

चिति मुनिजनअनुभूतही असे ज्ञात अज्ञात ।
पारि तिजविण न सिद्ध कदा जगतिं सजातविजात ॥ १५ ॥
विद्युत्वदनुभूति चिति यदा तदा अज्ञात ।
तीचि जेधवां रविसम कविसंज्ञित विज्ञात ॥ १६ ॥

## अभंग.

अनुभवाविण जगीं नाहीं कोणी । ब्रह्मरूप आणि विश्व सारे ॥ १ ॥
दार्ढ्यादार्ढ्यभेदमात्र सिद्धथसिद्धी । करीं समबुद्धी शिष्यनाथा ॥ २ ॥
विद्युल्लतेसम अज्ञा अनुभूती । जाण ही जागृती आवश्यक ॥ ३ ॥
जागृति तें स्वप्न स्वप्न तें जागृती । दृष्टिसृष्टिस्थिती जाणतोसि ॥ ४ ॥
सुषुप्तींत ब्रह्म सदंशानुभव । राहे जडभाव ह्मणूनियां ॥ ॥ ५ ॥
सच्चिदानंद तो संधींत प्रकाशे । समाधींत भासे स्वयंसिद्ध ॥ ६ ॥
ज्ञानेश्वरप्रभुकरुणा अगाध । कारण हा बोध सिद्धासिद्धां ॥ १७ ॥

## ओंवी

साधकेंही करणें समाधी । मी तरेन ह्या बुद्धी । सिद्धानेंही क-

रणें समाधी । परी क्रीडा प्रारब्धें नको ह्मणुनी ॥१८॥ येथें दोहोंत संधीचा । उपयोग तसा शुद्धधीचा । तें ही ऐकें साधूंचा । प्रकार ताता ॥१९॥ साधक झालिया शुद्धबुद्धी । ध्यानीं आणावा परमसंधी । वृत्तित्याग होऊनि बोधीं । लागावा समाधी ह्मणोनियां ॥ २० ॥ सिद्धाचें समाधींत चित्त । परी भोजनादिकालीं विक्षिप्त । यालागीं अनुसंधान संधिगत । ठेवोनि समाधींत त्वरित जाणे ॥ २१ ॥ यालागीं तिहीं करणें ध्यान । आणि भोजनादिसमयीं जाण । जरी असलें संध्यनुसंधान । तरी भोजनादि वृत्ति कृष्णार्पण कराव्या ॥ २२ ॥ एवं संधिना समाधिरक्षण । वृत्ति प्रेमें कृष्णार्पण । एवं व्युत्थानीं भगवद्भजन । समाधींत निजभजन सुजन करिती ॥ २३ ॥ मग तो संधि वृत्तिगत । अथवा श्वासादिस्थानीं कल्पित । वृत्ति भगवद्भक्ति रक्षित । तरी वाक्यलक्षित वृद्धि पावे ॥ २४ ॥ वृत्ति वाचेश्वरीं ठेवितां । संधी लक्ष्य सांपडे तत्वतां । एवं न घेता परोक्षता । तत्वमपरोक्षता पिंडिं फावे ॥ २५ ॥ आणि वृत्तिवाच्यांश परोक्ष । नसोनि वृत्ति साक्षिपरोक्ष । आणि साक्षी तो स्वयमपरोक्ष । ह्मणोनि अपरोक्ष भक्ति आणि ज्ञान ॥ २६ ॥ एवं सद्गुरुकृपाप्रसादी । संधिसमाधिप्रक्रिया साधी । विशद युक्ति सोपानसिद्धी । अवलोकितां कळतील ॥ २७ ॥

## दोहा.

ज्ञानेश्वरचरणांबुरुहद्वंद्वसुगंधघ्राण ।
सेवितांचि मग होति सहज प्रियप्रेममय प्राण ॥२८॥

'हरिः ॐ तत्सत्' इति श्रीनिदिध्यासनप्रकाशे, श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे, नानाछंदबद्धे, भगवद्भक्तिपूर्वकगूढाभिसंधिसमाधियोगोनाम चतुर्थः समासः ॥

॥ श्री सद्गुरुज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥



॥ श्री ज्ञानेश्वरमाउली समर्थ. ॥

## समास ५ वा.

### दोहा.

श्रीज्ञानेश्वरपादुका मस्तकिं धरुनि अगाध ।
करितां नमन अभेदपणें मायाप्रतिभाबाध ॥ १ ॥

### चौपाइ.

कर्तृकर्मफलभेद न काहीं । वासनाचि सकलहि ही पाहीं ॥
अहंवृत्ति ती कर्तृपणा ये । गतिवृत्ति ती कर्मपणा ये ॥ २ ॥
फलरूपा परि वृत्ति झगटितां । ज्ञानिजनां चैतन्य सुघटता ॥
अज्ञदृष्टि वासना ह्मणावी । ज्ञानिदृष्टि ती चितिच गणावी ॥ ३ ॥

### ओंवी.

यथा भोजनेच्छा आधीं । ते वासनारूपेंचि पाकसिद्धी । वासनारूपेंचि भोजनसिद्धी । पुढती तृप्तिप्रसिद्धि वासनेची ॥ ४ ॥ एवं कर्ता, कर्म आणि फळ । येथ वासनाचि केवळ । वासनाप्रवाह प्रबळ । लोकत्रयही ॥ ५ ॥ आसक्तीमुळें अज्ञानियासी । वासना जाहली निश्चयेसी । अनासक्तीमुळें ज्ञानियासी । चैतन्यविशेषीं ऐक्य ॥ ६ ॥ परी वासनेचिया भेदें । कर्ता कर्म फळें अशुद्धें । मानिताती अबोधें । भ्रांतियोगें ॥७॥ ह्मणोनि आसक्त्या भेदवृत्ती । अनासक्त्या अभेदचित्तीं । हीही प्रक्रिया धरोनि चित्तीं । निजप्राप्ति करूनि घे ॥ ८ ॥

### अभंग.

ज्या ज्या प्रक्रियेनें जीवा ब्रह्मज्ञान । होय तीच जाण उत्तम कीं ॥१॥
तीहि नानाविध बोलताति श्रुती । गुरुमुखश्रुतिपरंपरा ॥ २ ॥
उपाधि जो दृढ शिष्याचिया मनीं । जरी सत्वगुणी असेल तो ॥ ३ ॥
तरि तेथूनीच सद्गुरुप्रक्रिया । सांगति उपाया घेऊनीया ॥ ४ ॥
ह्मणुनियां गुरु शास्त्राहुनी श्रेष्ट । अनुभवा स्पष्ट आलें ऐसें ॥ ५ ॥
ज्ञानेश्वरमायबाप गुरुराणा । वाहिला चरणा जीवभाव ॥ ६ ॥

## ओंवी.

तैतिरीय ब्रह्मानंद भृगुवल्ली । तींत जे प्रक्रिया बोधिली । ते पंच-कोशविवेकें आली । समन्वया ॥ १० ॥

## अभंग.

तीच कीजे निरूपण । श्रोतां व्हावें सावधान ॥ १ ॥
ब्रह्म ह्मवि गुह्में आंत । कोशविवेकें कळत ॥ २ ॥
हीच ब्रह्मानंदवल्ली । हींत व्यष्टि ती बोलिली ॥ ३ ॥
भृगुवल्लींत समष्टी । पारि दोहींची ती पुष्टी ॥ ४ ॥
ज्ञानेश्वरकृपाबळें । श्रुतिसमन्वय कळे ॥ ११ ॥

## ओंवी.

पितृभुक्तान्नज वीर्य । त्या पासूनि उत्पन्न होय । अन्नेचि वाढला जाय । ऐसा अन्नमय देह व्यष्टी ॥ १२ ॥ पृथ्वी ह्मणिजे अन्न । तेथून भूतें उत्पन्न । पृथ्वीगत अन्नेंचि पालन । पृथ्वींत लय स्थूलाचा ॥१३॥ यास्तव देह अन्नमय व्यष्टी । पृथ्वी त्याची समष्टी । त्या समष्टींत लय करूनि व्यष्टी । स्पष्टीकरण करावें ॥ १४ ॥ मग देहाचिया आंत प्राण । जो बळ देवूनि देह करी पूर्ण । इंद्रियांचा प्रवर्तक आपण । जडचि परी ॥ १५ ॥ अन्नमयासि आधारू । ह्मा प्राणमय निर्धारू । यालागीं अन्नमय साचारू । नव्हे आत्मा ॥ १६ ॥ जन्मापूर्वी न होता । पुढेंही न राहे सर्वथा । यालागीं अन्नमय तत्वतां । आत्मा नोहे ॥ १७ ॥ अन्नमय मानितां आत्मा । तरी कृतप्रणाशा अकृताभ्यागमा । मानोनि दोषप्रतिमा । होवावें लागेल ॥ १८ ॥ आणि पृथ्वी जो अन्नमय । तियेचाही विकार होय । अन्नज विकार ह्मणोनि देह । अन्नमय कीं ॥ १९ ॥ देह अन्नाचा विकार । ह्मणोनि अन्नमय साचार । आणि अन्न जियेचा विकार । ह्मणूनि अन्नमय भूमी ॥२०॥ अवयवाचें परिवर्तन । यालागीं निकें विकारीपण । आणि विकारी ह्मणतां चेतन । तरी अन्यावस्था नोहे ॥ २१ ॥ चैतन्याहूनि भिन्न । तें अवघें जड जाण । ह्मणोनि अवस्थांतरें चेतन । विकारी न होय ॥ २२ ॥ भेदद्वंद्वविरोधिता । तरी परस्परानुपयोगिता । यालागीं स्वस्वावस्था नियता । सोडितां नये ॥ २३ ॥ आणि

जडांत जडाचा विकारू । तो ज्ञेयताभेदें गोचरू । परी चेतनांत चेतन-विकारू । अगोचर ज्ञेयाभावास्तव ॥२४॥ ज्ञेय चेतन अन्वयें होय । तें ज्ञेयता नसोनि ज्ञानचि होय । ह्मणोनि व्यतिरेकीं ज्ञान पाहें । ज्ञेयाभाव करोनी ॥ २५ ॥ यास्तव विकारी नाहीं आत्मा । आणि अन्नमय व्यष्टि समष्टि विकारी प्रमा । ह्मणोनि अन्नमय आत्मा । न ह्मणें कदा ॥ २६ ॥ पूर्वोक्त जो व्यष्टिप्राण । तैसा समष्टि वायु आपण । व्यष्टीचा समष्टींत लय पाववून । मग जडप्राण संपूर्ण आत्मा न ह्मणें ॥ २७ ॥ मन हालवी जेव्हां । शरीरांतील वायु हाले तेव्हां । कर व्यजन हालवी जेव्हां । बाह्य वायु तेव्हां हाले ॥ २८ ॥ जडतरू वायूतें हालविति । ऐसी आशंका न घडे निश्चिती । जें वायूचि हालवी जडतरूप्रती । ह्मणूनिया ॥ २९ ॥ लघूचे गुरुत्वाविरुद्ध गमन । यालागीं वायूचें प्रतिभान । तरी हें न घडे कर हालवी जैं व्यजन । किंवा श्वासोश्वास हालवी मन । तेथही अव्याप्ती ॥ ३० ॥ एवं वायूचें स्पंदन । तेथ पाहिजे मनाचें स्फुरण । जैसा दुःखियाचा श्वास दिसे आपणा कारण । परी मन न दिसे ॥ ३१ ॥ तेंवि बाह्य वायु हालत । तेथही न दिसे चित्त । परी दुःखियांचें दुःख जेंवि मनांत । तें हालवीत श्वासातें ॥ ३२ ॥ तेंवि येथें समष्टिचित्त । समष्टिवायु हालवीत । अन्नमयापेक्षां हेतुभूत । जरी कां भूतां ॥ ३३ ॥ तथापि प्राणासि मन । हेतुभूत ह्मणोन । जड ह्मणावा प्राण । न कीं आत्मा ॥ ३४ ॥ प्राणाचिया आंत मन । तें संकल्प विकल्प करी गहन । विरोधिवृत्तिधारण । क्षणोक्षणीं ॥ ३५ ॥ क्षणैक इच्छा क्षणैक तृप्ती । क्षणैक क्रोध क्षणैक शांती । एवं ह्मणिजे समूळ भ्रांती । विरोधिप्रतीत्यारूढ अहंतागुणें ॥ ३६ ॥ ह्मणोनि आत्मा नव्हे तोही । विरोधिप्रतीत्यारूढ अहंताही । इदंतारूप पृथक्निश्चयें बुद्धिही । कर्ता पाही अहंत्वांशें ॥ ३७ ॥ कर्ता बुद्धि अंतर्निष्ठ । करण मन तें बहिर्निष्ठ । परी ह्मणती हृदयनिष्ठ । बहुशः मुनी ॥ ३८ ॥ बाह्येंद्रियद्वारा वृत्ति । निघूनि पदार्थाकार स्थिती । यास्तव बुद्धिही करण प्रतीती । जरी जाहली ॥ ३९ ॥ तरी आधीं संकल्पचालन मन । दे तदा बुद्धीचें निर्गमन । भंग करी पदार्थावरण । चिदाभासें स्फुरण वस्तूचें ॥ ४० ॥ बुद्धि आवरणभंग करी चितिचा । परी चिदाभासन्यूनत्वें ठावो ये आकृतीचा । अहंतागुणें दार्ढ्यभाव ही तियेचा । परी वस्तुज्ञानभाव साचा

साक्षीमुळें ॥ ४१ ॥ एवं संपूर्ण चैतन्य न्यूनत्वानें । आकृतिरूपता घेणें । वाचारंभत्वें व्यवहार आणणें । चिदाभासाहंतेनें तयासी ॥ ४२ ॥ ऐसा हा व्यवहारू । परी साक्षिभास्य प्रतिभाविकारू । येथ बाह्यावरण-भंगी निश्चयाकारू । बुद्धितत्त्वरूप ॥ ४३ ॥ तथापि या मनबुद्धी । अ-हंकार होवावा आधीं । यालागिं हें मनबुद्धी । आत्मा नोहे ॥ ४४ ॥ मनोमय आत्मा नाहीं । तैसी बुद्धिही नव्हे काहीं । अहंता आणि नि-श्चयें एकताही । ती अहंताहि सुषुप्तींत न भासे ॥ ४५ ॥ यालागीं अहं-ताही नोहे आत्मा । एवं व्यर्थ विज्ञानगरिमा । आतां आनंदमय महिमा । तोही ऐके ॥ ४६ ॥ विषय भासे अथवा वासनारसें । किंचित् स्थिर-चित्त बैसे । तैं रज जावोनि सत्व उमसे । आनंद उल्हसे त्याठायां ॥ ४७ ॥ आनंदवृत्तिही किंचित्काल राहे । पुण्यभोगें शांत होये । तरी निद्रारूप लय । सहजें होय सुषुप्तीं ॥ ४८ यास्तव अंतर्मुख वृत्ती । हो-तां आनंदप्रतीति । तो आनंदमय ही आत्मस्थिती । न ह्मणवे कीरू ॥ ४९ ॥ परि अंतर्मुखी वृत्ति होतां । तैं तीत आनंदभान होय तत्वतां । परी तीसही देवोनि अहंता । राहे अहंता भोक्तृरूपें ॥ ५० ॥ तो भो-क्तृभाव उपेक्षून । अंतर्मुख इदंतेचें जाय भोग्यपण । मग बिंबभूत आ-नंद आपण । फावे तो आत्मा ॥ ५१ ॥ तो सर्वकाळ तिष्ठत । तया आनंदाचा जो अनुभवो होत । तोंचि चैतन्य अखंडित । आनंदास्तित्व तें नित्यसत्य ॥ ५२ ॥ एवं आनंदरूप आनंद । नित्यत्वें सत्य अनुभवें चिद् । परी स्वयमनुभवरूप अभेद । यास्तव अनुभाव्यरूप नोव्हे ॥ ५३ ॥ भाव आनंदमय मिथ्या कळला । वृत्ति जाणिवेनें अभाव क-ल्पिला । त्याही वृत्तीचा साक्षी घेतला । तरी भावाभाव गेला आनंदें ॥ ५४ ॥ मानुषानंदापासोनि हिरण्यगर्भावरी । भृगुवल्ली आनंद सांगे अधिकोत्तरीं । तथापि ब्रह्मानंदलेशमात्रीं । आनंद ते ॥ ५५ ॥ आनंद-मयकोश वृत्ती । मानुषानंदादिपरीस निश्चितीं । हिरण्यगर्भाची बहुका-लस्थिती । राहों शके ॥ ५६ ॥ परि व्यष्टि आनंदमय । जेंवि निद्रारूपें पावे लय । तेंवि हिरण्यगर्भ आनंदवृत्तीस प्रलय । परी ब्रह्मज्ञानें मुक्त होय हिरण्यगर्भ ॥ ५७ ॥ आनंदमय कोश ही भोगितां । मन ग्रहण करी व्यष्टिदेहा अहंता । यालागीं आनंदही भोगितां । न्यूनता राहे ॥ ५८ ॥ ह्मणोनि जातां निद्रेआंत । न होय ब्रह्म अनुभूत । आपुलि-

या पूर्णतेवीण निश्चित । परिच्छिन्नता भासे ॥५९॥ हिरण्यगर्भ भोगितां आनंदमयवृत्ति । मीचि आहें सर्वभूतीं । समष्टित्वें पूर्णता चित्तीं । दृढ ऐसीं ॥ ६० ॥ यालागीं प्रलय होतां । सुटे आनंदमय अवस्था । जाय निघोनी निजवाच्यता । 'परि मी पूर्ण' या ज्ञानामुळें लक्ष्यता चैतन्य फावे ॥ ६१ ॥ ऐसिये वेळीं तोही मुक्त । स्वप्रध्यानें मनही पूर्ण होत । आणि लक्ष्यांश घेऊनि मुक्त । व्यष्टित्व आसेनि ही मन होय ॥ ६२ ॥ एवं व्यष्टिसमष्टिकोश । एक पाहोनि निःशेष । व्यष्टिउपाधित्यागें शेष । समष्टिउपाधि त्यागूं हि घडे ॥ ६३ ॥ एवं 'त्वं'पदें तत्पदविवेक फावे । परी जें अधिष्ठान ब्रह्म स्वभावें । तें समानचि आघवें । व्यष्टि समष्टितें ॥६४॥ कार्यामुळें व्यष्टिसमष्टि । कारणीं दोन्हीं एके ताटीं । संधींत ईश्वर कारणापाठीं । यालागीं हृदयींच शेवटीं विवेक दोन्ही ॥६५॥ ऐसें विवेकीं ब्रह्म फावे । तें जगज्जन्मादिमत्वें तटस्थ स्वभावें । आणि स्वरूपता संभवे सत्यज्ञानानंततया ॥६६॥ तटस्थ लक्षणें जगद्व्यतिरेक । स्वरूपलक्षणें ब्रह्मान्वय देख । ते अनुभवरूप भाक । बोलिली आहे ॥ ६७ ॥ परी उपाधीसि लावोनि तटस्थ लक्षण । उपाधी त्यागोनि घ्यावें उपहित चेतन । हें भृगुवल्लींतील कोशनिरूपण । **यतो वा इमानि भूतानि** इत्यादि वाक्यें ॥ ६८ ॥ उपाधीसि तटस्थलक्षण न लावितां । उपाधि त्यागोनि घ्यावी चित्ता । ही ब्रह्मानंदवल्लिगतज्ञानशुद्धता । **तस्माद्वा एतस्मात्** इत्यादि श्रुत्या बोलिली ॥ ६९ ॥ परी भृगुवल्लींत भूतोत्पत्तिलयेंकरून । बोलिलें आहे तटस्थ लक्षण । आणि ब्रह्मानंदवल्लीं आकाशाद्युत्पत्ति क्रमेंकरून । तटस्थ लक्षण बोलिलें ॥ ७० ॥ आनंदरूपें स्वरूपलक्षण । दोही वल्लींत समसमान । जगज्जन्मादि सोपाधिक आनंदांतून । निरुपाधिक आनंद जाण अखण्डैकरस ॥ ७१ ॥ तैसा दोन्ही वल्लींत देख । बोलिला आहे कोशविवेक । परी ब्रह्मानंदवल्लींत त्वंपदीय देख । आणि तत्पदीय सम्यक भृगुवल्लींत ॥ ७२ ॥ उपाधित्यागें परमार्थप्राप्ती । जेथ न बद्ध न मुमुक्षु न मुक्ती । होऊनि उपाधीची कल्पितनिवृत्ति । भूषणप्राप्तीचीं प्राप्ति तेंवि प्राप्त ॥ ७३ ॥ यास्तव सोडूनि सकळ उपाधी । जे आत्मानंदप्रसिद्धी । तेथचि कीजे समाधी । व्युत्थानीं संधिबुद्धीत यास्तव ॥ ७४ ॥ किंवा ती आनंदांतून । प्रथम आनंदमय वृत्ति उठे आपण । तो वृत्तीचि होईल जरी श्रीकृष्ण सगुण । तरी कुंठितत्वामुळें आनंदघन

भक्त होय ॥ ७५ ॥ एवं ही कोशविविक्ती । करितांहि पाहिजे भगवद्भक्ती । मग ज्ञानोपरतिविरक्ती । सहज फावे ॥ ७६ ॥ साधनचतुष्टयेंकरून । जो सिद्ध जाहला आपण । तेणें पावुनियां ज्ञान । पूर्वाभ्यास विरक्ति उपरती रक्षाव्या ॥ ७७ ॥ आणि न करितां चारी साधन । अवचितां होय ज्ञान । तरी भगवद्भक्तीनें अथवा मनोनाशवासनाक्षयेंकरून । विरक्ति उपरति आणिजे अंगीं ॥ ७८ ॥ ऐशी ज्ञान उपरति विरक्ति । मिळवूनि पावावी जीवन्मुक्ती । प्रारब्ध सुखाचें जावें म्हणोनि भक्ती । करावीच कीं ॥ ७९ ॥

## दोहा.

श्रीज्ञानेश्वरचरणकृपें कथिला कोशविवेक ॥
एवमुपाधिनिषेध करी चिन्मय जाणुनि एक ॥ ८० ॥

'हरिः ॐतत्सत्' इति श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादें, श्रीनिदिध्यासनप्रकाशे नानाछंदबद्धे पंचकोशविवेकद्वारा ज्ञानोपरतिविरक्तिभगवद्भक्त्यादिनिरूपणंनामपंचमःसमासः ॥

**श्री ज्ञानेश्वरमहाराजार्पणमस्तु. ॥**

**इति पूर्वार्ध समाप्तः**



॥ श्री ज्ञानेश्वर माउली समर्थ. ॥

## ॥ उत्तरार्ध. ॥

### करुणास्यवृत्त.

अलकावतीपति पाउलें मनी आठवी मनुजा सदा ।
मग वारितो प्रभू सर्वही भवभाव ज्या परमापदा ॥
गुरुपादुका मुनि सेवुनी बहु पावले अपवर्गही ।
गुरुसेवका न कदा कदा जग मोहिनी लव सर्ग ही ॥ १ ॥

### चौपाई.

श्रृणु सुनु देशिक उत्तम वाणी । धरूनि अर्थ काया मन वाणी ॥
गुरूवचनें भव सकळ गळे हा । षड्रिपुगण तत्काळ पळे हा ॥१॥

### दोहा.

सद्गुरू शद्ब यथारिती तथा अर्थ तूं जाण ॥
ज्यास्थळिं कुंठे शद्ब तिथें अर्थरूप मनि आण ॥ २ ॥
ब्रह्म सच्चिदानंदघन स्वरूपलक्षण एक ॥
माया ईश्वर जीव जग भास सर्व अविवेक ॥ ३ ॥

### चौपाई.

देशाहुनी देशांतरी वृत्ती । जातां देश भाव ये चित्ती ॥
चित्ति शद्ब परी चित्तसाक्षि तो । सद्गुरुवचनबळेंचि लक्षितो ॥ ४ ॥
दृश्यसंधि द्रष्टाचि विकासे । शुद्ध धिया तो सकल प्रकाशे ॥
वृत्ती अग्नि चिती दृश्य ह्मणावी । वृत्ती ज्यांत द्रष्टृ ती गणावी ॥५॥

### दोहा.

चिती तथापी वृत्ती दिसे मायाऽनादी योग ॥
मायावशेचि कल्पना तरी त्रिविध अकभोग ॥ ६ ॥

### चौपाई.

माया पाहिन हे मनी चिंति । तव माया दर्शनचि भ्रांति ॥

मायाशद्व भेद चिति दावी । माया ज्ञान अभेदचि लावी ॥ ७ ॥
वृत्तिसहित जे दृश्यजात कीं । द्रष्टा एक सचेत त्यांत कीं ॥
वृत्तिस जैं वृत्ती न विकाशी । तैं ती वृत्ती जड सुविनाशी ॥ ८ ॥
वृत्तिद्रष्टृता भेद न कांहीं । सकलद्रष्टृता एकचि पाही ॥
जडचैतन्यभाग मानि कल्पी । अधिष्ठान धरिती मति अल्पी ॥ ९ ॥
आधिष्ठान द्रष्टा परमात्मा । चेतनि द्रष्टृरूपचि महात्मा ॥
अधिष्ठान भेद कैं जडाचा । काय भ्रांतिभावहि अजडाचा ॥१०॥
अधिष्ठान जारि कल्पि जडाला । तरि मग चेतन हेतु उडाला ॥
चिदधिष्ठान भिन्न जारि दुसरे । चेतन अधिष्ठान तरि विसरे ॥११॥
अधिष्ठान सेविति भ्रमनाशा । चेतन येई न मग सुविकाशा ॥
अधिष्ठान द्रष्टा जारि जाणे । अधिष्ठान तरि दृश्य प्रमाणे ॥ १२ ॥
अधिष्ठान दृश्य आणि द्रष्टा । तरिहि संविती भिदाचि स्पष्टा ॥
यास्तव अधिष्ठानद्वय त्यागी । चिदधिष्ठान सर्व गुरुमार्गी ॥ १३ ॥
देशगमन करि वृत्ति जेधवां । वृत्तिभाव करी बाध तेधवां ॥
देशमध्य संविती विकाशू । तोचि करी वृत्तीहि प्रकाशू ॥ १४ ॥
ज्ञानपूर्वभानी ती सत्ता । ज्ञान झालिया मग ती चित्ता ॥
अविद्याऽनिर्वचन उपाधी । न दिसे आधि न दिसे समाधी ॥१५॥
उपाधींत असतां भ्रम न कळे । भ्रमज्ञान तरि भ्रांतिचि वगळे ॥
यास्तव ज्ञानपूर्वप्रतिभानें । सत्ताशद्व तयांप्रति जाणे ॥ १६ ॥
सत्ता जग अखिलहि निर्मी । ज्या स्थानिं नव्हती कांहिंच उर्मी ॥
जगापूर्वी कारण एकचि ती । परंतु होतीच मिळुनी चिती ॥ १७ ॥

**ओवी.**

वृत्याश्रय अपरोक्षता । तथापि प्रमाणें परोक्षता । आधी जाणोनि सत्ता । मग ज्ञानें चित्ता ओळखिजे ॥ १८ ॥

**अभंग.**

हेचि सत्ता गूढ निजपुत्र मनी ॥ आदेश ह्मणुनी मुनी सांगे ॥१॥
उद्दालकनामा श्वेतकेतुलागी ॥ सुंदर छांदोग्यीं कथन हें ॥ २ ॥
मृत्तिकेच्या पिंडें मृन्मयकार्याचें ॥ ज्ञान होय साचें जया परी ॥३॥
कारणाच्या ज्ञानें कार्याचेही ज्ञान ॥ साच तें कारण जगापूर्वीं ॥४॥

कार्य तें सदसद्विलक्षण आहे ॥ ज्ञानेश्वर ह्मणे विचारितां ॥ ५ ॥

**ओवी.**

कार्य उपादानाऽभिन्न । घट जेवीं मृदाभिन्न । तेवीं जगत् सद-भिन्न । जाहलें निकें ॥ १९ ॥

**गद्य.**

शंकाः—ननु या स्थळीं प्रथम सत् सिद्ध करावयाचें असल्यामुळें पदार्थाच्या ज्ञानाहून सत्ताज्ञान सत्तेचें कारणत्वबोधन करण्याकरतां पृथक्त्वें करून निर्दिष्ट केलें पाहिजे. " कारणं व्यतिरेकेण पुमानादौ विलोकयेत् " इत्यादि वचनें करून यद्यपि कार्य व्यतिरिक्त कारणज्ञान कारणपदार्थत्वें करून न घेतलें तर ज्ञात्रनुस्यूतता त्याचे ठिकाणीं प्राप्त होईल, ह्मणून ज्ञातृसिद्धीनेंच ज्ञेयाची सिद्धि होऊं पाहील. ही चिदभिन्न-सत्ता, ज्ञानेंकरून सिद्ध असल्यामुळें प्रश्न संभवत नाहीं; तथापि, प्रथम सत् परिस्थापनीय असल्यामुळें, आदौ कार्यव्यतिरेक केला पाहिजे; आणि कार्यव्यतिरेक करतांना सत्ज्ञान सिद्ध होतें असें दिसत नाहीं. कारण कार्याहून बुद्धी पृथक् झाली ह्मणजे ज्ञात्यासी न मिळूं देतां पाहिलें तर, सा शून्या रोहिणी होतें. ह्याचें आकाश उदाहरण आहे.

समाधानः— ही शंका घडत नाहीं; कारण कार्याचा त्याग केला असतां बुद्धींत आकाशाचें आरोहण तूं बोलिलास, आणि तें शून्यमय बोलिलास; तर आह्मी असें विचारितो कीं, आकाशाचें जें आरोहण बुद्धीचेठायीं होते तें शब्दगुणानुमेयरूपेंकरून होतें ? किंवा अवकाशमात्ररूपें करून होते ? आद्ये सति आकाशाला इंद्रियगोचरत्व प्राप्त होईल; आणि द्रव्य गुणांचा समवाय संबंध असल्यामुळें गुणाची व्याप्ती द्रव्याचें ठिकाणीं उदाहरण पक्षावयवीय संभवणार नाहीं, ह्मणून आकाशाला इंद्रियगोचरत्व प्राप्त झालें असतां कार्यत्वेंकरून आकाशाचें निराकरण करणें अवश्य लागेल; आणि तें न केलें तर कार्यत्यागाची शंका घडणार नाहीं. आणि द्वितीयपक्ष स्वीकार करशील तर, अवकाशाचें ज्ञान कार्यसापेक्षेंकरून होते ? किंवा स्वयं होते? पहिल्यापक्षीं कार्याच्या अभावानें अपेक्षा मानितोस ?

किंवा कार्याच्या भेदानें अपेक्षा मानितोस ? प्रथम पक्ष मानिला तर, कोणत्या कार्याऽभावानें आकाशारोहणसिद्धी मानितोस ? ध्वंसाभावानें सिद्धी मानणें अशक्य आहे; कारण ध्वंस झाला असतांना, ध्वंसाभावासहित जें बुद्धींत आकाशाचें आरोहण होतें, त्यांत आकाशाचें ध्वंसाभाव पार्थक्यें करून ज्ञान झालें पाहिजे; आणि तसें मानिलें तर आकाशाचें दुसरे अभावाहून स्वयंज्ञान मानिलें पाहिजे. हा दोष येऊं नये म्हणून ध्वंसाभावस्वरूप आकाशारोहण मानलें तर, प्रतियोगिज्ञानावांचून ध्वंसज्ञान होणें अशक्य आहे. यद्यपि वेदांतामध्यें ' अनुपलब्धि ' प्रमाणें करून अभावाचें ज्ञान मानिलें आहे. न्यायाचे ठायीं ' अनुपलब्धि ' प्रमाणाचा अंगीकार नाहीं; तथापि अभावाचें ज्ञान ' अनुपलब्धि ' प्रमाण निष्ठ आहे; परंतु अमुक पदार्थाचा ध्वंस इत्यादि ज्ञानाचे ठायीं, अमुक पदार्थाची सत्ता ह्या ठिकाणीं प्रचलित आहे किंवा नाहीं, ह्या संशयाची जेव्हां अभावज्ञानें करून निवृत्ती होते, तदा तत्पदार्थकविशेषसत्तेचें निराकरण प्रतियोगिज्ञानानें होऊन, मनोमय त्याचें अस्तित्व असते; परंतु स्थानाद्यपेक्षी योग्यानुपलंभतेमुळें ' अनुपलब्धि ' प्रमाणजन्य अभावज्ञान मानिलें असल्यामुळें, न्यायाचा आणि वेदांताचा विरोध नाहीं; येणें करूनच हें एक सिद्ध झालें कीं मनोमय पदार्थाचा व ध्वंसाभावाचा विरोध नाहीं; म्हणजे प्रकाशाकार वृत्ती जसी तमाच्यावेळीं प्रकाशाकार न राहून तमाकार होते, किंवा शांतीचेवेळीं क्रोधाकार वृत्ती न राहून शांत्याकार होते, तद्वत् या स्थलीं विरोधी वृत्तिभवन होत नाहीं; किंतु मनोमय प्रतियोगिज्ञान आणि अनुलब्धिप्रमाणजन्य ध्वंसज्ञान या युग्माकार वृत्तीची एकसमयावच्छेदें करून प्रतीती होते; म्हणून ध्वंसाभाव स्वरूपी आकाशारोहण मानिलें तर तत्सहकारी मनोमय कार्य प्रतियोगी ज्ञान अवश्य मानावें लागेल. आणि मग भाव व अभाव एकेकालींच असण्याचा प्रसंग येईल. आणि तदा भेदपरिचायक सत्ता ध्वंसरूप आकाशाहून आणि भावरूपप्रतियोग्याकारतावृत्तीहून प्रत्ययबलेंकरून पृथक् मानावी लागेल; आणि मनोमयत्वें करून कार्य प्रत्यय असल्यामुळें कार्याचा त्याग म्हणूनही घडणार नाहीं. प्रागभावें करून जर आकाशाचें आरोहण मानिलें तर, कार्योत्पत्तीच्या पूर्वीच तें

मानावें लागत असल्यामुळें, कार्योत्पत्ति त्या नंतर प्रतीत जी प्राग भावानुमेयता, तिला प्रतियोगिज्ञानाची आवश्यकता असल्यामुळें गोचरत्वें करून कार्याचें ज्ञान झाल्यावांचून अभावज्ञान कालीं प्रतियोगिज्ञानसहकारितेविषयीं प्रत्यय नसल्यामुळें, प्राग--भावाची सिद्धीच होणें आधी कठीण आहे; आणि उत्पत्य-नंतर अनुमित प्राग भावाचा व्यतिरेककरणकालीं कांहीं उपयोग होणार नाहीं. कारण उत्पन्न-कार्याचा विनाश होतांना प्रागभावाचें ज्ञान नसून ध्वंसा भावाचेंच ज्ञान होते. ध्वंसाभावाचें निराकरण पूर्वी केलें असल्यामुळें शंकेचें पुनरुत्थान घटत नाहीं. आतां कार्यापूर्वी कार्यव्यतिरेक मानणें अशक्य आहे; कारण कार्यापूर्वी कार्य व्यतिरेक मानला तर अग्नी अभावापासूनच कार्योत्पत्ति मानण्याचा प्रसंग येईल. आणि अभाव सर्वत्र सुलभ असल्यामुळें सर्वत्र सर्वसंभवापत्ती होईल. अत्यंता भावाची सर्वत्र सुलभता असल्यामुळें सर्वत्र सर्व संभवापत्ती प्राग भावाचें ठायीं येत नाहीं, असें कोणी ह्मणेल तर तें असंबद्ध आहे. कारण प्रतियोगीच्या भेदावांचून अभावाचा भेद मानता येत नाहीं, आणि प्रतियोगीचा भेद मानण्याकरितां प्रतियोगीचें ज्ञान अवश्य पाहिजे. प्रतियोगीचे ज्ञान कार्योत्पत्तीनंतरच होऊं शकते. कार्योत्पत्ती नंतरच्या ज्ञानावरून प्रागभावाच्या उपयोगाचें पूर्वी खंडन केलें असल्यामुळें, प्रतियोगिज्ञानाची या स्थलीं उपयोगिता होत नाहीं, ह्मणून विना प्रतियोगि-ज्ञान कार्यापूर्वी प्रागभाव आणि अत्यंता भावाची एकताच प्रतीत होत असल्यामुळें अत्यंताभावसौलभ्यवत् प्रागभावही सुलभ मानणें भाग पडते. कार्योत्पत्तीवांचूनच कार्याच्या पूर्वी योग बलानें भविष्यदुत्पन्नकार्याचें प्रतियोगिज्ञान मानून प्राग भावाचा भेद मानिला असतां सत्कार्यवादाचा प्रसंग येईल. अभावापासून कार्योत्पत्ति मानता यावयाची नाहीं. आणि योगियाची वृत्ती अभाव कार्य गोचर असते, असें ह्मटलें तर मग निद्रेंतही योगियाला कार्य दिसले पाहिजे. कारण, 'अभावप्रत्ययाऽवलंबना वृत्तिर्निद्रा' असा योग शास्त्राचा सिद्धांत आहे. आणि निद्रेंत कार्य दिसेल तर निद्रा संभवणार नाहीं. किंबहुना ज्या ज्या ठिकाणीं अभाव त्या त्या ठिकाणीं योगियाला कार्य दिसण्याचा संभव होईल आणि तसें झालें

ह्मणजे मोक्षाचे ठिकाणीं योगियाला दिसणारा जो बंधाभाव, त्या ठिकाणीं बंधच अवश्य दिसेल. आणि तसें झालें ह्मणजे योगाचें मोक्षरूप प्रयोजन संभवणार नाहीं. मग प्रयोजनाभावीं योगाकडे कोणाची प्रवृत्ति न झाल्यामुळें, पुरुषाचेठिकाणीं योगवृत्तीच उत्पन्न होणें शक्य होणार नाहीं; ह्मणून योग वृत्तीनें भविष्यदुत्पन्नकार्यरूप प्रतियोगिज्ञानें करून कार्योपत्तेः प्राक् प्रागभाव अत्यंताभावाचा भेद सिद्ध होत नाहीं. अतः अत्यंताभाववत् प्रागभावाची सुलभता सिद्ध होते. शिवाय प्रतियोगिज्ञान प्रागभाव कालीं मानिलें असतां, मनोमय तदाकारता राहिल्यामुळें, भविष्यत्कालाचा व वर्तमानकाळाचा मनोमयत्वें करून तरी ऐककालिक प्रसंग येईल. हें अंगीकारिलें तर, पूर्वोक्त सर्व दोष येतात. आतां अत्यंताभावस्वरूपानें आकाशाचें आरोहण मानशील तर, शशशृंगादिकाचें जसें कोणत्याच रूपानें ज्ञान होत नाहीं, किंवा विकल्पपक्षीं संबंधवस्तुत्वज्ञान होत नाहीं, तद्वत् आकाशाचें ज्ञानच न झालें पाहिजे. सर्वथा अज्ञात वस्तु ग्रहण करून शंका होत नाहीं. किंतु, किंचित् ज्ञान ग्रहण करून, संपूर्ण ज्ञान होण्यासाठीं, उतावेळ वृत्तीनें शंका होत असते; ह्मणून आकाशारोहण शंकाच तुझी संभवत नाहीं. 'अन्योन्याभाव' स्वरूप आकाशाचें आरोहण मानशील तर, कार्याचा भेद अवश्य चित्तांत राहिल्यामुळें, कार्यविशेषें करून, किंवा कार्यज्ञानें करून कार्यव्यतिरेकच संभवणार नाहीं. शिवाय 'अन्योन्याभाव' परस्परनिष्ठ असतो म्हणून, संधिस्थानीं केलेली जी आकाशाची कल्पना, तिला अभावरूप ह्मटलें तरी, जातिज्ञानें करून ती मिश्र राहील. ह्मणजे, 'विशेषाभावाऽवच्छिन्नं भावसामान्यं सद्वृत्तिगोचर माकाशं' असें लक्षण होईल. आणि तसें झालें ह्मणजे, आकाशाला कार्यत्वच येते. कारण, आकाशाची आनंतरिक कल्पना ठरते म्हणून. किंवा कार्यव्यतिरेकेण कारण तरी निदान पाहतां येत नाहीं. अतः, प्रथम पक्षांतर्गत द्वितीय पक्ष खंडित आहे. म्हणून कार्य सापेक्षी आकाशारोहण बुद्धींत होते, हा प्रथम पक्ष बरोबर नाहीं. द्वितीय पक्ष स्वीकारला तर, आकाशारोहाचें स्वयं ज्ञान असद्रूपानें होते? किंवा सद्रूपानें होते? प्रथम पक्ष स्वीकारला तर, कार्याऽसद्रूपानें होते? किंवा स्वासद्रूपानें होते? 'स्व' शब्द येथें आ-

काशनिष्ठ आहे. आद्ये, कार्याऽसत्तेचें पूर्वी निराकरण केलें आहे. द्वितीये, स्वाऽसत्ता, प्रतियोगीज्ञानावांचून संभवत नसल्यामुळें, आकाशाचें प्रतियोगी ज्ञान अवश्य मानावें लागेल. आणि आकाशाचा अत्यंताभावच मानला तर, पूर्वी अत्यंताभावखंडनप्रसंगी सांगितलेले दोष पुन: सर्व येतात; म्हणून प्रथम पक्ष असंबद्ध आहे. द्वितीय पक्षाचा स्वीकार केला तर, आमचा सिद्धांत गळी आला. कारण कार्याचा व्यतिरेक केला असतांना, सताचें बुद्धींत आरोहण होतें, असेंच आमचें ह्मणणें आहे. तुझ्या बुद्धींत कार्य सापेक्ष आकाशाचें जसें आरोहण होते, किंवा, शून्य नसूनही, शून्यवत्तेचें आरोहण होते, तसें आकाशाचें निराकरण करून सताचें कां आरोहण होत नाहीं ? असें स्वामी विद्यारण्याचार्योनीही ‘ भूतविवेक ’ ग्रंथांत ह्मटलें आहे. ह्मणून कार्यव्यतिरेके—करून पृथिव्यादिभूतांपासून सत्ता निराळी काढली असतां, तीं सर्व निस्तत्वरूप मिथ्या राहतात. शून्य हें ज्ञानरूप नसलें पाहिजे. शून्याचें ज्ञान होतें, असें मानिलें तर, शरीराद्यपेक्षेंकरून जरी ज्ञान ज्ञेयाचा भेद दिसतो, तथापि, ज्ञानमय ज्ञातवत्वालाच ज्ञेययोग्यता असल्यामुळें, शून्य ज्ञेय होत नाहीं; ह्मणून शून्यज्ञान केव्हांच होत नाहीं. अतो, बुद्धींत सताचेंच आरोहण होते. तीव्रभावनाज्ञानानें, योग्यवृत्तीनें, स्वप्नदृष्टांतादिकानें, अध्यासवादानें, आणि कार्यारोपित धर्मज्ञानानें, सताचेंठायीं कारणता सिद्ध होते. हें कार्य सताहून भिन्न किंवा अभिन्न आहे, किंवा उभयात्मक आहे ? हें तीन्ही पक्ष संभवत नाहींत. कारण, भिन्न मानिलें तर सद्रूप आहे किंवा असद्रूप आहे ? असद्रूप मानिलें तर, कारणसत्तेनें त्याला सत्ता आहे किंवा कार्यसत्तेनें सत्ता आहे ? कारणसत्तेनें सत्ता मानली तर सत्तारूपानें भेद संभवणार नाहीं. आणि कार्यसत्ता पृथक् मानली तर, दोन्ही सत्तेचा भेद सिद्ध करणारी तिसरी सत्ता मानावी लागेल; ह्मणजे आत्माश्रयादि दोष येतात. असद्रूप मानलें तर वंध्यापुत्रादिवत् कार्याची प्रतीती न झाली पाहिजे. उभयात्मक मानलें तर, सत् व असत् हें दोन्ही विरोधी आहेत. ह्मणून हें संभवत नाहीं. अत: कार्य अनिर्वचनीय मानावें लागते. हें कारण सत् आपल्याहून भिन्न मानलें तर जड होईल. आणि जड हें अज्ञानरूप असल्यामुळें

प्रत्यभिज्ञायोग्यता त्याच्या ठिकाणीं येत नाहीं. ह्मणून तें कारण सत् तुझ्याहून भिन्न नाहीं. आणि कार्य आरोपमात्र आहे. ह्मणून हे श्वेतकेतो ! स्वप्नाच्या व्यवहारासारिखे, वस्तुतः कारणरूप, परंतु वाचारंभण मात्र हे घटादिविकार नामरूपमय आरोपित आहेत. यास्तव हे श्वेतकेतो ! सत् तुजहून भिन्न नसल्यामुळें तेंच तूं आहेस, तत्वमसि 'तत्' ह्मणजे सः 'त्वं' ह्याचेच मूळरूप अहं आहे. आहेस ह्याचा मी आहे ह्या पदांत अंतर्भाव करून 'सोहं' असें पुराणांत सांगितलें आहे. याप्रमाणें सत्ताज्ञान सांगून आतां चित्ज्ञान सांगतो. 'प्रज्ञानं ब्रह्म' या महावाक्यानें 'तत्वमसि' महावाक्यनिष्टसत्ताज्ञानासी चित्ज्ञानाचा अभेद कळतो. ह्मणून चित्ज्ञान या महावाक्याचा विषय आहे.

ओवी.

---

सूर्य ज्योतीनें व्यवहार । जगाचा चाले समग्र । चंद्रज्योतीनें व्यवहार । सूर्य अस्त झालिया चाले ॥ १ ॥ सूर्य चंद्र अस्तंगत । झालिया अग्निज्योतीनें चालत । सूर्य चंद्राग्नि अस्तंगत । तदा वाग्ज्योतीनें चालत व्यवहारू ॥ २ ॥ परी सूर्यादि ज्योती चारी । नसती स्वप्नाभीतरी । तेथ आत्मज्योतीचि निर्द्धारी । वर्त्तवी व्यवहारीं सकलातें ॥ ३ ॥ तेथ जें 'प्रज्ञान' । तेंचि जागृतींत जाण । आणि एक जागृती स्वप्न । हेंही निरूपण पूर्वसमासी ॥ ४ ॥ प्रज्ञान जाणे व्यक्ती । परी जाणतां नाहीं त्याप्रती । ह्मणोनि प्रज्ञानाची व्यक्ति । करितां नये ॥ ५ ॥ ज्ञेयत्वावीण व्यक्ति ज्ञान । नाहीं ह्मणूनि व्यक्तिरहित प्रज्ञान । व्यक्तिज्ञानावीण जाति ज्ञान । असंभूत ॥ ६ ॥ जाती पासूनि व्यक्ति । जाहालिया जरी असती । तरी तेथही संमती । ज्ञेयत्वाची ॥ ७ ॥ आणि सर्वांभूती प्रज्ञान । चैतन्यरूपें स्फुरण । सुषुप्तीचेंही ज्ञान । अनुमान जें आणी ॥ ८ ॥ तें स्वगोचर प्रज्ञान । सर्वभूती व्यापकपूर्ण । 'ब्रह्म'ही ह्मणून । शब्द यातें ॥९॥ देहत्रय निराकरण 'त्वंपद' विवेकी । लोक निराकरण 'तत्पद' विवेकी । 'असि' पदीं एकी । अधिष्ठान जें ॥ १० ॥ स्थूलांत सूक्ष्मदेह ओतप्रोत । विराटात हिरण्यगर्भ ओतप्रोत । सूक्ष्म स्थूलांत प्राज्ञ ओतप्रोत । विराटहिरण्यगर्भी ओतप्रोत

ईश्वरु ॥११॥ जो अंतर्यामी जगद्योनि । परमात्मा मोक्षदानी । पूर्णत्वामुळें तमत्वपणीं । नये कदा ॥१२॥ त्यासहित हें विवर्त्त । परी तो अनध्यस्त विवर्त्त । हेमालंकार दृष्टांत । ये विषयीं ॥१३॥ हें सकळ ओतप्रोत अधिष्ठानी । आणि अधिष्ठान स्वयंप्रभा ह्मणोनि । पूर्वं सत्-चैतन्याहुनी । भिन्न नाहीं ॥ १४ ॥ सुलभ व्हावया बोध । प्रक्रिया-कल्पिल्या नानाविध । अधिकाऽल्प उपाधी भेद ॥ वर्णिला तेथ ॥१५॥ कांहीं कांहीं ग्रंथीं देह तीन । कपिलगीतादिग्रंथीं देहचतुष्टयनिरूपण । अमृतरायकृत अविनाश संदेहहरण । निरूपण दशदेह ॥१६॥ तैसे वेदीं ब्रह्मलोकापर्यंत लोक । पुराणी लोक ते अधिक । परी एका ब्रह्मींच सकळिक । ओतप्रोत हे ॥१७॥ एवं उपाधी कल्पिल्या नाना । परी मज योग्य वाटे अल्प उपाधी कल्पना । दृष्टिसृष्टिवादी निदाना । एकचि उपाधी ॥१८॥ असो, ऐसें हे चित्ता ज्ञान । परी तेथ हीं अविषय भान । जें आनंदावीण । उपयोगी नोहे ॥१९॥ सुखेच्छा सकला प्रती । आणि सुख नाहीं त्रिजगती । विषयीं कवणाप्रती । नुपजे सुख ॥२०॥ विषयीं उपजे सुख । तरी एकी अथवा बहुती देख ? । प्रथम पक्षीं अन्य विषयेच्छा देख । न होवावी कधीं ॥२१॥ द्वितीयपक्षीं पाहतां । एकसमयीं अनेक विषय भोगितां । न येती न येती सर्वथा । कवणासही ॥२२॥ भोजन आणि मळविसर्जन । भाषण आणि मैथुन । गमन आणि ग्रहण । श्रवण स्पर्शन दर्शनादि ॥२३॥ एकेकाळीं करितां । न येतीच सर्वथा । म्हणोनि सर्व विषयीं सुखप्राप्तता । न घडे कीरू ॥२४॥ आणि तेवढिया पुरते सुख । होय विषयींच देख । तरी विषयाचा गुण सुख । मार्तंडौष्ण्यवत् जाहला ॥२५॥ तरी जंव जंव विषय भोगावे । तंव तंव अधिक सुख होवावे । अधिक भोजनें न घडावें । अजीर्ण कदा ॥२६॥ करितां बहुत स्त्रीसंभोग । कदापि न लागावा क्षयरोग । योगियाचा योग । करितां विषयसंग, न भ्रष्टावा ॥२७॥ श्रमाची न पडतां मुद्रा । कदापि न यावी निद्रा । विषयचि सुखसमुद्रा । धारक जरी ॥२८॥ ह्मणोनि विषय दुःखमय । सुख तें वृत्यैकाग्रतेनें होय । एकाग्रवृत्तींत बिंबताहे । आत्मा ह्मणोनि ॥२९॥ सकल सुख इच्छिती । ह्मणोनि सुख तेथ प्रीति । आपुलिया सारिखी प्रीति । नाहीं, येथ अनुभव आणि श्रुति प्रमाण ॥२९॥ पति, स्त्री,

लोक, देवादि सकळ । पत्यादिसाठीं प्रिय न होती केवळ । आपणा साठींच प्रबळ । प्रिय होती ॥३१॥ ह्मणोनि आपुली प्रीति । आपणा आहे अत्यंत स्थिती । मानासाठीं देह त्यागिती । ते मानीं सुखप्राप्ती ह्मणोनियां ॥३२॥ मानें दुःख ह्मणोनि धार्मिक । मान नेच्छिति देख । परी सुखेच्छा तंव निष्कलंक । न सुटेची ॥३३॥ ह्मणोनि सुखेच्छा सकळांसी । आणि तद्विषयता भिन्न कैसी । यालागी विषयाहूनि विशेषीं । आपण प्रिय आपणा ॥३४॥ वैरियादि निमित्त । मानी जरी दुःख प्राप्त । तरी प्राण न त्यागितां विरुद्ध जात । मानेच्छू ही ॥३५॥ अथवा देह, प्राण, मनादि जन्य सुख । सुषुप्तींत नसे देख । बरी सुषुप्ती असम्यक । नेच्छावी कोणी ॥३६॥ परंतु तैसें नाहीं । या लागीं आत्माचि प्रिय पाही । सुषुतीदृष्टांतेंकरूनि लवलाही । अज्ञान त्यागितां सिद्धांत मिळे ॥ ३७ ॥ चित्ज्ञानें सुषुप्तींतील अज्ञान । आत्म प्रीतित्वें विषय उपेक्षून । एवं अवस्थात्रय सोडून । निजानंदें तूर्यसंपन्न होआवें ॥ ३८ ॥ होतां अज्ञाननिवृत्ती । चिदादिकांची प्रतीती । परि आनंदाची प्रतीती । अखंड राहे ॥३९॥ आनंदाची प्रतीती अखंड । ह्मणोनिच मुक्ता जन्म नोहे प्रचंड । जे कीं वासनेचें कुबंड । सुखप्राप्तीमुळें नुठे ॥४०॥ तेव्हां आनंदाचा अनुभव येत । आणि आनंद राहात । हेंचि चैतन्य सत् । ओळखावें ॥४१॥ सत् आपणासी अभिन्न । आपणा आपण नोहे अज्ञान । ह्मणोनि चित् ही अभिन्न । आनंद अभिन्न आत्मप्रियत्वें ॥४२॥ एवं अभिन्न सच्चिदानंद । आत्मरूपीं प्रसिद्ध । निकें विशद । युक्तथा ही होय ॥४३॥ सत्तेहूनि वेगळे चिदानंद । तरी ते असत्यत्वें सिद्ध । असत्याची प्रसिद्ध । प्रतीती नाहीं ॥४४॥ चैतन्या वेगळे सदानंद । तरी ते होतील अचिद । अज्ञान ह्मणोनि प्रत्यय शुद्ध । न होआवा त्यांचा ॥४५॥ सच्चित् भिन्न आनंदाहुनी । तरी तें दुःखाची खाणी । या लागीं सच्चिदानंद तिन्ही । एकरूप ॥४६॥ ऐसा सच्चिदानंद आत्मा । याची घेऊनि श्रौती प्रमा । श्रवण मनन निदिध्यासन परमा । साधावें कीं ॥४७॥ सत्तामात्र तें श्रवण । चिन्मात्र तें मनन । आनंदमात्र निदिध्यासन । वा श्रवण मनन निदिध्यासन सच्चिदानंदीं ॥४८॥ परि अनुभव आणि श्रुतिबळें । वृत्तीनें बंधत्व घेतलें सघळें । तरी वृत्तीचेची मोकळें । होणे पडे ॥४९॥ या लागीं सच्चिदानंद ।

वृत्तींत गोचर प्रसिद्ध । पृथकत्वें शुद्ध । करणें पडती ॥५०॥ सूर्याची उष्णता सूर्यकांतीं । घेतां होय पृथक् प्रतीती । तेवीं सच्चिदानंद ब्रह्मीं अपृथक् असती । परी पृथक्वत् भासती वृत्येति स्मृति असे ॥ ५१ ॥ **आनंदो विषयानुभवो नित्यत्वं चेति संति धर्माः ॥ ब्रह्मणोऽपृथत्केपि पृथगिवावभासत इति ॥** विषय ह्मणजे वेदांत विषयक ब्रह्म. तदनुभव म्हणजे चित्. इतर अर्थ स्पष्ट आहे. ओवी ॥ काल्पनिक भेदाभ्युपगमे सच्चिदानंद भासती पृथग्धर्मे । तेथ बंधाभाव विशिष्टवृत्यागमे । सत्यता ब्रह्मीं ॥ ५२ ॥ तदाकारवृत्यवच्छिन्न । ब्रह्म प्रगटे चेतन । प्रीत्यादिवृत्यवच्छिन्न । आनंद जाण प्रगट तो ॥ ५३ ॥ किंवा व्यंजक वृत्यवच्छिन्न ज्ञान । आनंद अनुकूलवृत्यवच्छिन्न । अथवा आणीक ही अवभासन । होत असे ॥ ५४ ॥ परोक्षज्ञानें प्रगटे सत्ता । अपरोक्षज्ञानें कळे चित्ता । प्रेमभक्तीनें आनंदवत्ता । अंगीं बाणे ॥ ५५ ॥ आत्माकार मानावी वृत्ती । आणि आनंदावच्छेदक कां न ह्मणावी भक्ती । या लागीं अद्वैतीं अनिर्वाच्य भक्ती । ब्रम्हनिष्टांची ॥ ५६ ॥ ' तैसी क्रिया कीर न साहे । परी अद्वैतीं भक्ति आहे । हें अनुभवाचि जोगे नोहे । बोलण्या जोगे ' ॥ ५७ ॥ परी हा पृथगिव आनंदभास । न म्हणावा आनंदमय कोश । तेथ परतंत्रता आणि विषयानंदता विशेष । येथ ब्रह्मानंद ज्ञानास उपयोगिता ॥ ५८ ॥ तेथ आत्मया बंधन । येथ होय मोचन । ही प्रक्रिया अद्वैतकौस्तुभांतून । घेतली कांहीं ॥ ५९ ॥ व्यवस्था आणि भक्ति । ज्ञानेश्वर कृपा संमती कृष्ण पत्न्या यथामती । निरूपिली ॥ ६० ॥ एवं उत्तमाधिकारा । हा सच्चिदानंदभाव खरा । परी मध्यमाधिकारी दहरा । उपासिती ॥ ६१ ॥ हृदयाकाशोपहित । चैतन्य दहर बोलत । छांदोग्यकैवल्याद्युपनिषदीं यथार्थ । उपासना याची ॥ ६२ ॥ परी सकल जाणता । मनादीक सत्वतां । जो एकची अखंडता । तलवकार म्हणे ॥ ६३ ॥ तया आत्म्याचें ज्ञान । उत्तम सच्चिदानंदत्वें पूर्ण । चारही महावाक्य याचि कारण । उपदेशिती ॥ ६४ ॥ **दोहा**—श्रुति स्मृति पुराणगत सम्यक्सारोद्धार । करुनी या स्थळीं बोलिला, महावाक्य विचार ॥ ६५ ॥ श्री ज्ञानेश्वर चरण कृपें, ब्रम्हज्ञान निधान । नयनीं पहाया अग्रीं मिळो, श्रोतृवृंद अवधान ॥२॥ सियाबर रामचंद्रकी जय । उमापत महादेवकी जय ॥

हरिः ॐ तत्सत् श्री ज्ञानेश्वरकृपाप्रसादे गद्यपद्यान्विते नाना छंदबद्धे छांदोग्य, बृहदारण्यक, कैवल्य, तलवकारादि श्रुति तथा स्मृति पुराणस्वानुभवादिप्रमाणैः ज्ञानकर्तृतंत्रवस्तुतंत्रतया सच्चिदानंदपदत्रय-विवरणं नाम षष्टः समासः ॥

श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर महाराजार्पणमस्तु । शुभं भवतु ॥

## सप्तमः समासः

### श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर माउली समर्थ.

### चौपाई.

आळंदीपतिपदकमल वारी । कंटककंठपदकमलवारी ।
चरण चारु नव-कवन विकाशी । जें पद काधिंहि न कवण विकाशी ॥१॥

### दोहा.

सांख्य योग वेदान्तगत ब्रम्हचिंतनोपाय ।
वदूं समुचित नमुनि मनीं उमामहेश्वरपाय ॥ १ ॥

### ओवी.

बद्धदशेमाजीं तत्वतां । विषयस्फुरणीं चित्सत्ता । विषयसुख तें तत्वतां । आनंद द्योती ॥ १ ॥ जिज्ञासुदशे आंत येतां । तरी श्रद्धा उमटे सत्ता । भावनावृत्ती चित्ता । समाधान तत्वतां । आनंद द्योती ॥२॥ आणि मुक्तदशे आंतू । मिथ्याधार सामान्यसत्ता सिद्धांतु । अनुभव चैतन्य सुखैकांतू । परमानंदप्राप्ती ॥ ३ ॥ एवं सच्चिदानंद । व्याख्यान बहुविध । तथापि जिज्ञासुदशासिद्ध । निदिध्यासग्राह्य ॥ ४ ॥ तेथ श्रद्धा सत्ता आश्रवूनी । विषयभाव दूर स्रवूनी । प्रक्रिया श्रेय पावूनी । साक्षात्कारी कृतकृत्यता ॥ ५ ॥ तेथ सांख्यशास्त्रें आत्मनिश्चय । योगें व्यतिरेकानुभव होय । ब्रम्ह सत्य जगन्मिथ्या सोय । वेदान्त सांगे ॥ ६ ॥ तथापि सांख्य-शास्त्र आश्रयितां । तेथ निरूपिली पुरुषबहुता । ते देश-परिच्छेद तत्वतां । आत्मया आणी ॥ ७ ॥ आणि देशपरिच्छेद जया । अल्पता येत असे तया । गमनागमन उपाया । काळपरिच्छेदू ॥ ८ ॥ स्थिरचि जरी म्हणिजे । तरी आकाश व्याप्य जाणिजे ।

आकाशाविण बहुता सहजे । बुद्धी न घेई ॥ ९ ॥ आणि चैतन्यास व्यापणें नभा । तरी जडें व्यापिली चिद्‌भा । व्यापकाहोनी सामर्थ्ये स्वयंभा । व्याप्या नव्हे ॥ १० ॥ म्हणोनी देशपरिच्छेद घेतां देख । तरी न घडे जडचिद्विवेक । अविवेकें बंधन-दुःख । प्राप्त आहे ॥ ११ ॥ अथवा आकाशरहित स्थिती । तरी पुरुषास जडता प्राप्ती । कांहीं घेतली स्फूर्ती । तरी काल मानावा लागेल ॥ १२ ॥ देशपरिच्छेद कालपरिच्छेद तरी सहजे आला वस्तुच्छेद । जेथ परिच्छेद आहे त्रिविध । तें अल्प म्हणावें ॥ १३ ॥ जें अल्प तें विनाशी । छांदोग्यश्रुत्युक्ती ऐशी । सनत्कुमार नारदासी । अनुवादले ॥ १४ ॥ ' योवै भूमा तदमृतं । यदल्पं तन्मर्त्यं । छांदोग्य अध्याय ९ वा. जें पूर्ण तें नित्य । जें अल्प तें अनित्य । देशपरिच्छेदें अनित्य । परमाणु सम जरी घेतां ॥ १५ ॥ तरी न्यूनाधिक्य नसावें । सकल समसमान असावें । हेंही जरी स्वीकारावें । तरी समानता कैसी ॥ १६ ॥ समानता बुद्धीनें घेतां । तदा येईल सजातीयता । सजातीयाकार बुद्धी होता । तरी अवयविता पावेल ॥ १७ ॥ अवयवी होतां, होतील विभाग । विभाग होतां, न्यूनाधिक्य चांग । न्यूनाधिकत्वें बलनिर्बल प्रसंग । बलाबलें अभिभवे कालावच्छेदू ॥ १८ ॥ एवं पुरुषासी ये अनित्यता । जन्ममृतानुमानें घेतां । तरी स्वप्नींही जन्ममरणावस्था । एकीं पुरुषीं घडो शके ॥ १९ ॥ एवं सांख्यशास्त्र अप्रमाण । तथापि पुरुषबहुता वेगळी करून । विवेचावया जड, चित्-घन । सांख्यशास्त्र प्रमाण तें ॥ २० ॥ बद्ध चाळों न शके प्रकृती । मुक्तांची होय निष्कल स्थिती । स्वतंत्र मानतां जड प्रकृती । तरी चेतना-वश्यकता नसे ॥ २१ ॥ ज्ञानमात्रची घ्यावें चेतन । क्रियामात्र म्हणावें प्रधान । तरी क्रियेसी नियमी कवण । सत्वज्ञान तरी कैसें ॥ २२ ॥ पुरुषसंगें सत्वज्ञान । किंवा प्रकृतींत सत्वज्ञानपण । पुरुषसंगें म्हणतां तत्वज्ञान । तरी पुरुषांश बिंबन अवश्य लागे ॥ २३ ॥ बिंबे तो बद्धांश कीं मुक्तांश । बद्धचि असमर्थ, तंव समर्थ केवीं बद्धांश । बिंबे म्हणावा मुक्तांश । तरी प्रधान—सन्निधता ॥ २४ ॥ प्रधान असतां सन्निध । तरी मुक्तही होऊं शकेल बद्ध । प्रधान न बांधी तरी सुबुद्ध । प्रधान कैसें ॥ २५ ॥ माया मिथ्या म्हणोनी बिंबता । शुद्ध सत्वीं वदणें वेदान्ता । परी अंगीकारोनि प्रकृतिसत्यता । सांख्यशास्त्रीं बिंबता

केंवीं घडे ॥ २६ ॥ यालागीं पाहिजे ईश्वर । म्हणोनी योगाचार्यीं केला अंगीकार । परी पुरुषबहुत्वादि प्रक्रिया समग्र । सांख्यसम ॥२७॥ म्हणोनी सांख्यांत जी खंडनीय । ती योगांतही त्याज्य होय । परी सांख्यांत जी ग्रहणीय । तेथ योगाचा ईश्वर केंवीं घटे ॥ २८ ॥ ईश्वर जड कीं चेतन । जड तंव नाहीं म्हणोन । जड चेतनावीण । तिसरा नोहे ॥ २९ ॥ चेतन म्हणावा पुरुषविशेष । तरी प्रकृती लागली इतर पुरुषास । आणि तोचि राहिला पुरुष । वेगळा कैसा ॥ ३० ॥ सामर्थ्ये म्हणावे पूर्ण । तरी इतर चेतनीं कां सामर्थ्य उण । या लागीं पुरुषबहुता आणि ईश्वर भिन्न । हे सांख्य योगांतून त्यागावे ॥ ३१ ॥ तैसी त्यागावी प्रकृती-सत्यता । कारण, दोन पदार्थ सत्य होतां । तरी पदार्थासी व्यापक-सत्ता । कीं पदार्थता कल्पित-सत्ता घडे ॥ ३२ ॥ पदार्थावरुनी सत्तानुमान । कीं सत्ताज्ञानें पदार्थज्ञान । कीं सत्ता पदार्थ अभिन्न । भिन्न अथवा ॥ ३३ ॥ प्रथम पक्ष स्वीकारितां । तरी दोहोंहूनि तिसरी होईल सत्ता । आणि सत्ता भिन्न प्रकृती पुरुषां तत्वतां । असत्यता प्राप्त ॥ ३४ ॥ द्वितीयपक्ष स्वीकार । करितां, तरी सत्ताचि मुख्य निर्द्धार । पदार्थाऽभिन्न सत्ता म्हणतां साचार । तरी दोनपणा केवीं घडे ॥ ३५ ॥ अर्धे अर्धे वाटितां सत्ता । तरी दोहोंमध्यें सत्ता कीं असत्ता । दोहोंमध्यें म्हणतां सत्ता । तरी तीन सत्ता जाहल्या ॥३६॥ दोहोंमध्यें असत्ता म्हणतां । तरी जाहल्या दोन सत्ता । दोहोंची निश्चायक सत्ता । तिसरी एक ॥ ३७ ॥ तिहींची निश्चायक चौथी । एवं प्रसंगें अनवस्थिती । दोनपण न मानतां पुरुष प्रकृती । होतील एक ॥ ३८ ॥ एक जाहालिया पुरुष प्रधान । न संभवे विवेचन । विवेक न होतां बंधन । न सुटे कदा ॥ ३९ ॥ एवं तृतीय पक्ष गेला । चतुर्थ पक्ष स्वीकारिला । तरी द्वितीय खंडनोक्त आला । दोषसमुदाय ॥ ४० ॥ म्हणोनी प्रकृतिसत्यता पुरुषबहुता । आणि ईश्वराची भिन्नता हे सांख्य योगांतुनी वेगळी काढितां । तरी वेदांती ऐक्य पावती ॥४१॥ सांख्य योगांश करितां खंडण । द्वैताचें झालें निराकरण । अल्पज्ञ सर्वज्ञ चेतन । राहों न शके म्हणोनी ॥ ४२ ॥ विद्यारण्य मुनीश्वर । एवं विध वदले निर्द्धार । “ चित्रदीपक ” ग्रंथीं सुंदर । प्रमाण तें सांगों ॥ ४३ ॥

आत्मभेदो जगत्सर्वं ईशोऽन्य इति चेत्त्रयम् ।
त्याज्यते तैस्तदा सांख्ययोगवेदान्तसंमतिः ॥१॥

पूर्वींच बोलिला अर्थ । अथवा प्रक्रिया यथार्थ । ऐसें ही एक परमार्थ । देवो शके ॥ ४४ ॥ वेदांतीं पुरुषबहुता द्यावी जीवासी । ईशान्नता द्यावी मायाचालकासी । औपाधिककल्पन या अपेक्षेसी । अल्पज्ञता जीवासी सहजची ॥ ४५ ॥ जोंवरी झालें नाहीं ज्ञान । तोंवरी प्रकृतीचें सत्यपण ! एवं सांख्ययोगार्थ आकर्षोन । वेदांतीं आणोन मेळवावे ॥४६॥ 'वैय्यासिकन्यायमालेंत' । इतिविधची सिद्धांत । जीवेश्वरता व्यवस्थित । किंवा संकर ॥ ४७ ॥ यावरी उत्तरश्लोक । तो ऐकोत पुण्यश्लोक । जो 'भारतीतीर्थ' मुखीचा सम्यक । संशयच्छेत्ता ॥ ४८ ॥

श्लोक.

अंशोऽवच्छेद आभास इत्यौपाधिककल्पनैः ।
जीवेशयोर्व्यवस्था स्यात् जीवानां च परस्परम् ॥

एवं जीवेशव्यवस्था । सांख्य, योग वेदांता । संमतिकारक तत्वता । जाहाली आहे ॥ ४९ ॥ असो आतां समन्वय । हा श्रवणाचा विषय । येथ निदिध्यासनोपाय । बोलिजे मात्र ॥ ५० ॥ चेतनाचें सामान्य ज्ञान । हें जड, हें चेतन । सांख्यशास्त्रें निर्द्धारोन । घेयावें पैं ॥५१॥ जडावरूनी काढावें मन । चेतनावरी ठेवावें नेऊन । ही प्रक्रिया योगांतून । आश्रयावी ॥ ५२ ॥ मिथ्या कांहीं नाहीं । चेतन सर्वत्र सर्वीठायीं । एवं भेद टाकूनि लवलाही । निर्भय सुखी वेदांतें व्हावें ॥५३॥ अथवा प्राह्यांशसांख्यें आत्मज्ञान । जडाहूनी आत्मा भिन्न । प्राह्यांश योगें वैराग्य पूर्ण । जडाहुनी मन काढणें ॥ ५४ ॥ जड नाहीं म्हणोनी पुन्हा । विषयावरी जावों न द्यावे मना । या उपरमाच्या खुणा । वेदांतें कळती ॥ ५५ ॥ परी ही प्रक्रिया मध्यम । वेदांतदृष्टीनें पाहातां परम मन बुद्ध्यादि संभ्रम । जडचि होती ॥ ५६ ॥ मग जडाहूनि जड काय काढावें । ऐसें कोणीही न म्हणावें । अन्वयें पाहातां स्वभावें । चेतनही सकळ ॥ ५७ ॥ परंतु हे कासया वाद । जेणें निदिध्यासन होईल शुद्ध । आत्माकारवृत्ति सिद्ध । राहील ती प्रक्रिया घेयावी ॥५८॥

नानाविध प्रक्रिया । परी उपयोगी पडेल जी जया । ती ती उत्तम तया । आत्मज्ञानीं ॥ ५९ ॥

श्लोक.

यया यया भवेत्पुंसां व्युत्पत्तिः प्रत्यगात्मनि ।
सा सैव प्रक्रियेह स्यात् साध्वी साचानवस्थितिः ॥१॥

एवं सुरेश्वराचार्यमत । परी कांहीं स्वारस्य आहे यांत । आत्मज्ञाना प्रक्रिया असती बहुत । ऐसाचि अर्थ केवळ नव्हे ॥ ६० ॥ जिनें जिनें होईल आत्मज्ञान । ती ती प्रक्रिया समजोन । आम्हीं वेदांतीं करितो ग्रहण । " सा सैव प्रक्रियेह स्यात् " वचन या अर्थी ॥ ६१ ॥ ' एव ' या शब्दें करोनी पाहातां । स्वमत दुराग्रह न धरितां । आत्मज्ञान प्रयोजन मात्रता । स्वारस्य आहे ॥ ६२ ॥ स्पष्ट इतर शब्दार्थ । म्हणोनी हा परमार्थ । जाहाला जो सिद्धार्थ । सांख्य योग वेदांतीं ॥६३॥ सद्गुरू वचनीं ठेवोनि विश्वास । एवं सत्ता जाणावी विशेष । एकाग्र चित्तें अनुभवास । चैतन्य आणावें ॥ ६४ ॥ जड नाहीं तें मिळवावें कांहीं । आहे ब्रम्ह तें मिळविलें सर्वही । येणें परमानंदाची ग्वाही । प्राप्त होय ॥ ६५ ॥ एवं ही सांख्य योग वेदान्त । होय प्रक्रिया ऐक्य भरित । कैसाही मुमुक्षु ब्रम्हस्थित । होवावा मग कार्य झालें ॥ ६६ ॥

श्लोक.

आत्मानं विंदते यस्तु सर्वभूतगुहाशयम् ।
श्लोकेन यदि वार्द्धेन क्षीणं तस्य प्रयोजनम् ॥१॥

प्रमेय एक बलवंत । तें जाणावया प्रमाण स्थित । बहु प्रमाणापेक्षा नियमित । नव्हे येथ ॥ ६७ ॥ श्लोक अथवा अर्धश्लोकें । जो आत्मया जाणें निकें । सर्व भूतांचिया देखे । अन्तर्यामी ॥ ६८ ॥ सर्व भूतांचें अंतर । आधेय होय जयावर । आणि सर्वां धरता आधार । तोचि एक ॥ ६९ ॥ आश्रयाश्रित भिन्न प्रतीति । तयातें आधाराधेय म्हणती । समिध्या श्रुताश्रया भिन्नप्रतीति । अधिष्ठान म्हणती तया ॥ ७० ॥ या लागीं आधाराधेयकल्पना । तरी अभेदू ये द्वैतांगणा । म्हणोनी सर्वभूतगुहाधिष्ठाना । आणिजे वस्तू ॥७१॥ आधारज्ञानें आधेय पृथकता ।

अधिष्टानज्ञानें भ्रमनिवृत्तता । म्हणोनी अधिष्ठान संमत वेदांता । अनुभवें ही कष्ट न्यूनता दावी ॥ ७२ ॥ आधारबोधक वचन । बोधावया अर्भकमन । वस्तुतः अधिष्टान । ब्रम्ह आहे ॥ ७३ ॥ आतांवरी आधाराधेय । द्वैतानुसार निरूपिलें होय । ह्मणोनी तें उपेक्षिलें जाय । परी अद्वैतीं ठाय भिन्नार्थी ॥ ७४ ॥ आत्मयाची सामान्यसत्ता । भ्रांतिकालींही स्फुरे तत्वतां । यालागीं ते आधार समस्ता । प्रपंचासी ॥ ७५ ॥ आणि शुद्ध बुद्ध नित्यमुक्त । ऐसें ब्रम्ह जाणता यथार्थ । समूळ प्रपंच होय निवृत्त । यालागीं विशेषब्रह्म अधिष्टान ॥ ७६ ॥ एवं संक्षेप शारीरकांत । आधाराधिष्ठानभेद किंचित । बोलिलें स्वामी समर्थ । सर्वज्ञात्माचार्य ॥ ७७ ॥ आणि गुहाप्रविष्ठतासूत्रीं । बोलिली, ते अधिकारी चित्तपात्रीं । येरव्हीं अधिष्टानप्रतीति नेत्रीं । श्रोत्रियांचिया ॥ ७८ ॥ ह्मणूनि इतुकेंचि एक शास्त्र । पाठ असावें स्वतंत्र । तरीच ब्रह्मज्ञानप्रकार । कळों शकें, हा नियमू नोहे ॥ ७९ ॥ आपुलें मीपण बोधावया । किती शब्द येती उपाया । परी उपाधी मात्र बोधावया । शब्दजाल ॥ ८० ॥ तेवीं संशय शिष्यचित्तीं । म्हणोनी शास्त्रांच्या वाढती युक्ती । एरव्हीं श्लोक श्लोकार्धें निश्चिती । कळों शके ॥ ८१ ॥ एवं श्लोक अथवा श्लोकार्ध । पाहोनी जयातें जाहला बोध । तयाचें शास्त्रप्रयोजन प्रसिद्ध । जाहलें क्षीण ॥ ८२ ॥ ऐसें महाभारतीं । समर्थ व्यासाची उक्ती । निदिध्यासकधी । यावत् ख्याती दर्शविली ॥ ८३ ॥ क्षीण बोलिलें प्रयोजन । तें म्हणावें गौण । मुख्य प्रयोजन क्षीण । कदापि नोहे ॥ ८४ ॥ श्लोकार्धः—एतस्य कृतकृत्यत्वाच्छास्त्रमस्मान्निवर्तते । ऐसें गूढार्थदीपिकोपोद्घातीं । बोलिले मधुसूदनसरस्वती । आणि श्रीमदाचार्योक्ति । एवंविध ॥ ८५ ॥

## श्लोक.

श्लोकार्धेन प्रवक्ष्यामि यदुक्तं ग्रंथकोटिभिः ।
ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ॥१॥

त्रिकालाबाधित ब्रम्ह निर्मळ । जगन्मिथ्या मृगजळ । अन्य अर्थ केवळ । स्पष्ट आहे ॥ ८६ ॥ परी श्रवण मनन जयाचें । दृढत्वा आलें साचें । तयासाचि या वचनत्रयाचें । उपयोगीपण ॥ ८७ ॥ आणि

श्रवणापासोनी जया । करणें आहे उपाया । तेणें श्रुतियुक्ती समन्वया । आश्रयिजे ॥ ८८ ॥ आतां योगशास्त्रांतील । प्रक्रियाभाव बोलिजेल । परी जो उपयोगी पडेल । निदिध्यासनीं येथ ॥ ८९ ॥ ' अविद्यादि क्लेश पांच ' । शुक्लाऽशुक्लादि कर्म्म जाच । विपाक शरीरादि माच । सुखदुःखादि आशय ॥ ९० ॥ याहून वेगळा ईश्वर । आधीं भावावा प्रेमभर । आणि माझें ठायीं क्लेशादिक समग्र । काय म्हणोनी ॥ ९१ ॥ तरी ईश्वरासी नाहीं विषयसंग । आणि मज लागला विषय लाग । तो दुःखदायक हें समजोनी विराग । धरावा विषयीं ॥ ९२ ॥ अल्पज्ञता होय प्राप्ती । म्हणोनी अलंबुध्या रोधावी प्रमाणवृत्ती । अनुपयोगिता धरोनी चित्तीं । विपर्ययवृत्ती रोधावी ॥ ९३ ॥ जे पातंजली अविद्या होय । तीच वृत्ति विपर्यय । यथार्थ ज्ञानें करूनि होय । नाश तियेचा ॥ ९४ ॥ ते सांख्यातील विवेकज्ञान । घेऊनि विपर्यय मोडावा पूर्ण । अविपर्ययाचें रक्षण । विपर्ययानुपयोगें कीजे ॥ ९५ ॥ उपेक्षा रोधावी विकल्पवृत्ति । भावाऽभावपण त्यागोनि निश्चिती । ब्रम्हैकतानत्वीं 'निद्रा' वृत्ति । रोधूनि टाकावी ॥ ९६ ॥ विपर्ययें दुःखप्राप्ती । म्हणोनी रोधावी ती । कल्पितपणीं संस्कार उराविती । विकल्पवृत्ती रोधावी ॥ ९७ ॥ अज्ञानस्थित अभावप्रत्यय । तदा न राहे अभ्यास विषय । मन हें आत्मीय । होवो न शके ॥ ९८ ॥ धरितां निद्राभाव । तरी जागृतीं ये हा अनुभव । बळें दृढ करावा निद्राभाव । तरी जागृतीवीण नोहे ॥ ९९ ॥ जागृती सुटतां । तरी निद्रेंत परतंत्रता । म्हणोनी स्वयं समाधी तत्वतां । अभ्यासणें जागृतींतुनी ॥ १०० ॥ यालागीं निद्रा ही रोधावी । अखंड एक समाधी बोधाची । एक रसज्ञानें निरोधावी । ' स्मृति ' वृत्ति ॥ १ ॥ कालपरिच्छेद येईल । खिन्नाऽखिन्नता होईल । म्हणोनी स्मृती ही सबल । रोधिली पाहिजे ॥ २ ॥ तरी तदाकारवृत्ति । जी गुणाची राहे निश्चिती । पावोनी सर्वचेतनख्याती । गुणस्थिती ही सोडिजे ॥ ३ ॥ मग क्लेशादि रहित ईश्वर । तोचि आपण साचार । स्मृति गेलियामुळें निर्द्धार । काल परिच्छेदही गेला ॥ ४ ॥ ' इदानीम् घट ' या प्रतीतीनें । कालासही इंद्रियग्राही होणें । लागे, हें केलें बोलणें । वेदान्तपरिभाषाकारें ॥ ५ ॥ यालागीं काल निवर्ततां । आपुली कालत्रयीं परमानंदता । जीवेश्वर ऐक्यता । योगें ही होय ॥ ६ ॥ ऐसें ईश्वरप्रणिधान । ' ईश्वर प्रणिधा-

नाद्दा ' या सूत्रें करून । बोलिलें पैं संपूर्ण । पतंजली स्वामी ॥ ७ ॥ स्वप्न तैसें जग । हें स्वप्नज्ञान अवलंबोनि चांग । निद्रेचें संधिज्ञान हें अव्यंग । निद्राज्ञान ॥ ८ ॥ स्वप्नजगतूज्ञानें तुटे जगत् सत्यबुद्धि । निद्रा संधिज्ञानें न पडे अज्ञानावधि । सांपडे तूर्य ब्रम्हसमाधी । आपणवें सहज ॥ ९ ॥ ' स्वप्ननिद्राज्ञानावलंबनंवा ' । हें सूत्रही आलें गौरवा । प्रभू श्रीगुरुकृपाठेवा । काय न करी ॥ १० ॥ अथवा जे नामरूप मनीं येत । त्यांतील अस्ति, भाति, प्रिय, घेउनी यथार्थ । ऐक्य पावावे समाधिगत । संधिगत वा ॥ ११ ॥ बाधाभावविशिष्ट । ते अस्तित्व बोलिजे स्पष्ट । ज्ञानवृत्तिविशिष्ट । भातीपण ते ॥ १२ ॥ आणि प्रीति-वृत्यवच्छिन्न । आनंदाचें भान । वृत्तिसंधींत तीन । न स्फुरतां एक ॥ १३ ॥ वृत्यभाव चित्प्रकाश, समाधी । वृत्तिमध्य चित्प्रकाश संधी । ब्रम्हसुखाची सिद्धी । दोन्ही ठायीं ॥ १४ ॥ वृत्ति नामरूपीं येतां । तदा ध्यावें सगुण भगवंता । विषयावरी सर्वथा । येवों न द्यावी वृत्ति ॥ १५ ॥ भोजनादि समयीं जाण । ऐसें आचरण राहणें कठिण । परी विषय करितां भगवदर्पण । भक्तीनें तेंही साधे ॥ १६ ॥ एवं ' समाधिपाद ' गूढ । रहस्य निरूपिलें उघड । हा समाधी व्हावया दृढ । यमाद्यष्टांग ' साधनपादीं ' ॥ १७ ॥ एवंविध भगवंत । षष्ठ प्रसंगीं वदत । तो श्लोक प्रमाणार्थ । उपेगा ये ॥ १८ ॥

### श्लोक.

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म्म कारणमुच्यते ।
योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥१॥

योग साधनेच्छा जया । यमाद्यष्टांगें कारण तया । आणि योगारूढ जाहालिया । समाधीपादोक्त कारण शम ॥ १९ ॥ यम ते मानस धर्म । नियम ते वर्णाश्रमकर्म । आसनें होय इंद्रियदम । प्राणायामें शम मन पावे ॥ २० ॥ प्रत्याहार, धारणा, ध्यान । या तिन्हींनें एकाग्र पावे मन । एक होतां ध्याता ध्यान । समाधी मिळे ॥ २१ ॥ परी यमापा-सुनी प्रत्याहारावरी । कर्माची जाणावी कुसरी । कर्म कारण ह्मणोनी मुरारी । बोलिले जे ॥ २२ ॥ धारणेहूनि समाधीपर्यंत । बोलिजे शम शब्दार्थ । योगारूढासि उपेगा येत । तोचि एक ॥ २३ ॥ अथवा एक

ईश्वरभक्ती । येणें ही पावे योगस्थिती । श्रीएकनाथोक्ती । भागवती ऐसी ॥ २४ ॥ "योगी इंद्रियें कोंडिती । ते कोंडितांचि कष्टी होती । भक्त भगवंतीं अर्पिती । तेणें ते होती नित्यमुक्त" ॥ २५ ॥ श्रीहरीचें कृपेंकरून । समाधी अनायासें साधे पूर्ण । येऱ्हवीं नाना जन्म करितां साधन । कष्ट मात्र फुकाचे ॥ २६ ॥ शिवस्मरणें वैराग्यप्राप्ती । विष्णु-स्मरणें आत्मप्रीति । किंवा शिवस्मरणें दुःखनिवृत्ति । अखंड-तृप्ती हरि स्मरणें ॥ २७ ॥ श्रीहरीवांचून शिवस्मरण । करितां रसास्वाद विघ्न । आणि शिवावांचून विष्णुस्मरण । करितां तमोगुण विघ्न करी ॥ २८ ॥ यालागीं रमापती आणि उमापती । सप्रेमें ऐक्यत्वें भजावे चित्तीं । सहज ब्रह्माकारवृत्ती । होवो लागती तेधवां ॥ २९ ॥ एवंविध साधन-पाद । परी गोरक्ष-शतकीं भेद । दुसराही एक प्रसिद्ध । बोलिला आहे ॥ ३० ॥

श्लोक.

आसनेन रुजो हन्ति प्राणायामेन पातकं ।
विकारं मानसं योगी प्रत्याहारेण मुंचति ॥ १ ॥
धारणाभिर्मनोधैर्यम् ध्यानाच्चैतन्यमद्भुतम् ।
समाधौ मोक्षमाप्नोति त्यक्त्वा कर्म शुभाऽशुभं ॥२॥

सरळ आणि स्थिर । ऐसें होतां शरीर । तदा स्वच्छ वाहे रुधिर । नाडियांतुनी ॥ ३१ ॥ वीर्यही ठायींच्या ठायीं राहे । येणे रोगांचे बीज मोडोनि जाय । मग जे जे इंद्रियें केली लवलाहे । कर्में कांहीं ॥ ३२ ॥ प्राणायाम करितां । तरी नाडीसी येत शुद्धता । आणि शरीरासीही तत्वतां । होती कष्ट ॥ ३३ ॥ शरीरासी कष्टप्राप्ती । आणि भगवत्प्राप्तीची इच्छा चित्तीं । ह्मणोनी दुष्कर्में जळती । प्राणायामें ॥ ३४ ॥ भगवदिच्छेवीण । करितां प्राणसंयमन । तरी ते जलगामि-यासमान । व्यर्थ होय ॥३५॥ शुद्ध आणि अशुद्ध । ऐसें मन द्विविध । अमृतबिंदूपनिषद । एवं सांगे ॥ ३६ ॥ नानाकामसंकल्प मन । तें अशुद्ध ह्मणावें मन । प्रत्याहारें करून । नाश होय तयाचा ॥ ३७ ॥ शुद्ध मनाची दुर्बलता । धारणेनें नाशे तत्वतां । जेवीं निद्रेंतूनि पुरुष उठतां । तेवीं दुर्बलता शुद्धमना ॥ ३८ ॥ अशुद्ध मनाचिया हातीं ।

बहु दिवस शुद्धमनोवृत्ती होती । अशुद्धमन मेलियावरी, ती । निमिष-मात्र पावे दुर्बलता ।। ३९ ।। ती दुर्बलता जावयासाठीं । धारणेची पाहिजे पुष्टी । सर्वांभूतीं चैतन्य परिपाटी । ध्यानें शेवटीं हें मिळे ।। ४० ।। निर्गुण ध्यान करितां । तरी चैतन्य कळे तत्वतां । आणि सगुण ध्यान करितां । चैतन्य, आनंद दोन्ही कळती ।। ४१ ।। भक्तीनें मीपण होय क्षीण । अहंकार होय लीन । आणि सुषुप्ती सारिखें अज्ञान । तेंही न राहे ।। ४२ ।। तेथ ध्याता आणि ध्येय । या दोहींची ऐक्यता होय । समाधी सुखाची सोय । योगीही ह्मणती ।। ४३ ।। ह्मणोनी जो योगारुरुक्षू । तो यमादि करावया पाहिजे दक्षू । आणि योगारूढ झालिया मुमुक्षू । ब्रह्मादिदृक्षू शमादिकीं ।। ४४ ।। ते हे साधनपाद आणि समाधिपाद । भगवद्वाक्य प्रबोध । घेउनी तात्पर्य विशद । बोलिले कीरू ।। ४५ ।। समाधिपाद आधीं, मग साधनपाद । हा योगशास्त्र क्रम सिद्ध । आधीं साधन निरूपण, मग समाधी बोध । हा क्रम गीता श्लोकीचा ।। ४६ ।। परी पाठक्रमाहून । अर्थक्रम बलवान । या लागीं गीताश्लोक प्रमाण । विशेष आहे ।।४७।। परी हा गीताश्लोक परमसूत्र । याचें विवरण ' योगसूत्र ' । ' योगभाष्यादि ' पवित्र । ' सूत्रविवरण ' पुन्हा ।। ४८ ।। ह्मणोनी अभ्यास करणें जेव्हां । गीताश्लोक वत्साधन आधीं करणें तेव्हां । आणि योग-शास्त्र जाणणें जेव्हां । समाधीपाद तेव्हां आधीं पाहणें ।। ४९ ।। समाधीपादावरून । जो समाधी साधूं शके आपण । त्या साठीं नाहीं निरूपण । साधनादींचे ।। ५० ।। ' विभूती ' पादांत सिद्धिप्रकार । तो वर्जावा समग्र । ' कैवल्य ' पादांतील मोक्षसार । मिळेल तदा ।। ५१ ।। ' यमाद्यष्टांग ' निरूपण रीति । ते बोलिजेल ' योगप्रभाव ' ग्रंथीं । योगशास्त्र जितुके मिळे वेदांतीं । तितुकें येथ बोलिलें ।। ५२ ।। सांख्याचाही उपयोगी अंश । येथचि बोलिला निःशेष । सांख्य, योग, वेदान्तास । समन्वयही दाखविला ।। ५३ ।। डोळे दाबोनि रंगादि पाहाणें । किंवा श्वास नादादि लक्षणें । इत्यादि चित्तैकाग्रताकारणें । विभाग कल्पणें काहीं तरी ।। ५४ ।। परी मंत्र, योग, चक्र, आणि हठ, नाद, लय । हें या ' कांहीं तरींत ' घेवो नये । उपयोगी नाहींत ह्मणोनी ' वैशेषिक न्याय ' । ' पूर्व मीमांसादि ' उपाय वाळिले ।। ५५ ।। परी पूर्वमीमां-

सेतील कृती । आणि योगांतील विरक्ती । दोन्ही मिळवितां एके पांती । निष्काम कर्म्म हातीं मिळे ॥ ५६ ॥ न्याय वैशेषिकीं ईश्वरानुमान । तें दृढ करी उपासन । सांख्य योग वेदान्तोपयोग पूर्ण । बोलिलाची आहे ॥ ५७ ॥ दु:खध्वंस मुक्ती । ऐसें न्याय वैशेषिक ह्मणती । दु:खात्यंताभाव मुक्ती । वेदान्त ह्मणे ॥ ५८ ॥ एवं ग्राह्यांश घेवोनी । सारग्राहीदृष्टीपणीं । वृत्ती ब्रह्माकार करोनी । मिळवावें सुख ॥ ५९ ॥ ज्ञान, भक्ती, योग सौख्यदात्री । ज्ञानेश्वर माउली जगद्धात्री । मन ठेवुनी तत्कृपापात्रीं । पाय सुधीक्षेत्रीं पूजिलें ॥ ६० ॥

दोहा.

श्रीज्ञानेश्वर कृपामय, भवभयहारक मूर्ति ।
प्रेमें नमूं साष्टांगमति, निगम गाति यत्कीर्ति ॥१॥

हरि: ॐ तत्सत् श्रीज्ञानेश्वरकृपाप्रसादे नानाछन्दबद्धे सांख्य, योग, वेदान्तसमन्वयपूर्वक, योगवेदान्तमेलनोपयोगी बहुविधयोगप्रक्रियानिरूपणेन सांख्ययोगयोर्वेदान्तगतफल निरूपणं नाम सप्तम: समास: ।

हरि: ॐ तत्सत् श्रीज्ञानेश्वरार्पणमस्तु । शुभं भवतु ।



## श्रीमत्सद्गुरू ज्ञानेश्वर माउली समर्थ.

### अष्टम: समास:

फुल्लाब्जवृत्तम् ( वंगदेशीय पायरवृत्ताधारेण )

श्रीज्ञानेश्वर पाउली मन सदा वसे ।
केव्हां मा भववारिधी न नयनीं दिसे ।
भेदाभाव समस्त होउनि परैक्यता ।
भक्त्या दृष्टसुखास्थितौ सहजमुक्तता ॥१॥

चौपाई.

निगमागमनश्वर जाणुनि सारे । झाला जरि मुक्तहि तो बारे ।
दृष्टसुखार्थ तरी हरिभक्ती । करुनि साधिजे जीवत मुक्ती ॥ २ ॥

अभंग.

त्रिविध ती भक्ती बोलिली संतांनीं ।

कर्म्म-मिश्र आणि शुद्धा दूजी ॥ १ ॥
तिसरी ती भक्ती ज्ञानमिश्रा जाण ।
ज्ञानासह पूर्ण सत्ता तीची ॥ २ ॥
सहजाचि प्रभा तयांत लहरी ।
उल्हासाची परी स्वाभावीक ॥ ३ ॥
तेवीं आत्मप्रीती सहज उल्हासू ।
सगुण सौरसू भक्ती ते कीं ॥ ४ ॥
ज्ञानेश्वर प्रभू करुणें कळत ।
ज्ञानें ऊजळत चित्त जेव्हां ॥ ५ ॥

## दोहा.

दृढ अपरोक्ष ज्ञान जरी, तरि मृति मुक्ति विलास ।
यास्तव दृष्टसुखार्थ ही, करणें पुनरभ्यास ॥

## दोहा.

मनोनाश, वासनाक्षयो, रक्षण तत्वज्ञान ।
ज्ञानियास कर्त्तव्यता वदले मुनि सज्ञान ॥

( मुनी ह्मणजे विद्यारण्यस्वामी. )

## गद्य.

यद्यपि ज्ञानानंतर प्रारब्धनिवृत्तीवांचून अन्य कोणतीही अपेक्षा उरत नाहीं; निमूटपणें प्रारब्धक्षयाची वाट पहात बसून कर्तव्यता शून्य रहावें, असें अद्वैत सिद्धींत मधुसूदन स्वामी बोलिले, तें सत्य आहे, तथापि ज्ञानानंतर ममतारूपदु:खनिवृत्ति होऊन अहंतारूप दु:ख भोगावें लागते, असें वामनपंडित ह्मणतात, तेंही अन्यथा नाहीं. परंतु योगवासिष्ठांत वसिष्ठ ह्मणतात:—

## श्लोक.

तत्वज्ञानं मनोनाशो वासनाक्षय इत्यपि ।
एकत्र त्रितयाऽभ्यासाज्जीवन्मुक्तिर्दृढा भवेत् ॥

या प्रमाणें तत्वज्ञान, मनोनाश आणि वासनाक्षय यांचा एक कालीं अभ्यास सांगितला आहे; त्यावांचून जीवन्मुक्ति होत नाहीं. पुन्हां त्याच ग्रंथांत विश्वामित्रानें वसिष्ठाला रामाविषयीं प्रशंसा करितांना ह्मटलें आहे:—

स्वात्मतत्त्वाभिगमनं प्रायशो भवति नृणाम् ।
मुने विषयवैरस्यं कदर्थादुपजायते ॥

विश्वामित्र ह्मणतात, हे वसिष्ठ मुने ! आत्मज्ञान एकवेळचे सहज होऊं शकेल, परंतु विषयांपासून चित्त निघणें कठीण आहे. श्रवणादिकेकरून अपरोक्षज्ञान झालें तथापि विरक्त्याद्यभ्यास ज्ञानानंतर ही करावा, हा या श्लोकाचा अभिप्राय आहे. साधनचतुष्टयसंपन्न मुमुक्षूला तर तो सहज सिद्धच असतो. परंतु साधनचतुष्टयसंपन्न न होऊन ज्याला आकाशफलपातवत् महावाक्यार्थ समजला, त्यानें ज्ञानानंतर विरक्त्याद्यभास स्वतंत्र करावा. हें निरूपण सोपानसिद्धींत स्पष्ट केलें आहे. व जीवन्मुक्तिविवेकांत स्वामी विद्यारण्यांनींही चांगलें प्रतिपादन केलें आहे; आणि विरक्ती, उपरती असल्यावांचून दृष्टदुःखनाश होत नाहीं, असें चित्रदीपांत प्रकारांतरानें सांगितलें आहे. ह्मणून अद्वैत सिद्धींतील वचन विदेहमुक्तिअभिलाषपर आहे. अन्यथा अद्वैतसिद्धिकारांच्या भक्तिरसायन, गूढार्थदीपिकादिग्रंथस्थ भक्तिप्रतिपादकवाक्याशीं विरोध येतो. सारांश दृष्टदुःखनिवृत्ति, ज्ञानानंतर अपेक्षित आहे. दृष्टसुखप्राप्ती तर अपेक्षित नाहीं. कारण कीं दृष्टसुख तर विषयजन्य आहे, त्याचा ब्रह्मनिष्ठाचेठायीं विरक्ति अभ्यास वचनानें निषेध प्राप्त होतो, हें यद्यपि सत्य आहे, तथापि विरक्त्युपरत्यभ्यासानें दृष्टदुःखनिवृत्ति होते. परंतु भगवद्भक्तीनें विरक्त्युपरत्याद्यभ्यास साधून दृष्टदुःखनिवृत्ति आणि दृष्टपरमानंदप्राप्ती होते. ननु भक्तांच्या प्रारब्धाचा भोगावांचून नाश होतो कीं काय ? तर नाहीं, असेंच आमचें उत्तर आहे. परंतु अभिभव मात्र होतो. अद्वैतकौस्तुभकारांनींही जीवन्मुक्तीच्या अभ्यासानें प्रारब्धाचा अभिभवच मानला आहे. त्या प्रारब्धाऽभिभवानें दुःखमात्र भासत नाहीं. ही केवळ ज्ञानानंतर भक्ति करणारांचीच गोष्ट झाली, परंतु जन्मीचे प्रथमपासूनच मुक्ति अवस्थेपर्यंत जे भक्त असतात, त्यांचें दुःखरूप प्रारब्धच नसतें, हें मधुसूदनस्वामींनीं गूढार्थदीपिकेंत सांगितलें आहे. अस्तु. या ठिकाणीं दृष्टपरमानंद ह्मणजे विषयसुख नव्हे. कारण विषयसुखाचे ठिकाणीं जरी दृष्टता आहे, तरी व्यभिचारित्वामुळें त्याचेंठिकाणीं परमानंदता नाहीं. आणि अनभ्यस्तविवर्ताच्या नित्यत्वामुळेंच भक्त्यानंदाचें ठिकाणीं अव्यभिचारित्व आहे;

ह्मणून तिचेठिकाणीं दृष्टपरमानंदता आहे. अन्वयानें सगुणभक्ती आत्मप्रीतीचा उल्हास होय, हें पूर्वींच सांगितलें आहे. आणि ' अव्यभिचारेण भक्तियोगेन ' हें भगवंताचें वचनही याला प्रमाण आहे भगवद्भक्तीनें दृष्टपरमानंदप्राप्ती मधुसूदनस्वामींनी भक्तिरसायनांत सांगिलली आहे. ते म्हणतात,

" भगवान् परमानंदस्वरूपः स्वयमेव हि ।
मनोगतस्तदाकारः किमन्यदवशिष्यते " ॥

येथें ' आकार ' शब्दावरून सगुण परमात्माच घेतला आहे. परंतु तो मायागुणांनीं रहित असा समजावा. " किमन्यदवशिष्यते " या वाक्यावरून त्याला ज्ञान मिळविणें ही शेष रहात नाहीं, असा अभिप्राय निघत असल्यामुळें, ज्ञानानंतर ही सगुणभक्ती सांगितली आहे; आणि तिच्या योगानें परमानंदप्राप्ती ' भगवान् परमानंदः ' " मनोगत " इत्यादि शब्दांनीं दर्शविली आहे. हरीच्या गुणाविषयीं वर्णन करतांना, श्रीमद्भागवतांत " निवृत्ततर्षैरुपगीयमानात् " असें परीक्षितीनें ह्मटलें आहे. आणि " आत्मारामाश्च मुनयो निर्ग्रंथाअप्युरुक्रमे । कुर्वन्त्यहैतुकीं भक्तिमित्थंभूतगुणो हरिः " ॥ या प्रमाणें शुकाचार्यानें ही म्हटलें आहे. परीक्षिती शिष्य आणि श्रीशुकाचार्य गुरू या दोघांचाही अभिप्राय एकच पडल्यामुळें, आणि भागवत हें शास्त्र असल्यामुळें, भागवतांत शास्त्रप्रतीतीनें, शुकवाक्यावरून गुरुप्रतीतीनें, आणि परीक्षितीच्या आत्मप्रतीतीनें, ज्ञानानंतर भक्तिदार्ढ्य सिद्ध आहे. याला श्रुती भगवती ही संमती देते. " यं सर्वे देवा नमन्ति मुमुक्षवो ब्रम्हवादिनश्च. " ब्रह्मवादीही नमस्कार करितात, यावरून ज्ञानानंतरच भक्तीची सिद्धी होते. या प्रमाणें सौषुप्तश्रुती आहे. तशी जागृत श्रुतीही आहे.

" ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ "

योगनिद्रेंत वेद निश्वास असल्यामुळें त्याला सौषुप्त श्रुती म्हटलें आहे. आणि गीता प्रत्यक्ष सांगितल्यामुळें तिला जागृत श्रुती म्हटलें आहे. गीतेची प्रशंसा करितांनां ज्ञानेश्वर महाराजांनींही असेंच म्हटलें आहे.

एवं वेदाचें मूळ सूत्र । सर्वाधिकारैक पवित्र । श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥ १ ॥ येथ गीता मूळ वेदां । ऐसें केविं पां आलें बोधा । हें ह्मणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगों ॥२॥ तरी जयाच्या निःश्वासी । जन्म जालें वेदराशी । तो सत्यप्रतिज्ञ पैजेसि । बोलिला स्वमुखें ॥ ३ ॥

तात्पर्य, ज्ञानानंतर, भक्ती दृष्टदुःखनिवृत्ति आणि दृष्टपरमानंद प्राप्तिदात्री आहे. ही भक्ति ज्याचे ठिकाणीं जितकी असेल, तितकीच त्याचे ठिकाणीं दृष्टपरमानंदप्राप्ती आहे. अद्वैतकौस्तुभांतही ज्ञानानंतर मनोनाशाद्यभ्यासाच्या तारतम्यामुळें, जीवन्मुक्तीच्या दृष्टसुखाविषयीं तरतमभाव बोलिला आहे. " दृष्टसुखं तु तारतम्येन भवति " अद्वैत कौस्तुभ व अन्यग्रंथांतही असेंच म्हटलें आहे. तत्र

श्लोक.

तारतम्येन सर्वेषाम् चतुर्णां सुखमुत्तमम् ।
तुल्या चतुर्णां मुक्तिः सा दृष्टसौख्यं विशिष्यते ॥

चतुर्णां ह्मणजे ब्रह्मवित्, ब्रह्मविद्वर, ब्रह्मविद्वरीयान्, आणि ब्रह्मविद्वरिष्ठ यांचीं लक्षणें पुढें येतील.

अद्वैतसिद्धींत जो मुक्तौ तारतम्य—भंग सांगितला, तो विदेहमुक्तीविषयीं जाणावा. या स्थानीं हें रहस्य आहे. ज्ञानानंतर मनोनाशाद्यभ्यासाचें केवळ दृष्टदुःखनिवृत्ति जसें फल आहे, तसें तें भगवद्भक्तीचें फल नाहीं. तर दृष्टदुःखनिवृत्ति आणि दृष्टपरमानंदप्राप्ति भक्तीचें स्वरूपच आहे; ह्मणून भक्तीच फलरूपिणी आहे. असें ' स्वयं फलरूपतेति ब्रह्मकुमारः ' या सूत्रानें श्रीनारदस्वामींनी प्रतिपादन केलें. आणि

जीवन्मुक्तिदशायान्तु न भक्तेः फलकल्पना ।
अद्वेष्टृत्वादिवत्तेषां स्वभावो भजनं हरेः ॥

अद्वेष्टृत्वादिगुणवत् जीवन्मुक्तांचेठिकाणीं भक्ती रहाते, असें सांगून मधुसूदनांनी ही भक्तिफलपार्थक्याचा निषेध केला.

भक्तीचे ' ज्ञानमिश्रा ' हें विशेषण अद्वैतज्ञान आणि माहात्म्यज्ञान दाखविण्यासाठीं आहे. " तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः " ह्या सूत्रानें भक्तांनां माहात्म्यज्ञानाचा स्वीकार नारदस्वामीनीं केला आहे. ज्ञानानंतर जी ही भक्ती सांगितली, ती साकारपरमेश्वराविषयीं

मात्र समजावी. कारण निराकारोपासनेचा अभ्यास करतांना अत्यंत क्लेश आहेत असें भगवंताचें वचन आहे ह्मणून. तद्यथा.

" क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ताहि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ "

आतां तो साकार परमात्मा प्रतिबिंबाकृति नसून बिंबरूप परमेश्वराचा किंवा ब्रह्माचाच कनकालंकारादिवत् अनध्यस्त–विवर्त आहे. " अभिन्नसत्याऽपररूपत्वे सति भेदाभानपूर्वकमधिष्टानज्ञानानावरकत्वे सतिच प्रीतिमात्रत्वादधिष्टानज्ञानाऽनिवर्त्यमनध्यस्तविवर्तलक्षणम्. " हें अनध्यस्तविवर्ताचें लक्षण होय. आणि " अपररूपत्वे सति भेदभानपूर्वकमधिष्टानज्ञानावरकत्वे सतिच अधिष्टानज्ञाननिवर्त्यमध्यस्तविवर्तत्वम्, " हें अध्यस्तविवर्ताचें लक्षण होय. ह्यांतून अनध्यस्तविवर्तसंबंधी निरूपण भक्तिपद्तीर्थामृतादि अनेकस्थानीं पहावें. हा अनध्यस्तविवर्त ब्रम्हाचा किंवा बिंबभूत परमेश्वराचाच आहे; प्रतिबिंबाचा किंवा मायेचा नाहीं. बिंबभूत परमेश्वराला किंवा ब्रह्मालाच ' ईश्वर ' आणि अविद्योपाधिक अध्यस्ताला किंवा प्रतिबिंबाला ' जीव, ' दृष्टिसृष्टिवादी ह्मणतात, असें मधुसूदनस्वामीनीं सिद्धान्तबिंदूंत दर्शविलें आहे. या स्थानीं आणखी हें रहस्य आहे कीं, बिंबभूत ईश्वर, हे साकार भगवच्छरीर मानलें तर तें ब्रह्माचा अनध्यस्तविवर्त आहे. आणि ब्रम्ह व तें भिन्न नाहीं. येणें करून जीवपक्ष ही व्यावृत्त होतो. अतो सा भगवद्भक्तीच ज्ञानानंतर अपेक्षित आहे, हें सिद्ध झालें. या विषयीं श्रुतिसंमतीही सांपडते.

" आत्मक्रीड आत्मरतिः क्रियावानेष ब्रह्मविदां वरिष्ठः " ह्या श्रुतीचा अर्थ अद्वैतकौस्तुभांत एवंविध केला आहे. " तत्त्वमसि " महावाक्याच्या विचारानें " अहंब्रह्मास्मि " अशा प्रकारची ज्याची दृढ अपरोक्षज्ञानमय वृत्ति झाली, तो आत्मक्रीड म्हणावा. कारण तो नेहमीं आत्म्याचें ठायींच रमत असतो. दृढ अपरोक्षज्ञान झाल्यावरही बाधितानुवृत्तीनें जो विजातीय प्रपंच भासतो, तत्तिरस्कारपूर्वक दृढ अपरोक्षानंदाचें रक्षण करणारा आत्मरति म्हणावा. क्रिया म्हणजे ब्रह्मज्ञान. ह्याच्या योगानेंच ब्रह्मात्म्यैक्यसमाधी दृढ होतो. या श्रुतीचाच अर्थ वसिष्ठाचार्यांनीं ज्ञानभूमिकासप्तक वर्णन करितांना

चवथ्या भूमिकेपासून सातव्या भूमिकेपर्यंत दर्शविला आहे. प्रथम शुभेच्छादि तीन साधन भूमिका सांगून, पुढें सत्वापत्यादि चार फल भूमिका सांगितल्या आहेत. सत्व ह्मणजे ब्रह्म; त्याची ज्या भूमिकेवर आपत्ति होते, ती सत्वापत्ति ह्मणावी. म्हणजे पूर्वपरोक्षत्वेंकरून जे ज्ञात ब्रम्ह, तें या भूमिकेवर अपरोक्ष होतें. ह्यालाच ब्रम्हविन् ह्मणतात. आणि ह्या चार भूमिकांच्या अभ्यासानें, अविद्या आणि तिचें कार्य जो संसार, त्याचें ठिकाणीं आसक्ती रहात नाहीं—म्हणजे विजातीय वृत्तींचा तिरस्कार होतो. हिलाच असंसाक्ति म्हणतात. इच्यावर जो आरूढ, तो ब्रम्हविद्वर ह्मटला जातो. ब्रह्माच्या ध्यानानेंच जेव्हां इतर कोणताही पदार्थ दिसत नाहीं, तेव्हां साधक पदार्थाभाविनीनामक सहाव्या भूमिकेवर आरूढ झाला म्हणून समजावें. अत्रारूढालाच ब्रम्हविद्वरीयान् अशी संज्ञा आहे. ह्या भूमिकेवर साधक स्वतःच्या इच्छेनें व्युत्थितचित्त होत नाहीं, किंतु दुसऱ्याच्या इच्छेनें होतो. आणि ब्रम्ह ध्यानानेंच ग्रहणत्यागरहित एकरसवृत्तिनेंच स्वभावनिष्ठसमाधिमान् जेव्हां साधक होतो, तेव्हां तो पूर्ण सातव्या तुर्यगा नामक भूमिकेवर आरूढ झाला ह्मणून समजावें. ह्यालाच ब्रह्मविद्वरिष्ट ही संज्ञा आहे. भगवान् वसिष्ट ह्मणतात, सातव्या भूमिकेवर जो गेला आहे, तोच जीवन्मुक्त ह्मणावा. कारण त्याला सुखदुःख बाधा करीत नाहींत. तो आपल्या किंवा दुसऱ्याच्या इच्छेनें व्युत्थान ही पावत नाहीं, असें अद्वैतकौस्तुभकार ह्मणतात. परंतु सातव्या भूमिकेवर गेलेला ही पुरुष लोकीं विचरतो, असें वसिष्टानें ह्मटलें आहे, ह्मणून तेंच अधिक प्रमाण आहे. तरी, अद्वैतकौस्तुभकारांचें ह्मणणें समाधीविषयीं आणि वसिष्टाचार्यांचें ह्मणणें संधी विषयीं लाविलें असतां विरोध येत नाहीं. भक्तांची दशा वसिष्ठवाक्याप्रमाणेंच असते. या प्रमाणें या श्रुतीचा अर्थ सांगितला. श्रुतींत जें ब्रह्मध्यान सांगितलें आहे, तें सगुणध्यानच असलें पाहिजे. कारण, निर्गुणध्यान करणाऱ्याला साधकदशेंतच अतिशय क्लेश सांगितले आहेत. आणि सिद्धदशेंत तर त्याला निर्गुण ब्रह्माचें ज्ञान होऊन गेलें असतें. शिवाय, सिद्धदशेंत निर्गुण ब्रह्म ध्यानाच्या क्लेशापेक्षां प्रारब्ध कर्म्म भोगण्याचे क्लेश कमी आहेत, हें अनुभवानें ही सिद्ध असल्यामुळें, श्रुतीनें सगुण ध्यानच सांगितलें

असलें पाहिजे. ज्याप्रमाणें ब्रह्मवेत्ता झाल्यावर ही असंसक्त्यादि तीन भूमिका अभ्यसनीय आहेत, त्याप्रमाणेंच "तस्यैवाऽहं" "ममैवासौ" "स एवाहं" इति त्रिधा, या वाक्यांत सांगितलेली तीन प्रकारची भक्तीही आवश्यक आहे. कारण, हें वाक्य मधुसूदनस्वामींनीं "सर्व धर्मान्परित्यज्य" या श्लोकाच्या टीकेंत ज्ञानी भक्तांविषयींच बोलिलें आहे. आणि भक्तियोगानेंच समाधी होतो असें घेरंडाचार्य ही ह्मणतात. ज्ञानानंतर ही असंप्रज्ञात समाधी करावा; असें योग वार्तिककाराचें मत आहे. तो समाधी भक्तियोगानेंच साधत असल्यामुळें भगवदेकनिष्टानां भक्तीतरापेक्षा नाहीं. तृप्तिदीप आणि विद्यानंद ग्रंथांत ज्याला विक्षेप होत असतील त्यांनीं समाधी करावा. मी समाधी कशाला करूं असा मुक्तवृत्यभिप्राय सांगितला, तो विवेक दशेंतील निरंकुशा तृप्तीविषयीं समजावा. कारण विवेकी आणि योगी यांचा आपआपल्या दशेंत समाधीच असतो, असें आत्मानंद ग्रंथांत सांगितलें आहे. तात्पर्य, व्युत्थान—दशा-विनिवारणार्थ जीवन्मुक्ती अभ्यास करणें आवश्यक आहे, असें तृप्तिदीपादि—ग्रंथकारांनींच स्वकृत जीवन्मुक्ति विवेकांत ह्मणून ठेविलें आहे. तो जीवन्मुक्ति अभ्यास भक्तीनें सहज साधतो; आणि स्वामी विद्यारण्यांनीं सांगितलेल्या विरक्ति उपरती, भक्तांच्या आंगीं सहजच येतात. या विषयीं विख्यात भक्त भगवद्विभूती श्रीतुकाराम महाराज ह्मणतातः—

अभंग—विषयीं विसर पडला निःशेष। अंगीं ब्रह्मरस ठसावला ॥१॥
माझी मज झाली अनावर वाचा। छंद या नामाचा घेतलासे ॥२॥
लाभाचिया सोसें पुढें चाले मना। धनाचा कृपणा लोभ जैसा ॥३॥
तुका ह्मणे गंगा सागरसंगमीं। अवघ्या झाल्या ऊर्मी एकमय ॥४॥

या प्रमाणें भक्तीनेंच व्यतिरेकरूप पांचवी सहावी भूमिका साधत असून सातवी जी अन्वयरूप भूमिका तीही भक्तीनेंच साधते, हें तुकाराम महाराजाचे वाक्यावरून सिद्ध होते.

अभंग.

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास। गेले आशा पाश निवारूनी ॥१॥
विषय तो त्यांचा झाला नारायण। नावडे धन जन मातापिता ॥२॥
निर्वाणीं गोविंद असे मागें पुढें। कांहींच सांकडें पडों नेदी ॥३॥

तुका ह्मणे सत्य कर्मा व्हावे साह्य। घातलीया भय नरका जाणे ॥ ४ ॥

ह्मणजे अन्वयब्रह्मरूपानेंच विश्व हें सगुण भगवंताचें स्वरूप आहे असा त्यांचा अनुभव असतो, हें पहिल्या वाक्यानें सांगून, विषय त्यांनां सगुणरूपावांचून विषयरूपानें दिसत नाहींत, हें " नावडे धन जन " इत्यादि शब्दांनीं सांगितलें आहे. अशा प्रकारची अद्वैतभक्ती क्रियारहित, अकृत्रिम श्रीज्ञानेश्वर महाराजांनींही अमृतानुभव आणि ज्ञानेश्वरींत दर्शविली आहे.

ओवी.

कोणी एक अकृत्रिम । भक्तीचें हें वर्म ॥
योगज्ञानादिविश्राम । भूमिका हे ॥ १ ॥

अमृतानुभव अ० ९

तैसी क्रिया कीर न साहे । परी अद्वैती भक्ती आहे ॥
हें अनुभवाचि जोगे नोहे । बोलण्या जोगे ॥ १ ॥

ज्ञानेश्वरी अ० १८.

या प्रमाणें ज्ञानेश्वर महाराजांनींही जीवन्मुक्तींत अद्वैतभक्ती सांगून, विदेहमुक्तींतही राहते, परंतु अनुभवावांचून बोलतां येत नाहीं, असें अभिप्रायानें दर्शविलें आहे. कारण ज्ञानेश्वरींतच अर्जुनाचें म्हणणें एका ओवींत असें दाखविलें आहे कीं—

ओवी.

आम्हां भोग मोक्षाचिये ठायीं । श्रीमूर्तीवांचूनि नाहीं ॥
म्हणूनि तैसाचि साकार होईं । हे उपसंहारी आतां ॥१॥

ज्ञानेश्वरी, अ० ११.

यांत भोग म्हणजे जीवन्मुक्तिस्थच समजावा. सांसारिक भोग समजूं नये. कारण सांसारिक भोग सर्व जीवांनां आहेत. तसी श्रीमूर्ती सर्व जीवांनां सुलभ नाहीं. म्हणून भोग म्हणजे जीवन्मुक्ती व मोक्ष म्हणजे विदेहमुक्ती असा अर्थ करावा. पण विदेहमुक्तांचा अनुभव वाणीचा विषय नसल्यामुळें, तेथें भक्ती अनुभवायोग्यच राहते, असें श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वर महाराजांचे ह्मणणें यथार्थ आहे. आतां कोणी ह्मणेल कीं विदेहमुक्तींत भक्ती राहणें शक्यच नाहीं, तर त्याला आम्ही

असें विचारतो कीं असें जें तुला वाटलें तें जीवन्मुक्ति दशेंत वाटलें, कीं विदेहमुक्तींत वाटलें ? कीं बद्धदशेंत वाटलें ? पहिल्या पक्षीं तुला विदेहमुक्तीची कल्पना आली कशी ? सारांश तुझ्या आंगीं आतांच भक्ती नसल्यामुळें, विदेह मुक्तींत भक्ती रहात नाहीं, असें तुला वाटलें असलें पाहिजे. दुसऱ्यापक्षीं, तेथें भक्ती रहात नाहीं हें तूं सांगावयाला आलास कसा ? कारण " न स पुनरावर्तते " अशी श्रुतीही आहे, आणि " यद्गत्वा न निवर्तंते " अशी जागृत श्रुतीही आहे. तिसऱ्या-पक्षीं तुझें ह्मणणेंच प्रमाण नाहीं. कारण तूं तर्काचे स्वाधीन होऊन समर्थांच्या वाक्याचें खंडण करूं पाहतोस ! ननु, ज्ञानेश्वर महाराजांनीं तरी विदेहमुक्तीचा अनुभव जीवन्मुक्तींत कसा सांगितला. अशी तुला शंका येईल तर त्याचें उत्तर असें आहे कीं समाधिगत ब्रम्हानुभव आणि विदेहमुक्ती एकरूपच आहेत. कारण समाधी आणि विदेहमुक्ती हे दोन्हीही वाङ्मनोगोचर नाहींत. भक्तांनांही विदेहमुक्ती स्वेच्छेनें होते, पण भक्तीवांचून ज्ञानियाला प्रारब्धभोग संपेपर्यंत वाट पहावी लागते. या ब्रह्मज्ञानपूर्वक समाधींतूनच कधींही व्युत्थान न झालें ह्मणजे विदेहमुक्ती झाली ह्मणून समजावी. शरीरपात प्रारब्धकर्माच्या संप-ण्यावर अवलंबून आहे, विदेहमुक्ती सत्वावर अवलंबून नाहीं. म्हणून ज्ञानेश्वर महाराजांनीं घेतलेल्या समाधींत ते पूर्ण विदेहमुक्त आहेत, असा आमचा निश्चय आहे.

यास्तवच आळंदींतील समाधिदर्शनादिकांनीं ही मुमुक्षु पूर्ण होतो. आणि श्रीज्ञानेश्वर महाराज ईश्वर असल्यामुळें त्यांचें शरीर अनध्यस्तविवर्तरूप आहे. म्हणून ते सहजच अधिष्ठानज्ञानप्रतिबंधक नसल्यामुळें आणि त्यांनां प्रारब्धही नसल्यामुळें तत्पातावश्यकता अपे-क्षित नाहीं. माझें मायामय शरीर ज्ञानप्रतिबंधक नसल्यामुळें, ऐन्द्रजा-ली जसा आपल्या मायेचा उपसंहार करतो, तसा उपसंहार मीं आपल्या शरीराचा करीत नाहीं असें गीतेच्या टीकेत चतुर्धराचार्यांनीं भगवंताचे म्हणणें स्पष्ट केलें आहे. तेंच तात श्रीज्ञानेश्वर महाराजाविषयीं ही समजावें असो. हा विदेहमुक्त्यनुभव स्वप्रतिबंधरहित जगत्कृपानिष्ठावतरण दशेंत ज्ञानेश्वर महाराजांनीं सांगितलेला, म्हणून तत्प्रमाण वैदिकप्रमाण व दृबाधित होते. तर मग समाधींत आम्हालाही विदेहमुक्तीचा अनु-

भव आहे, असें तूं म्हणशील तर, होय असला पाहिजे असें आम्ही ही म्हणतो. परंतु सर्वांचा अनुभव ज्ञानपूर्वक समाधींत एकरूपच असला पाहिजे. तुझा अनुभव समर्थांशीं जुळत नसल्यामुळें, तूं समाधी समजून भलत्याच कोणत्या तरी दशेचा अनुभव घेतला असला पाहिजेस कारण तुझी वादाकडे प्रवृत्ति दिसते. आणि आचार्य तर म्हणतात कीं—" देहेऽहंमतिरुज्झ्यतां बुधजनैर्वादः समुत्सृज्यताम् " आणि तूं तर समर्थांशीं स्पर्धा करायला पाहतोस ! ह्मणून तुझें ह्मणणें प्रमाण नाहीं. तातवाक्यावरून आमचें ह्मणणें परमसिद्ध आहे. इतकेंही करून तूं ज्ञानाचा एक वेळ अभिमान धरशील तर, ज्ञानियालाही ईश्वराच्या इच्छेनें मोह पडतो, हें प्रमाणावरून सिद्ध आहे. मार्कंडेयपुराणांत एके ठिकाणीं असें ह्मटलें आहे कीं—

### श्लोक.

ज्ञानिनामपि चेतांसि देवी भगवती हि या ॥
बलादाकृष्य मोहाय महामाया प्रयच्छति ॥१॥

तात्पर्य, भगवंताच्या भक्ती वांचून, ज्ञानियालाही भीति आहे, हें तुकाराम महाराजांच्या वाक्यावरूनही सिद्ध असल्यामुळें भगवद्भक्तीच ज्ञानानंतर विहित आहे, असें आह्मी स्पष्ट ह्मणतो. तें वाक्य असें.

### अभंग.

ज्ञानियांचे घरीं चोजवितां देव । तेथें अहंभाव पाठीं लागे ॥ १ ॥
ह्मणोनिया अवघे सांडीले उपाय । धरियेले पाय दृढ तुझे ॥ २ ॥
वेदपरायण पंडित वाचक । न मिळती एक एकामधीं ॥ ३ ॥
पाहों गेलों भाव कैसी आत्मनिष्ठा । तेथें देखे चेष्टा विपरीत ॥ ४ ॥
आपुलिया नाहीं निवाले जे अंगें । एकी करती रागें गुरू गुरू ॥ ५ ॥
तुका ह्मणें मज कोणाचा पांगिला । नकोबा विठ्ठला करूं आतां ॥ ६ ॥

परंतु हीं वाक्यें विद्युद्वत् परोक्षज्ञान होऊन पुनर्विक्षेपाला चिकटणाऱ्या विषयीं आहेत. पुनर्विक्षेपाचे निरूपण, सादिभ्रम या पर्यायानें, 'पुष्प' ग्रंथांत केलें आहे, तें पहावें. खऱ्या ज्ञानियाविषयीं नाहींत कारण, खऱ्या ज्ञानियांचा तर भक्ती हा स्वभाव असतो असें वर मधुसूदनोक्त श्लोकांत सांगितलेंच. असो, आतां प्रथम निदिध्यासन

दशेंतही ह्या भगवद्भक्तीचा आश्रय करून साक्षात्कारदशेंत तिची पूर्णता कशी होते, हें ओवीछंदेकरून बोलिजेल.

## ओवी.

तरी परमेश्वर ठेवा । जो वारी बंध गोवा ॥ तेथ सर्वभावा । समर्पिजे ॥ १ ॥ जेवीं ज्ञाना आधीं विरक्ती । तेवीं भक्ती आधीं दीनता स्थिती । निःसाधन व्हावया निश्चिती । दीनता साह्य ॥ २ ॥ सानन्य दीनता जाण । तेंचि फावे परमात्मा आपण । येऱ्हवीं दीनता दरिद्रिया कारण । सहजचि असें ॥ ३ ॥ अन्याश्रयाणां त्यागोऽनन्यता । हे नारद-सूत्रोक्ति तत्वतां ॥ स्वचित्तदोषदर्शन दीनता । येथ विरक्तता सहजचि ॥ ४ ॥ विरागें विषय तिरस्कारें सुटती । तेणें बळकावे कठोर वृत्ती ॥ आणि दीनतायां विषय स्वभावें सुटती । नम्रवृत्ति बळकावें ॥ ५ । भोग्यदोषदर्शन ती विरक्ती । भोक्तृदोषदर्शन दैन्य स्थिती ॥ येणें निःसाधन प्रतीती । साविया घडे ॥ ६ ॥ सर्वदा चित्तीं वाहे अनुताप । हृदयीं अनन्य भगवत्संकल्प ॥ पति पुत्र माय बाप । भगवंत देखे ॥७॥ सानन्य दीन पुरुषा प्रती । जवळी असतां विषय संपत्ति ॥ इंद्रियें कर्षो न शकती । ऐशी प्रतीति महंताची ॥ ८ ॥ दरिद्रियाचें मन । सहजचि भयसंपन्न ॥ ह्मणवूनी उन्मादपण । न घडे तत्कर्वी ॥९॥ अनन्यतेमुळें पाही । भक्तां भय तों सर्वथा नाहीं ॥ परी दीनतेस्तव कदांही । विषयो-न्माद घडेना ॥ १० ॥ अदीन कर्म्मे सांडितां । तरी निषिद्ध येवों पाहे हातां ॥ आणि सानन्यदीन कर्म्मे सांडितां । निषिद्ध सर्वथा स्पर्शेना ॥११॥ ह्मणोनी सानन्य दीन भगवंती । तोचि वास्तव बोलिजे यती ॥ येर विहितकर्म्मत्यागस्थिती । भोजन पानीं निषिद्धता ॥ १२ ॥ ऐसी जरी दीनता वाहे । तरी हरीवीण अन्यापेक्षा नोहे ॥ हें निकें बोलिलें आहे । तुकाराम स्वामींनीं ॥ १३ ॥

## अभंग.

चारी दिशे आह्मां भिक्षेचा अधिकार ।
न मिळे भाकर भक्षावया ॥ १ ॥
विठ्ठलाचे दास केवळ भिकारी ।
आह्मां लागीं हरी उपेक्षीना ॥ २ ॥

( शिवाजी स्वत: दर्शनास आले त्या वेळीं त्यास केलेला उपदेश या मथाळ्या खालील " राया छत्रपती ऐकावे वचन " या पहिल्या चरणाच्या अभंगांतील चरणें आहेत. )

### ओवी.

एवं सानन्य दीनता । जैं दृढ वाढे चित्ता ॥ तैं विषयांची आस्था । नि:शेष जाय ॥ १४ ॥ एवं देहबुद्धीनें दीनता । तदा गळे देहाऽहंता ॥ आणि जीवबुद्धीनें तत्वतां । तस्यैवाऽहंता भक्ति साधे ॥ १५ ॥ मभैवासौ हें ही जाण । मध्यसंवेग भक्ती लक्षण ॥ आत्मबुद्ध्या भक्तिसंपन्न । स एवाऽहं इति रीति ॥ १६ ॥ त्यातील ही [illegible] वेगळी करून । नाहींसा होउनी आपण ॥ आपणासहित [illegible] । पाहणें कीं ॥ १७ ॥ ही उत्तम परा भक्ती । बोलिली [illegible] समर्थी ॥ दासबोधीं यथार्थ रीति ॥ श्रुती युक्ती अनुभवें ॥ [illegible] ती भक्ती शुद्ध । कवणें रीति प्रसिद्ध ॥ ती बोलिजे सिद्ध । [illegible] ॥ १९ ॥ तरी तत्पदार्थ परोक्षपण । त्वं पदार्थापरोक्षज्ञान ॥ [illegible] धर्म वेगळेकरून । महाज्ञान सांपडे ॥२०॥ इयं ज्ञानकांडरीती । येथ पाहिजे लक्षणावृत्ती ॥ आणि भक्तौ महावाक्यशक्ती । आनंदप्राप्तिदात्री स्वयें ॥ २१ ॥ महावाक्यशक्तिवृत्या ज्ञान । वेदांत-परिभाषाकार बोलिलें जाण ॥ तरी शक्तिवृत्या भक्तिस्थापन । आह्मां स्वीकारितां नये कां ॥ २२ ॥ शक्तिवृत्तीनें मानितां ज्ञान । तरी पूर्वाचार्यविरोध गहन ॥ शक्तिवृत्तीनें मानितां भजन । पूर्वाचार्यविरोध नोहे ॥ २३ ॥ ह्मणोनी परिभाषाकाराहुनी । युक्ति आमची श्रयिजे सज्जनीं ॥ येथ मान देतां जरी शार्ङ्गपाणी । तरी सहज हें घडेल ॥२४॥ तत्त्वंपदार्थाऽपरोक्षता । हें भक्तीचें गुह्य तत्वतां ॥ निकें अवधान श्रोता ॥ ये विषयीं असो ॥ २५ ॥ तत्पदार्थ परोक्ष पूर्ण । मानावया हेंचि कारण ॥ कीं तो ब्रह्माण्डनिष्ठ ह्मणोन । त्वंपदार्थ पिंडनिष्ठ ह्मणोन अपरोक्ष ॥ २६ ॥ दूरतेंस्तव परोक्षता । समीपतेस्तवाऽपरोक्षता ॥ तत्पदार्थ समीप येतां । तरी अपरोक्षता सहजची ॥२७॥ परोक्षज्ञानेंकरून । निवटे असत्त्वापादकावरण ॥ आणि अपरोक्षज्ञानें करून । अभानापादकावरण निवटे ॥ २८ ॥ समीप होता तत्पदार्थ । तदभानापादकावरण नाशत ॥ ह्मणोनी अपरोक्षता निश्चित । सिद्ध तत्पदार्थी ॥ २९ ॥ अतिसमीप नेत्रांजन सम । तरी अपरोक्ष नोहे

परम ॥ ही शंका केवळ भ्रम । वेदान्तदृष्टी ॥ ३० ॥ अति समीपता जे होय । ते प्रत्यक्षासी प्रतिबंधक आहे । येरव्हीं नेत्रासीही येवों पाहे । परोक्षता ॥ ३१ ॥ कीं सुख दुःखाचें ज्ञान । समीप अंजनाहून ॥ मग तें काय म्हणोन । होआवें कवणा ? ॥ ३२ ॥ म्हणोनी प्रत्यक्ष आणि अपरोक्ष । येथ किंचित भेदपक्ष ॥ इंद्रियनिष्ट तें प्रत्यक्ष । अपरोक्ष तें साक्षिनिष्ट ॥३३॥ आपुलें आहेपण । किंवा आपुलें मन ॥ अथवा शुद्ध साक्षीपण । निरसोनी अभान अपरोक्ष ॥ ३४ ॥ तेवीं तत्पदार्थही हृदयीं । समीप सांपडे आपुल्या ठायीं ॥ तरी अभानापाद-कावृत्ति लवलाही । नाशूनि तो अपरोक्ष होय ॥३५॥ तत्पदार्थोऽपरोक्षे करून । त्वंपदार्थोपाधी निरसन ॥ तैं तत्त्वंपदार्थैक्यता पूर्ण । सांपडे करीं ॥ ३६ ॥ आतां तत्पदार्थ अपरोक्ष केवीं । हें स्पष्ट केलें देवीं ॥ अर्जुनाची गोवी । निरसूनिया ॥ ३७ ॥

## श्लोक.

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ॥
भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारूढानि मायया ॥१॥
तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ॥
तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतं ॥२॥

## ओव्या.

सकलभूतांचिया हृदयीं । अर्जुना ईश्वर गोसावी ॥ वृत्ती भूत, अद्य, भावी । वेधूनि सकळ ॥ ३८ ॥ मी उठेन प्रातःकाळीं । जैं एक घटिका राश्मिमाळी ॥ येणें संकल्पें मंचकमौळी । पहुडे सहज ॥ ३९ ॥ तैं लागे निकी निद्रा । इंद्रिय मना मौन मुद्रा ॥ तमोगुणाचिया तंद्रा । हारपे बुद्धी ॥ ४० ॥ मग योग्यकाळीं ये जागृती । जरी आपणचि उठे म्हणावी वृत्ती ॥ तरी ती पावतां सुषुप्ती । असमर्थ होय ॥ ४१ ॥ असमर्थ वस्तू कडून । योग्य काळीं कार्य घरण । हें विरुद्ध बोलण ॥ कोणीही जाणे ॥ ४२ ॥ म्हणावें, उठवी जीव । तरी जागृतींतचि चळेना मनः स्वभाव ॥ सुषुप्तींत अज्ञानावृत सावेव । असोनी वृत्ती कैशा आकळी ॥ ४३ ॥ आणि इतुकी घटिका पळ निश्चिती । जागृतींतचि न राहे स्मृती ॥ सुषुप्तींत असुनी विषय विस्मृती । योग्यकाळीं स्मृती

येईल केवीं ॥ ४४ ॥ ह्मणोनी योग्य कालीं सुचवितां । हें विशेषण साजे भगवंता ॥ " मत्तःस्मृतिर्ज्ञानमपोहनंच " या शब्दीं तत्वतां ॥ कांतसम्मती ही ॥ ४५ ॥ एवं तमोगुणी कार्य सुचवितां । तो अनुग्रह कां न करी सत्वस्था ॥ समाधींत वृत्ति रक्षिता । तोचि एक ॥ ४६ ॥ जीव तंव ध्याता ह्मणोन । ध्येयीं जाय सहज मिळोन ॥ ध्येय ईश्वरचि आपण । समाधी रक्षण त्याकडोनी ॥ ४७ ॥ परी रहस्य हें येथ । सुषुप्तींतूनि भगवंत ॥ उठवी जीव कर्मानुसृत । मायावृत्या ॥ ४८ ॥ आणि समाधी करी रक्षण । हें तों भक्तानुग्रहाचें लक्षण ॥ वृत्तीचा स्वभाव समाधी धारण । हें वृत्ति जाडयास्तव कल्पितां नये ॥ ४९ ॥ भक्तीविण समाधींतून । ज्ञानी ही पावे उत्थान ॥ ऐसें केलें बोलणें । मुचकुंदा देवें भागवतीं ॥ ५० ॥

सम्मतिश्लोक.

युंजानानामभक्तानां प्राणायामादिभिर्मनः ॥
अक्षीणवासनं राजन् दृश्यते पुनरुत्थितम् ॥१॥

श्रीमद्भागवत.

आणि भक्तीनें अपरोक्षज्ञान । हेंही गर्भस्तुत्यभिप्राय निरूपण ॥ ह्मणियाही अपरोक्षज्ञान । भक्त्यावश्यकता जागृतश्रुतौ ॥ ५१ ॥ ह्मणोनी ईश्वरापरोक्षता । याची अत्यंतावश्यकता ॥ तें तत्पदशक्तीनें तत्वतां । हृदयीं पाहतां सांपडे ॥ ५२ ॥ तोचि ईश्वर आपुलिया हृदयीं । अनुमान न करणें ब्रह्माण्डठायीं ॥ "देहेऽस्मिन् पुरुषः परः" या पदेंही ॥ हेंचि कथिलें ॥ ५३ ॥

श्लोक.

" उपद्रष्टाऽनुमंताच भर्ता भोक्ता महेश्वरः ॥
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥१॥

जीव संकल्प करी आपण । संकल्परूप तें मन ॥ आणि सूचनाऽनुमोदन ॥ दाता परेशु ॥ ५४ ॥ समीपत्वें द्रष्टृता ॥ एवमुपद्रष्टाऽनुमंता ॥ उपद्रष्टृत्वें अपरोक्षता । लाधली सहज ॥ ५५ ॥ तो परमात्मा तो परमपुरुष । याचि देहीं सांपडे निःशेष ॥ जीवाच्याही अन्तर्यामी जयास । दाखवी श्रुती ॥ ५६ ॥ तो आत्मा तो अमृत । इत्याद्यर्थ श्रुति

गत ॥ अपरोक्ष तो निश्चित ॥ सहजची ॥ ५७ ॥ वृत्यारूढपणें जीव चेतन । वृत्याश्रयपणें ईश्वर आपण ॥ कीं अज्ञानारूढ जीवचेतन । अज्ञानाधारपण ईश्वरता ॥ ५८ ॥ ब्रह्मचि आश्रय ब्रह्मचि विषय । येथ जे अज्ञानासी होय ॥ ते आवृतिरूपें स्वयें । बोलिलें कीं ॥ ५९ ॥ परी अनावृत अज्ञानाधार । तो हृदयस्थ बोलिजे ईश्वर ॥ इदंत्वें करूनि निर्धार । प्रत्यक्ष नोहे ॥ ६० ॥ ह्मणोनी सांडूनि आरूढाहंता । जें चैतन्य उरे तत्वतां ॥ तें व्युत्थानदशेंत आनंददंता । सहज पावे ॥ ६१ ॥ 'अर्जुनपण न घेतां । मी ऐसें जे पंडुसुता ॥ उठे तें तत्वतां । तयाचें रूप' ॥ ६२ ॥ एवंविध तातचरणोक्ती । तयाची घडावया भक्ती ॥ जे व्युत्थानीं आनंददंता स्थिती । तेचि शरीर तयाचे ॥ ६३ ॥ संक्षेप-शारीरक टीकेंत । मधुसूदन-वाक्य यथार्थ ॥ ब्रह्मैक्यानंदही पृथगिव भासत । प्रीतिवृत्त्यवच्छिन्नतेस्तव ॥ ६४ ॥ ती पृथकता तदाकार । प्रीत्या मनःस्थित साचार ॥ यालागीं मनोगतस्तदाकार । भक्तिरसायनीं बोलिले ॥ ६५ ॥ अथवा आत्मा शरीर । तेथोनि निघतां अहंकार ॥ तरी तेचि साकार । होवोनि राहे ॥ ६६ ॥ परी जो पक्ष प्रथम । तोचि वाटे उत्तम ॥ इदंता ह्मणोनी जाड्यसंभ्रम । चेतनान्वयें येईना ॥ ६७ ॥ अहंता निःशेष जाय । प्रीति शरीर नित्य राहे ॥ हें मुक्तिगत भक्ति होय । अखंडैकरस ॥ ६८ ॥ अहंकाराधीन प्रीति । ऐसें न ह्मणावें निश्चिती ॥ सद्गुरुत्वें वाढतां प्रीति । अहंतालयानुभूति सकळां ॥ ६९ ॥ अहंपण आपुलें राहतां । जेवीं साक्षीची परोक्षता ॥ तेवीं बहिर्मुख वृत्या पाहतां । वाटे परोक्षता हृदयस्थेशाची ॥ ७० ॥ अन्तर्मुख होतां वृत्ती । उपद्रष्टृत्वादिकीं निश्चिती ॥ यदा संधावानंदभुक्ती ( किंवा ) संधौवा समाधावानंदप्राप्ती । तदा विद्याधार चित्तीं जी ॥ ७१ ॥ तीं एकत्वें अपरोक्ष । तेचि ईश्वरत्व प्रत्यक्ष ॥ समाधिरपि साक्ष । यांचीच दे ॥ ७२ ॥ परी संधि समाधी मानितां । व्युत्थानाभावें व्युत्थान भेदता ॥ न यावी दावावी व्युत्थान मिथ्यता । अन्वयें साक्षात्कारता यास्तव ॥ ७३ ॥ ते संधि समाधींत आनंदघन । व्युत्थानीं चुंबनालिंगन ॥ ब्रह्म संधींत सांपडतां व्युत्थान । तरी तेहि अव्युत्थान सहज ॥ ७४ ॥ दोहींकडे अपरोक्षता । तत्पदार्थी जाहली तत्वतां ॥ प्रीती मात्र पाहतां । एकी एक ॥ ७५ ॥ ( चूर्णिका ) आत्मप्रीती तरंगबाह्य भगवदालिंगन ।

आत्मप्रीती सिंधुभक्ती सहजपण ॥ स्वाभिमान स्थापतां ज्ञान । येथ निवर्तोनि अभिमान हरिभक्ती ॥ ७६ ॥ घन विरल स्थिती । बोलिजे भक्ती ज्ञानी । घनब्रह्मता भक्ती । ज्ञानीतर ॥ ७७ ॥ आणि नाहीं इतरता । जरी सघनब्रह्मतां ॥ तरी नित्यभक्ती होतां । सांपडली ॥ ७८ ॥ एवं प्रेमावच्छिन्न निरुपाधिक । स्वतंत्र शुद्ध अपरोक्ष देख ॥ चैतन्याभिव्यक्ति हृदयीं सम्यक । होय ती भक्त्यधिकरण साकृती ॥ ७९ ॥ तेथ समस्त भाव समर्पितां । सहजचि गळे अहंता ॥ आणि ज्ञान प्रतिबंधकता । तेही नोहे ॥ ८० ॥ बाह्य सानन्य दीनता । अंतरी अखंड तृप्तता ॥ प्रेमें गळोनी ज्ञानाहंता । मग पूर्णता, किमवशिष्ट ॥ ८१ ॥ म्हणोनी प्रेमधारा पूर्ण । उठे ईश्वरमुळीहून ॥ ती कायापेळे बाह्य ब्रह्मालिंगन । समुद्रत्वेंकरोनी करी ॥८२॥ वा ब्रह्माण्ड मुळींहूनि प्रीतीधारा । येवोनि मिळे हृदयस्थ चित्समुद्रा । तेथही प्रेमानंद पूरा ॥ उल्हासविजे ॥ ८३ ॥ पहिल्या पक्षीं चुंबनालिंगन । दुसऱ्या पक्षीं तळमळ सकरुण ॥ जैसा मीन जीवनावीण । तेवीं माहात्म्यज्ञान असोनि होय ॥ ८४ ॥ एवं शक्त्या अपरोक्ष तत्पदार्थ । आणि उपाधिबाधपूर्वकत्वंपदलक्ष्यार्थ ॥ घेतां सहज प्रेमार्थे । ऐक्य फावे ॥ ८५ ॥ प्रेरकत्वादि धर्म बहुत । ते त्वमर्थोपाधिसंकल्प कल्पित ॥ उपाधि निरसतां समस्त । निरसिती सहज ॥ ८६ ॥ परी आत्मज्ञानकालीं प्रीति । राहे म्हणोनी निश्चिती ॥ अनध्यस्तविवर्त साधकस्थिती । उपाधी ती ॥ ८७ ॥ या लागीं ती न निरसतां । ईश्वर अलंकारीं योजावी तत्वतां ॥ अज्ञानमात्र बाधोनि ऐक्यता । पाविजे प्रेमें ॥ ८८ ॥ एवं निदिध्यासनी स्थिती । ज्ञानें ऐक्यत्व साक्षात्कृती ॥ जाहलिया अकृत्रिम भक्ती । अन्वयेंचि साधे ॥ ८९ ॥ तो परम प्रेमू भला । बहुत स्थळीं निरूपिला ॥ जो घनत्वीं उपेगा आला । संत चिन्हांच्या ॥ ९० ॥ तो प्रेम ओसंडे बाहेरी । तैं विप्रलंभाची परी ॥ संयोग तो अंतरीं । स्थित राहे ॥ ९१ ॥ एवं दोहींपरी सुख । न सांपडे कवा दुःख ॥ परी सुख म्हणोनी सुख । ते ही नेघे ॥ ९२ ॥ मग संयोग वियोग प्रेमैक्यता । तेणें वृत्त्यैकतानता ॥ हा अनुभव मुक्तभक्तां । सहजें आहे ॥ ९३ ॥ एवं जीवन्मुक्तींत भक्ती । आणि भक्त्यधीन जीवन्मुक्ती ॥ तैसी विदेहमुक्तींत ही भक्ती । निरूपिली ॥ ९४ ॥ स्वापरोक्षज्ञान । तें त्वंपदशोधन ॥ आणि

माहात्म्यज्ञानें अपरोक्ष भगवान । हें तत्पद शोधन हृदयस्थ ॥ ९५ ॥ प्रेमैक्याला निदिध्यास स्थिती । हे स्वभावानिष्टते जैं ये भक्ती ॥ अभिन्न निरहंकृत ज्ञप्ती । भगवत्साक्षात्कृती ते ॥९६॥ परा शांती परा भक्ती । परात्वविशेषण साम्य स्थिती ॥ ज्ञानानंतर्यप्राप्ती । दोहींस ह्मणोनी एक दोन्हीही ॥ ९७ ॥ शाश्वतस्थान विदेहमुक्ती । तत्रेशप्रसादापेक्षोक्ती ॥ यालागीं अवशिष्ट भक्ती । निवर्त्य नोहे ॥ ९८ ॥ आतां कैसी काय विदेहमुक्ती । ते न वर्णिजेल मम मती ॥मनोवागगोचर ह्मणती । वसिष्ट जियेतें ॥ ९९ ॥ मनोवागगोचर स्पष्ट । ऐसें जिये विषयीं वसिष्ट ॥ बोलती, तेथ येरीं कष्ट । कीजती कां ॥ १०० ॥ रस शास्त्रांतील प्रलय । कवी न वर्णिती स्वयें ॥ रसभंगभय । ह्मणोनिया ॥ १ ॥ तेवीं अव्याख्येय व्याख्यान । करितां विरे निरूपण ॥ यालागीं विदेह मुक्ती व्याख्यान । वेदान्ती न करिती ॥ २ ॥ आणि शब्दाचें प्रयोजन ब्रह्माकारवृत्ति । तेंही न साधे वर्णितां विदेह मुक्ती ॥ अप्रयोजक वर्णन वेदान्तीं । नसावे ही उक्ती महंताची ॥३॥ ह्मणोनी अखंडाखंडस्थिती॥ इष्टपरमानंदमूर्ती ॥ ज्ञानेश्वर माउली कीर्ति । कृपामय वंदू ॥ ४ ॥ हे प्रक्रियामय कावडी । हृदयस्थ परमावडी—॥ सहित गुरु चरण देव्हडी । वाहिली प्रेमें ॥ ५ ॥ येथील कांहीं पुरे उणें । तें मी आपण सर्वथा नेणें ॥ श्री ज्ञानेश्वर चरणीं केणें । समर्पिलें ॥६॥ श्रीं ज्ञानेश्वर माय बहिणी । जन्मजन्म ठेवोनि चरणीं ॥ हरिसंयोग असोनि विरहिणी । यथा तथा सुखी कीजे ॥ ७ ॥ आणि श्रीज्ञानेश्वर माउली । एवं मनोवाणी बोली ॥ अष्टही अंगें पाउलीं । वंदू जन्म जन्म ॥८॥ श्रीमत्सद्गुरु ज्ञानेश्वराचार्ये । जे हृदयस्थ परमार्ये ॥ वारोनि कारण कार्य॥ भाजिले हो कां ॥ ९ ॥

## दोहा.

एवं विध सुख सुरतरू, निदिध्यासन प्रकाश ॥
ज्ञानेश्वर पर्दि वाहिले, सकलहि पुष्प—समास ॥ १ ॥

हरिः ॐ तत्सत् श्रीमत्सद्गुरुज्ञानेश्वरकृपाप्रसादे गद्यपद्यान्विते निदिध्यासनप्रकाशे भगवद्भक्तिनिष्टापूर्तिनिरूपणनाम अष्टमः समासः ॥

हरिः ॐ तत्सत् श्रीसद्गुरु ज्ञानेश्वरार्पणमस्तु ॥ शुभं भवतु ॥

# ॥ श्रीसद्गुरु ज्ञानेश्वर माउली समर्थ ॥

## ॥ कांतकांतावाक्यपुष्पम्. ॥

यत्कृपालेशमात्रेण महिषो वेदपारगः । ज्ञानेश्वरं तमाचार्यं वंदे बद्धांजलिर्मुदा ॥ १ ॥ तपोभिः क्षीणपापानामिहामुत्रविरागिणाम् । सत्संवादमिषेणात्र भक्तिर्ज्ञानंच कथ्यते ॥ २ ॥ विषयनिवृत्यनंतरमात्मज्ञानेनैव ब्रह्मणः सच्चिदंशद्वयमविद्यानिवृत्तिपूर्वकं ज्ञातुं शक्यते । किंतु स्वानंदप्राप्तये भगवद्भक्तिरेव गरीयसीति श्रुतिस्मृतिपुराणेतिहासानामभिप्रायः।तत्र भूबीजांकुरतरुफलरूपा निरुपाधिमायोपाधिसूत्रविराड्विष्णवश्चैते पंचेश्वरपुरुषा नीलकंठोक्ता भवंति । तत्र ब्रह्मैव भगवद्भक्तानुग्रहकरणेक्षणात् विष्णुरूपेण स्वयमाविर्भवति । स आविर्भावेऽपि नित्यः सुखकानुग्रहकरणेक्षणमात्रत्वात् । अयमेव भक्तिसदनं । तद्द्वाररक्षक ...नप्राप्तये शांकरपदार्थानुदाहरति । 'ईशो माया महान् जीवः संबंधो ... । अत्र पंचानादिसांताश्चेशोऽनादिरनंतकः ॥३॥ ईशो हि ब्रह्म... समुदाहृतः । मायाऽज्ञान प्रधानाद्याः पर्याया मुनिसंमताः ॥४॥ ...पाधिर्जगद्योनिः सर्वकृच्छबलो महान् ॥ हेमगर्भोऽपरेशश्च पर्यायौ ...शकौ ॥ ५ ॥ मायांतु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ॥ तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं जगदिति श्रुतिः ॥ ६ ॥ मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ॥ संभवः सर्वभूतानां तस्मादिति परा श्रुतिः' ॥७॥ अस्येशादिपदार्थत्रयस्य लक्षणानि भक्ति पदतीर्थामृतात् बुधैरुपहर्तव्यानि । पदार्थषट्कलक्षणानि अपेक्षितानि चेत् शारीरकशांकरभाष्यप्रोक्तानि अत्र विस्तरभयान्नास्माभिर्लिख्यंते । 'परापरेतिभेदेन द्विविद्ये मुंडकोक्तितः' । तत्रोपनिषत्पुराणेतिहासवर्जितवेदवेदांगप्रतिपाद्याऽपरा । उपनिषत्पुराणेतिहासप्रतिपाद्या परेति 'वेदार्थादधिकं मन्ये पुराणार्थं वरानने' इति नारदोक्तितः स्पष्टमेव प्रतीयते । शिष्य उवाच ॥ यदेकं निष्कलं ब्रह्म व्योमातीतं निरंतरम् । यस्मिन्नतद्व्यावृत्या चकितं वदति श्रुतिः ॥ ८ ॥ तस्मिन् शुद्धे चिदाकाशे लक्ष्यज्ञानैकगोचरे ॥ अनादिजडरूपाया मायायाः किंमुत प्रमा ॥९॥ ब्रह्मरूपात्पृथक् सास्ति ह्यपृथग्वाथ विद्यते ॥ कस्य स्याद्बंधनं तस्याः कस्य नेति वेदस्व भोः ॥१०॥ गुरुरुवाच । श्रुणु वत्स गुरुशास्त्रयोः साधनदशायां सिद्धदशायांच यत्प्रयोजनं । तत्ते सादिभ्रमा-

सादिभ्रमनिवृत्तिमिषेण फलरूपतयोपदिश्यते ॥ प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि । विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसंभवान् ॥११॥ ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ॥ अनादिमत् परं ब्रह्म नसत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥ ब्रह्मैवानादिरूपं हि मायाऽनादिस्वरूपिणी । तस्मान्माया ब्रह्मरूपात्पृथक् क्वापि न विद्यते ॥ १३ ॥ सादिभ्रमोपदेशेतु मुक्तानां बंधसंभवः ॥ तस्मादनादिरूपेण माया तिष्ठतु सर्वदा ॥ १४ ॥ सादिभ्रमस्य निर्वृत्तेः साधनं नैव विद्यते ॥ तस्मादेषा ह्यनादिः स्यान्मायाऽविद्याच मे मतिः ॥१५॥ ब्रह्मात्मैक्यप्रत्ययेपि विस्मृतेः प्रत्ययो वृथा सोयं सादिभ्रमस्तस्य निवृत्तिश्चास्ति नास्ति वा ॥ १६ ॥ गुरुवाक्येन निर्वृत्तिं यः पश्यति स पश्यति ॥ न पश्यंति ज्ञातमूढा ब्रह्मालस्याभिमानिनः ॥१७॥ यस्य ब्रह्माभिमानोस्ति देहेपि ममता तथा । न स योगी नवा भोगी केवलं दुःखभागसौ ॥ १८ ॥ अनादिभ्रमानिर्वृत्तिर्न गुरोर्वचनं विना ॥ १९ ॥ यस्य देवे परा भक्ति र्यथा देवे तथा गुरौ तस्यैते कथिताह्यर्थाः प्रकाशंते महात्मनः ॥ २० ॥ चक्रवाकखगस्यात्र मृगतोयं करोति किम् । तथा माधवभक्तस्य ह्यविद्या किं करिष्यति ।२१। दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ॥ मामेव ये प्रपद्यंते मायामेतां तरंति ते ॥ २२ ॥ मृगांबुजन्मनिर्वृत्तिं चक्रवाको नचेच्छति ॥ तथा माधवभक्तोपि मायासत्व मुपेक्षते ॥ २३ ॥ चक्रवाकैरदृष्टापि मृगैर्दृष्टा मरीचिका ॥ अज्ञानिभिः संप्रदृष्टां भक्तोऽविद्यां न पश्यति ॥२४ ॥ एतत्ते कथितं गुह्यं ज्ञानेश्वरकृपालवात् । यो जानाति यथावत्स सुख मत्यंतमश्नुते ॥ २५ ॥ कांतकांतावाक्यपुष्पग्रथनं गद्यपद्ययोः । यः सेवते प्रभातेस्मिन् व्रजेद्धि परमां गातिम् ॥ २६ ॥

॥ इति श्रीकांताकांतवाक्यपुष्पं समाप्तम् ॥

# सूचना प्रकरण.

## ओवी.

नमो नमो श्रीज्ञानेश्वरा । सच्चिदानंदा करुणाकरा । प्रेमें मज अंगीकारा । ठेवोनि पायीं ॥ १ ॥ असो आतां सूचना । हीचि निकीं सर्वजना । मी केलें लेखना । अज्ञानबुद्धी ॥ २ ॥ मी या सकल लेखामाजीं निश्चिती । वर्णिली आहे हरिभक्ती ॥ ते पसंत होवावी अना-

प्रती । हा हेतू नव्हे ॥ ३ ॥ कोठें महावाक्यार्थेंकरून । कोठें तर्क समाश्रवून । कोठें अन्यरीति करून । निरूपण भक्तीचें ॥ ४ ॥ परी हे योग्य आहे ऐसें । वादें सिद्धही होईल आपैसें ॥ परी वादीं सामर्थ्य नसे । जयांचिया आंगीं ॥५॥ तेणें मल्लेख पाहून । घेयावे भक्तिबोधन । अयोग्य दिसेल तें त्यागोन । सहजची ॥ ६ ॥ वादाचा अवलंब न कीजे । (वादोनावलंब्य:—नारदभक्तिसूत्र.) हें श्री नारदीं बोलिले सहजे । आणि मल्लेखामाजीं अनुरजे । मीचि एक ॥७॥ निके जे माझे विचार ते मज साठींच समग्र ॥ दूजिया बोध करावया निर्धार । सामर्थ्य नाहीं ममांगीं ॥८॥ मी नेणें शास्त्र-व्युत्पत्ति । हें अवघेचि लोक जाणती ॥ नरे व्याकरण मज प्रती । पुण्य-पत्तनांतीं श्रुत हें ॥९॥ आणि कौमुदी मातें श्रीनिवासशास्त्री शिकवीत होते ॥ मी नेणें सांख्य वेदान्तातें । हें बडीवर सिद्ध झालें ॥ १० ॥ आणि माझें असत्य भाषण । मंडळी सर्व जाणे आपण ॥ तेवीं मम परस्त्रीगमन । कांहीं स्त्रियाही जाणती ॥ ११ । आणीक मातृगमनादि पापें बहूत । जे वाचे वदतांचि लाज वाटत । ते सर्व जाणे भगवंत । कृपामूर्ती ॥ १२ ॥ हें पातक-लेखन । जरी त्यां नसते लिहिलेंसेल जाण ॥ तरी असत्य भाषण । दोष मजवरी ॥ १३ ॥ आणि सत्य लिहिलें असेल जरी । तरी ही पापें मजवरी । एवं पहातां दोहींपरी । पापनिष्ठ मी ॥ १४ ॥ आतां माझिये ठायीं भगवद्भक्ती सर्वथा नाहीं ॥ काम्य भावना धरोनी लवलाही । शिवार्चन करी ॥ १५ ॥ स्त्री जें पासूनि पावली मरण । तें पासोनी सुटलें आळंदीगमन ॥ इतिविध गुरुसेवाहीन । निका आहे ॥ १६ ॥ ज्ञानेश्वर कन्या म्हणोनी । मी पदवी घेतली आंगीं लावोनी ॥ परी ज्ञानेश्वर—ला एवढ्या वरोनी । नानुमानिजे लोकीं ॥ १७ ॥ रामचंद्रादि माधानांत हरिभाऊ आदि उमरावतींत ॥ त्यांहीं वाचूनियां ग्रंथ । किंचिदर्थ लिहिला त्यां ॥ १८ ॥ ऐसिया मज सर्वस्वदीना । सामर्थ्य केंवीं येईल लेखना ॥ या लागीं मानोनि बोबड्या वचना । आवडेल तें घेइजे ॥ १९ । माधान माझें गांव । आणि गुल्या हें नांव ॥ पुढें संत—कृपें गुरुदेव कृपा कारितील तेंचि खरे ॥ २० ॥ श्रीज्ञानेश्वर माय माउली । प्रेमें वंदोनि तत्पाउलीं ॥ ही सूचना श्रुत केली । सर्वांसीही ॥ २९ ॥

हरिः ॐ तत्सदिति दीनताव्यपाश्रयणनामसूचनाप्रकरणं संपूर्णम्